रविकिरणमंडळाचें ३० वें पुस्तक

# श्री-मनोरमा

( श्रीधर-मनोरमा यांचा कवितासंग्रह )



१० एप्रिल १९३९

मूल्य अडीच रुपये

५०/—

**रविकिरणमंडळ**

**दत्तात्रेय लक्ष्मण गोखले** एम. ए., बी. टी.
**विठ्ठल दत्तात्रेय घाटे** एम. ए., बी. टी., टी. डी.
प्रा. **डॉ. माधव त्रिम्बक पटवर्धन** एम. ए.; डी. लिट्.
( माधव जूलियन् )
प्रा. **शंकर केशव कानेटकर** एम. ए. ( गिरीश )
**यशवंत दिनकर पेंढरकर** ( यशवंत )
**गजानन त्र्यंबक माडखोलकर**
( **शंकर काशिनाथ गर्गे** ( दिवाकर ) )
( **सौ. मनोरमाबाई रानडे** बी. ए. )
प्रा. **श्रीधर बाळकृष्ण रानडे** बी. ए.; एम. एससी.





प्रकाशकः—
सौ. **शालिनी रानडे** बी. ए.
पुणें वाडी, व्हिन्सेंट रोड
दादर, मुंबई १४

मुद्रकः—**रघुनाथ दिपाजी देसाई**
न्यू भारत प्रिंटींग प्रेस,
६ केळेवाडी, गिरगांव मुंबई ४



सौ. मनोरमा रानडे १९२१. (१८९६--१९२६)

सौ. मनोरमाबाईंच्या तीन कन्या!



कुमारी कुंदा व कुमारी सुधा

कविता.

# अनावरण

ता. १० एप्रिल १९२९ रोजीं रानडे कुटुंबांत माझा अन्तर्भाव झाला.



तेव्हांपासूनच रानडे कुटुंबांतील वडील मंडळी, हिवरगांवकर कुटुंब, व रविकिरणमंडळाचे सभासद, या सर्वांनीं माझ्यापुढील बिकट कार्यास प्रोत्साहन देऊन आपुलकी दाखविली. मुलींनींही आपल्या वागणुकीनें माझा मार्ग सुगम केला.

रविकिरणमंडळाचे कांहीं सभासद पूर्वपरिचित असल्यामुळें व माझेंही शिक्षण हुजूरपागा, पुणें येथेंच झाल्यामुळें कै. सौ. मनोरमाबाईची व माझी ओळख झाली. माझ्या मातुःश्री कै. काशीबाई हेरलेकर यांची साहित्यिकांच्या सहवासाची आवड व वाङ्मयप्रेम यामुळें काव्यात्मक जीवनांत मग्न असलेलें हें कुटुंब—सुधाकुंदासह—कौतुकास्पद वाटे. त्यांतच पुढें माझ्या कांहीं मैत्रिणी त्यांच्या मैत्रिणी आहेत असें आढळून आल्यामुळें, व सर्वांच्या उदार दृष्टीमुळें परकेपणा वाटला नाहीं.

कवि—पत्नीच्या कविता यापूर्वी अनेक कवींनीं स्वतः प्रसिद्ध केल्या आहेत. द्वितीय पत्नीनें हें काम अंगिकारणें कित्येकांस अप्रयोजक किंवा भोंदूपणाचें

वाटेल; पण वस्तुस्थिति तशी नाहीं. पतीच्या कार्यात कित्येक वेळां सहभागित्व नव्हे तर पुढारीपणही पत्नीला घ्यावें लागतें. मनोरमाबाईच्या दोन प्रतिमांचें संगोपन करितांना त्यांची तिसरी अशरीरिणी प्रतिमा हीही नांवारूपास चढावी, तिची अनास्था होऊं नये, हा माझा विचार मी वेळोवेळीं प्रगटही करीत असें. १९२६ सालीं छापखान्याची प्रत सिद्ध होऊन, रविकिरणमंडळाच्या बैठकांतून पुस्तकाचें रूप व अंतरंग याविषयीं चर्चा होऊनही छपाईचें काम मागें पडलें. त्यानंतरही कांहीं विशिष्ट मनःस्थितीमुळें पुस्तकप्रकाशनाचा विचार मूर्तरूप धारण करीना. कांहीं असो, इतक्या वर्षांनीं एकाएकीं उचल खाऊन अवघ्या महिन्याच्या अवधींत पुस्तकाची तयारी झाली. 'काव्याचा केवळ रसास्वाद घेण्यास शिकलेली' एवढीच माझी पात्रता असली तरी हें प्रकाशनाचें कर्तव्य अभिमानास्पद व आनंददायी आहे.

श्री. रा. रा. बाबासाहेब हिवरगांवकर, सौ. वेणूताई मोडक यांची चरित्ररेखा व आठवण; रविकिरणमंडळाच्या सभासदांनीं तत्परतेनें पाठवून दिलेले स्मृतिलेख व त्वरित छपाईची श्री० तात्या खानोलकर यांनीं केलेली व्यवस्था हें सर्व वरील व्यक्तींच्या मनोरमाबाईवरील अकृत्रिम लोभाचें निदर्शक आहे.

मनोरमाबाईच्या निधनानंतर चित्रमय जगत्, केसरी, सहविचार, मनोरंजन, ज्ञानप्रकाश, नवाकाळ, महाराष्ट्र, विविधवृत्त यांतून निधनवृत्त; कित्येक वाङ्मयसंस्थांतून दुखवट्याचे ठराव; तसेंच मनोरंजनांत श्री. यशवन्त कवींनीं, व रणगर्जनेंत श्री. गिरीश कवींनीं त्यांच्या गौरवपर लिहिलेले लेख; क्रमिक पाठ्य पुस्तकांत व मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत त्यांचें त्रोटक चरित्र व कविता पुनः पुनः प्रसिद्ध झालेल्या; कै. अण्णा हिवरगांवकर यानीं भासकवीच्या नाटकाचा प्रथम खंड व कवि गिरीश यांनीं आपली 'कला' ही मनोरमाबाईस अर्पण केलेली. अशा परिस्थितींत मनोरमाबाईच्या कविताविषयी लोकांत अत्यंत कुतुहल होतें. अशावेळीं हें पुस्तक प्रकाशित करणें अत्यावश्यक होतें खरें. १९१२ ते १९२५ या चौदा वर्षांत लिहिलेली कविता त्यानंतर चौदा वर्षांनीं प्रसिद्ध होण्यांत 'श्रीधरमनोरमा' यांच्या संयुक्त काव्यसंग्रह-प्रकाशनाची उभयतांची फार पूर्वीची मनीषा पूर्ण होत आहे.

कालपरत्वें अभिरुचि बदलल्यामुळें असें पुस्तक प्रचलित काव्यदृष्ट्या नसलें

तरी ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें आहे व निदान या दृष्टीनें मराठी भाषेच्या अभ्यासकांस याचा उपयोग होईल अशी आशा आहे.

दादर, मुंबई.

२० एप्रिल १९३९ सौ. **शालिनी रानडे**



**आस्वाद**

# चरित्ररेखा



दिवंगत लहान भावंडाचा मृत्युलेख लिहिणें हें जगांत अनुभवास येणाऱ्या अनेक दुःखांपैकीं एक मोठेंच दुःख होय. सृष्टीक्रमानुसार घडणाऱ्या गोष्टी उलट घडल्या म्हणजे अंतःकरणांत दारुण यातना झाल्याशिवाय रहात नाहींत. माझ्या कै. भगिनी द्वारकाबाई उर्फ मनोरमाबाई यांस माझे वडील कै. अण्णा ह्यांनीं आपला 'भास कवीचा प्रथम खंड' अर्पण केला हेंही अशाच दुःखांपैकीं एक होय. त्यानंतर मी हा चरित्रात्मक लेख लिहिणें हें ह्या जड अंतःकरणानें कितपत साध्य होईल ह्याबद्दल शंका आहे.

त्यांच्या काव्यमय जीवनाशीं इतके समरस झालेले माझे मेव्हणे श्री. नाना रानडे ह्यांसही त्यांच्या कविता हातांवेगळ्या करून प्रकाशित करण्यास एक तपाहून जास्त काळ लागला, ह्याचें कारणही त्यांच्या अंतःकरणांत होणारी कालवाकालव हीच असली पाहिजे असें मला वाटतें. परंतु त्यांनीं धैर्यानें मनोरमाबाईंच्या जन्मस्थानींच भरणाऱ्या २३ साव्या महाराष्ट्र साहित्य संमेलन प्रसंगीं व ज्या साहित्य सम्मेलनाशीं माझा कार्याध्यक्ष ह्या नात्यानें संबंध येतो अशा समयीं त्यांच्या कविता प्रसिद्ध करण्याचें ठरविलें, याबद्दल एक प्रकारें दुःखमिश्रित आनंद वाटल्यावांचून रहात नाहीं.

कै. सौ. मनोरमाबाई रानडे ( कु. द्वारकाबाई हिवरगांवकर ) ह्यांचा जन्म अहमदनगर येथें १३ जानेवारी १८९६ सालीं झाला. द्वारकाबाई लहानपणा-

पासूनच अतिशय चपळ व चलाख असत. खिस्त गल्लींतील घरांत रहात असतां त्यावेळच्या पाण्याच्या दुष्काळामुळें आमच्या आईबरोबर कारंजावरून पाणी आणण्यास लहानशी लोटी घेऊन सर्व गल्लीमध्यें दुडदुड धांवत असतांनाचें चित्र अद्याप माझ्या नजरेसमोर उभें रहातें, दीड वर्षाचीच ही बुटबैंगण मुलगी सर्व गल्लीभर सर्वांची आवडती होती. तिच्या चापल्याचा नमुना म्हणून एक प्रसंग आठवतो. घरांतील आडावर जाऊन आंत पाय सोडून आंतील पाणी पहात सर्वांची नजर चुकवून केव्हां जाऊन बसली हें नकळे. तिला अशा स्थितींत पहातांच ओरडून हांक मारणें शक्य नव्हतेंच; तेव्हां आमच्या वडिलांचे परमप्रिय मित्र कै. विश्वनाथ गोविंद उर्फ दादासाहेब संत ह्यांनीं हलक्या पाव-लांनीं तिच्या मागून जाऊन तिला मागें झटकन ओढून घेतलें.

बालपणच्या चलाख वृत्तीमुळें ही छोटी मूर्ति थोडीशी नादी असली तरी सर्वांची आवडती होती व त्यामुळें तिच्या बालपणच्या खोड्याही प्रिय वाटत. तथापि तिच्या आईस प्रपंचांतील कामधंद्यांत तिच्या लुडबुडीमुळें तिला दटाव-ण्याचे प्रसंग नेहमीं येत. या खोड्यांमुळें "डाव देईन" असा आई धाक नेहमीं दाखवते असें पाहून तिनें आईवरच 'डाव' देण्याचा प्रयोग करण्याचें ठरविलें. आई दुपारीं वामकुक्षी घेत असतांना निद्रित आहे असें पाहून एके दिवशीं छोटीनें चुलीच्या निखाऱ्यांत उलथणें घालून, चांगलें तापलें आहे असें पहातांच निद्रावश असलेल्या आईच्या पायास हलकेंच पोळविलें. आई जागी होतांच कारण कळलें व अशा खोड्यांचा परिणाम व्हावयाचा तोच छोटीस भोगावा लागला.

छोटीचा चाणाक्षपणा व लहानपणींच दिसून येणारें तिचें बुद्धिचापल्य पाहून ती आमच्या थोरल्या आत्याबाईस फारच प्रिय झाली. आमच्या आत्याबाईस मूलबाळ नसल्यामुळें त्या तिला आपल्याबरोबर गुजरातमध्यें घेऊन गेल्या व अशा रीतीनें मनोरमाबाईंचीं बालपणचीं ४–५ वर्षे गुजरातमध्यें गेलीं. त्यामुळें गुजराती स्त्रियांच्या कलात्मक जीवनाशीं लहानपणींच संबंध जडल्यामुळें त्यांच्या पुढील काव्यरचनेला तो स्फूर्तिदायकच झाला असला पाहिजे असें म्हटल्या-वांचून रहावत नाहीं.

गुजरात मधून परत आल्यानंतर नगर सोडून आम्ही पुणें येथें येऊन स्थायिक झाल्याकारणानें त्यांचें प्राथमिक शिक्षण पुणें येथील हुजूर पागेंत

झालें. परंतु त्यावेळीं पुण्यास दर वर्षी प्लेगाची धाड येत असे व वर्षांतील तीन चार महिने मुलांच्या शिक्षणाचा खेळखंडोबा होत असे. तथापि प्लेगमुळें आम्ही शहराबाहेर झोपड्यांत रहावयास गेल्यानंतर आमचें पुणें–न्यु इंग्लिश स्कूल, हें फर्ग्युसन कॉलेजच्या इमारतींत भरत असे व मुलींच्याही शिक्षणाचें नुकसान टाळण्यासाठीं मुलांच्या बरोबर न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आपल्या मुलींना पाठविण्याची आमचे स्त्री शिक्षणप्रेमी वडील ती. अण्णा ह्यांनीं शाळेच्या चालकांकडून सवलत काढून न्यू इंग्लिश स्कूलमध्येंच मुलींना पाठविण्यास सुरवात केली. प्लेगची सांथ ओसरल्यानंतर गांवांत शाळा गेल्यानंतरही मुलींना त्याच शाळेंत पाठविण्याची प्रथा आमच्या वडीलांनीं कायम ठेविली. शाळेच्या चालकांनीं 'आतां तुम्हीं आपल्या मुलींना हुजूर पागेंत पाठवा' असें सांगितलें असतां, एकदां न्यू इंग्लिश स्कूलसारख्या नाणावलेल्या शाळेचा फायदा मिळूं लागल्यानंतर तो टाळण्यास ते तयार नव्हते व त्यांनीं हट्टानें मुलींना तेथेंच शाळेंत पाठविण्याचें निश्चित केलें व अशा रीतीनें शाळेच्या चालकांसही आपल्या धोरणांत फरक करून मुला–मुलींना एकत्र शिक्षण देण्याची सवलत निश्चित करणें भाग पडलें. अशा रीतीनें आज पुण्यांतील मुलांच्या शिक्षणसंस्थांतूनही मुली त्यांजबरोबर शिक्षण घेतांना दिसतात, त्याची मूळ प्रथा सौ. मनोरमाबाई पासूनच पडली हें पाहून व ती प्रथम सुरू करण्यास आमचे वडीलच कारणीभूत झाले तें पाहून एक प्रकारें अभिमान वाटल्यावांचून रहात नाहीं.

प्लेगमध्यें झोपड्यांत रहावयास गेल्यानंतर एक प्रकारें आम्हांस विशेष आनंद होई; कारण फक्त आमच्यासारख्या न्यू इंग्लिश स्कूलच्या विद्यार्थ्यांनाच आपलें शिक्षण फर्ग्युसन कॉलेजच्या इमारतींत अखंड चालू ठेवण्याची सोय असे व इतर शाळांस तशी नसे व त्यामुळें इतर शाळेंतील विद्यार्थ्यांस आमचा हेवा वाटे. झोपडींतील मोकळ्या हवेंत सर्व मुलें–मुली अहोरात्र एकत्र खेळण्यास वागडण्यास जास्तच संधि मिळे. कै. मनोरमाबाईंना आमच्याबरोबर मुलांमध्यें विटीदांडूचा खेळ खेळण्याचा फार नाद असे. आमचे बाळपणचे मित्र बडोद्याचे प्रो. चिंतामण विनायक जोशी व नगरचे श्री. गणपतराव धनेश्वर वकील हेही अनेक वेळां आमच्या खेळांत सामील होत असून एकदां खेळांत जीजीनें मारलेल्या विटीच्या टोल्यानें धनेश्वरांच्या कपाळावर चांगलीच खोंक पडली व त्या व्रणानें आजही त्या सुखकारक जीवनाची स्मृति कायम राहिली आहे. प्लेग

संपून परत शहरांत रहावयास जावयाचें म्हणजे आम्हां मुलांना फार दुःखदायक वाटे; व फिरून प्लेग येऊन परत झोपडींत रहावयास जाण्याचा प्रसंग केव्हां येईल याचीच आम्ही वाट पहात असूं; प्लेगच्या कहरामुळें इतरांवर कितीही दुःखपरंपरा ओढवली, तरी आमच्या बाल-लीलापुढें त्यांची आम्हांस काय कदर !

अशा रीतीनें द्वारकाबाईचें मॅट्रीक पर्यंतचें शिक्षण नवीन मराठी शाळा व न्यू इंग्लिश स्कूल या शाळांमधून मुलांच्या बरोबरच स्पर्धेनें व ईर्षेनें झालें. त्यांच्या तीव्र बुद्धीचें व हुशारीचें शिक्षकांकडून फारच कौतुक होई व त्यांच्या संस्कृतमधील प्राविण्यामुळें जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप् करतां तयार केल्या जाणाऱ्या विद्यार्थ्यांमध्यें त्यांची निवडणूक केली. त्या मॅट्रीकच्या वर्गांत असतांना कमीत कमी सोळा वर्षे पूर्ण असल्याशिवाय मॅट्रिकला बसतां येणार नाहीं असा मुंबई युनिव्हर्सिटीचा नियम होता व द्वारकाबाईचें वय सोळा वर्षे पूर्ण होण्यास पंधराच दिवस कमी असल्यानें व ह्या बाबतींत शाळेंत परस्परच गवगवा जास्त झाल्या कारणानें आमच्या वडिलांनीं युनिव्हर्सिटीकडे अर्ज करून त्यांना नियमास अपवाद करून परिक्षेस बसण्याची परवानगी द्यावी अशी विनंति केली परंतु ती नाकारण्यांत आल्या कारणानें त्यांस दुसऱ्या वर्षी मॅट्रिकच्याच वर्गांत थांबावें लागलें. त्यामुळें त्यांच्या अंतःकरणावर एक प्रकारें विषण्णता आल्यामुळें त्यांना संस्कृतची जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप् मिळूं शकली नाहीं. तथापि १९१३ सालीं मॅट्रिक पास झाल्यानंतर त्यांस दळवी स्कॉलरशिप् मिळालीच. तसेंच मराठींतील प्राविण्याबद्दल 'परमानंद' पारितोपक मिळविलें व नंतर त्यांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रिव्हीअसच्या वर्गांत प्रवेश केला.

त्यांच्या अभ्यास करण्याच्या आठवणी फारच मनोरंजक आहेत. मुलींना कितीही उच्च शिक्षण दिलें तरी गृहकृत्यांत त्यांस आईस मदत करणें चुकत नाहीं. शाळेची वेळ झाली म्हणजे स्नान, जेवणें वगैरे आनुषंगिक कामाची गर्दी असली तरी आपलें वाचन व अभ्यास संपल्यावांचून आमच्या आरडाओरडीस त्या अगदीं दाद देत नसत. त्यामुळें आम्हां भावंडांत नेहमीं प्रेमाचीं भांडणें होत; विशेषतः घरांतील मुलींचीं कामें आईनें आम्हां मुलांनाच करावयास सांगितलीं म्हणजे मुलांमधील दुराभिमान जागृत होऊन एक प्रकारें मुलींचा हेवा वाटे. परंतु एकाच शिक्षणक्रमाच्या क्षेत्रांत मुलगे व मुली स्पर्धेस उतरलेल्या

असतां त्यांचा सम-समान दर्जा असतो, किंबहुना मुलींची बुद्धि जास्तच तीव्र व कुशाग्र असल्यास मुलांसही त्या मागें टाकतात या स्वानुभवानें स्त्री-पुरुष-समानतेच्या दर्जाचें बाळकडूच प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष आम्हांस आमच्या बाळपणापासूनच आमच्या माता-पितरांच्या गृहशिक्षणानें मिळालें होतें.

मनोरमाबाईनें कॉलेजमध्यें प्रवेश केला; व न्यू इंग्लिश स्कूलमधील एक नाणावलेली विद्यार्थिनी आपल्या कॉलेजमध्यें दाखल झाल्यामुळें फर्ग्युसन कॉलेजांतील आमच्या परिचित प्रोफेसरांसही एक प्रकारें आनंद झाला. आधींच आमच्या वडिलांच्या शिकवणीनें त्यांची इंग्रजी, मराठी व संस्कृत या भाषेंतील वाङ्मयाची अभिरुची वाढलेली, त्यांत कॉलेजच्या उच्च शिक्षणाची जोड मिळाल्यामुळें त्यांच्या सुसंस्कृत मनास जास्तच वाव मिळाला. निरनिराळया वाङ्मयांतील काव्यग्रंथ वाचून त्यांच्या बाळपणापासूनच्या कविता करण्याच्या स्फूर्तीस अवसर मिळाला. त्यांत फर्ग्युसन कॉलेजमधील सुप्रसिद्ध प्रो. वासुदेवराव पटवर्धन ह्यांसारख्या सहृदय व मार्मिक प्राध्यापकापासून स्फूर्ति मिळविलेली. वासुदेवरावांची काव्यग्रंथ शिकविण्याची हातोटी प्रसिद्धच आहे. सामान्य विद्यार्थ्यांसही काव्यांतील मर्म त्यांच्या शिकवण्यानें नसलें तरी त्यांच्या अभिनयानें तरी बिंबलेंच पाहिजे; त्यांत ज्यांच्या अंतःकरणांत काव्याच्या ऊर्मि आधींच तयार असत त्यांस उचंबळा मिळे यांत नवल नाहीं.

द्वारकाबाईनीं आपली पहिली कविता, ‘ पिकास उद्देशून ’ ही लिहिली. त्यांच्या पहिल्या पहिल्या कवितांत संस्कृत भाषेंतील कठीण शब्दांची योजना केल्यामुळें बोजड वाटते; परंतु खडकाळ वळणें सोडल्यानंतर पुढील प्रवाह जसा संथ वाटतो त्याचप्रमाणें त्यांचीं पुढील काव्यें सुलभ व सहजमधुर अशींच होत गेलीं. शब्दांचें अवडंबर कमी व भावना मात्र उचंबळून आलेल्या असें वर्णन त्यांच्या कवितांस लागू पडण्याजोगें आहे. कॉलेजमधील आमचे मित्र आमच्या घरीं नेहमी जमत; कधीं कधीं अनेक विषयांवर वादविवाद होत त्यांत द्वारकाबाई आस्थेनें भाग घेत. त्यावेळीं तरी द्वारकाबाईच्या काव्याचा आस्वाद घेण्याची आमची बाल-प्रवृत्ति तयार नसे; त्यामुळें काव्य म्हटलें कीं आमच्यांत बरेच तंटे होत. ध्येयवाद, वास्तववाद, चमत्कृतिजन्य कादंबऱ्या किंवा काव्यें ( Romances ) वगैरे अनेक विषयांवर वाद होत; त्यांस, शेंडा ना बुडखा. आमच्या त्या वेळच्या स्नेही मंडळींत सध्यांचे ज्ञान-

कोशकार श्री. यशवंतराव दाते, यवतमाळचे श्री. भालचंद्र वकील, एंजिनिअरींग कॉलेजमधील प्रो. लक्ष्मणराव कोल्हटकर, कोंकणांतील खोत व वकील हरीभाऊ भाटे वगैरे बरीच मंडळी असून कॉलेजमध्यें गेल्यानंतर श्री. श्रीधरपंत रानडे ह्यांचा आमचा नवा परिचय झाला; व तेही आमच्यांत सामील झाले. ते स्वत: 'श्रीधर' ह्या नांवानें कविता लिहीत व प्रसिद्ध करीत. द्वारकाबाईच्या कविता "कु. द्वारकाबाई हिवरगांवकर" किंवा "गोपिकातनया" या नांवानें प्रसिद्ध होत. या उभयतांच्या सहवासानें एकमेकांच्या काव्यास स्फूर्ति मिळे. फर्ग्युसन कॉलेजच्या टेकडीवर आज अनेक युव-युवती फिरावयास जातांना आढळतात. परंतु या टेकडीवर फिरण्यास जाण्याची प्रथा आम्हीच त्यावेळीं प्रथम पाडली. आम्ही कॉलेजच्या टेकडीवरून निघून वेताळावरून, चतुःशृंगीच्या पठारावरून खालीं गणेश खिंडींत उतरत असूं. हा फिरण्याचा कार्यक्रम बहुधा आठवड्यांतून एकदां तरी व्हावयाचाच. परंतु श्रीधरपंत-द्वारकाबाई हे इतके लांब फिरणें टाळून एका टेकडीच्या सपाट दरडीवर सूर्याच्या अस्तमानाची शोभा पहात तेथेंच वादविवादांत निमग्न होत असत. कॉलेजच्या टेकडीच्या ज्या दरडीवरून हे वादविवाद होत त्यांस पुढें त्यांच्या रसिक कवि स्नेही मंडळींनीं मोठ्या प्रेमानें 'कवि कातळ' असें नांव दिलें तें यथार्थ वाटतें. अशा रीतीनें या उभयतां कवि-कवियत्रींच्या निकट सहवासाचें रूपांतर प्रेमामध्यें होऊन उभयतांचे विवाह झाले व कु. द्वारकाबाई हिवरगांवकर सौ. मनोरमाबाई रानडे झाल्या.

मनोरमा-श्रीधर विवाह हा त्यावेळीं पुण्यांत एक विषयच होऊन बसलेला होता. प्रौढविवाह, ब्राह्मणांच्या ( देशस्थ-कोकणस्थ ) पोट जातींतील विवाह, कवि-कवयित्री विवाह, प्रेमोत्तर विवाह या अनेक वैशिष्ट्यांमुळें या विवाहाचें वेळीं वधूवरास शुभाशिर्वाद देण्यासाठीं फर्ग्युसन कॉलेजमधील सर्व प्राध्यापक व पुणें शहरांतील बरेच प्रमुख नागरीक व पुढारी उपस्थित होते.

ह्या दांपत्याचें काव्यमय मीलन झाल्यानंतर उभयतांच्या कविता व लेख प्रथम मासिक द्वारां व पुढें 'रविकिरण मंडळा मार्फत' प्रसिद्ध होऊं लागले. मनोरमाबाईच्या एक तपामध्यें लिहिलेल्या अनेक कविता त्यावेळच्यीं नियत कालिकें व वृत्तपत्रें यांत प्रसिद्ध होत. रविकिरणमंडळानें प्रसिद्ध केलेल्या 'किरण' 'उषा,' 'शलाका' व 'प्रभा' या पुस्तकांत त्यांच्या कांहीं कविता

प्रसिद्ध झालेल्या आहेत. शिवाय मनोरंजन, लोकमित्र, विविध ज्ञान विस्तार, सहस्रकर, उद्यान व महाराष्ट्र शारदा या मासिकांतूनही त्यांच्या कविता वारंवार प्रसिद्ध होत. अभिनव–काव्य मालेच्या तिसऱ्या व पांचव्या भागांत ही कांहीं प्रकाशित आहेतच. मात्र त्यांच्या समग्र कवितांपैकीं निवडक कवितांचा संग्रह संकलित करून छापण्याचा योग आजच येत आहे. रविकिरण मंडळाचे इतर सदस्य, नाना व जीजी ह्या शिवाय श्री. विठ्ठलराव घाटे, माधवराव पटवर्धन द. ल. गोखले, नाट्यछटाकार दिवाकर, कवि यशवंत, कवि गिरीश व ग. त्र्यं. माडखोलकर हे होत. आमच्या जीजीचें सर्व घर किंबहुना ती स्वयंपाकगृहांत गृहकृत्यांत गुंतली असतांही तें स्वयंपाकगृह देखील रविकिरणमंडळाच्या सदस्यांच्या वादविवादाचें स्थानच होऊन बसत असे. मला स्वत:स वडील संस्कृतज्ञ व भगिनी कवयित्री असतांही त्यांच्या काव्यार्णवांत निमज्जन करण्याची इच्छा फारशी कशी होत नसे, ह्याचें मला आज आश्चर्य वाटत आहे. या माझ्या वृत्तीबद्दल श्री. गर्गे मला नेहमीं विनोदानें म्हणत कीं आज जरी तुम्हांस काव्याभिरुची फारशी उत्पन्न झाली नसली तरी आयुष्यांत केव्हांतरी प्रसंग येईल कीं, तुम्हांस या संबंधीं आवड उत्पन्न झाल्याविना रहाणार नाहीं. तसें परिवर्तन आज अजाणतांच होत चाललें आहे कीं काय हें न कळे. वडील व भगिनी हे दिवंगत होऊन इतका कालौघ ओसरल्यानंतर आज, ज्याप्रमाणें अंतराळांत उंच उडालेल्या वैमानिकास पृथ्वीतलावरील खांच खळगे प्रामुख्यानें न दिसतां एकाच पातळींतील चित्र दृष्टीपुढें उभें राहून त्यामधील फक्त रम्य स्थळेंच दृग्गोचर होतात, त्याचप्रमाणें गत आयुष्यांतील खडतर प्रसंगाचें विस्मरण पडून असे सुखद प्रसंगच प्रामुख्यानें स्मृतिपटलावर उभे राहिल्यावांचून रहात नाहींत.

मनोरमाबाईच्या कविता समग्र व काळजीपूर्वक त्यांच्या निधनानंतर मीं वाचल्या व त्यांचा आस्वाद घेत असतांना रविकिरण मंडळाच्या त्यांच्या बैठकींचें स्वारस्य आपण स्वत:च अनुभवितों कीं काय असा मला भास होई. मनोरमाबाईच्या कवितासंबंधीं चर्चा करण्याचा अधिकार त्यांच्या समकालीन कवि मित्रांचाच आहे हें मी जाणतों परंतु त्यांसंबंधीं दोन शब्द लिहिल्यावांचून हें चरित्र–टिपण अपुरें वाटणार असल्यामुळेंच मी लिहिण्याचें धाष्टर्य करीत आहे. मनोरमाबाईच्या समग्र कवितांचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास, निस-

गांस उद्देशून, समाजक्रांतीवर, ज्यांत वैचारिक भावना उद्दीपित आहेत अशा, प्रेमगीतें, प्रासंगिक, शोकगीतें इत्यादि असें करतां येईल, त्यांच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध कवितांपैकीं बऱ्याचशा कविता आपल्याच आयुष्यांतील स्वानुभवावरून लिहिल्या गेल्या आहेत असेंच म्हणणें यथार्थ होईल. बालपणापासून निसर्गामध्यें रममाण होऊन फुलें, पक्षी व वनश्री ह्यांचा आस्वाद घेण्याची संवय त्यांस असल्यामुळें, 'पिकगान', 'काननीं जाऊनी राहू', 'चांदणी', 'वायू व फुलवेल', 'रम्य भुवन' 'विनवणी' वगैरे कवितांमध्यें त्यांची ही निसर्गप्रिय मनोवृत्ति दिसून येते. त्यांची कविता अत्यंत साधी व भावनाप्रधान असे. अंतःकरणांत विचारांचें काहूर माजलें असतांना लिहिलेल्या त्यांच्या कविता फारच परिणामी असत. सुखदुःखांचीं आंदोलनें वर्णन करण्याची त्यांच्यासारखी शैली फार थोड्या कवयित्रींमध्यें दिसून येईल. 'पुरे पुरे गे हंसणें' या कवितेमध्यें सुखामागें दुःख हें ठेवलेलेंच या कल्पनेनें सीमेपलीकडे आनंद मानण्यांत काय अर्थ असें त्यांनीं या काव्यांत ध्वनित केलें आहे. 'निराशेंतील इच्छा', 'लिहूं कुणावर कविता' वगैरे अनेक कवितांतून अंतःकरणांत दडून बसलेल्या नैराश्याचेच सूर प्रतिबिंबित झालेले दिसतात. व आयुष्याच्या ध्येयाकडे धांवत असतां आपण ख-पुष्पाचीच इच्छा धरतों कीं काय, असेंच विचार त्यांच्या अनेक कवितांतून दिसून येतात.

त्यांनी लिहिलेलीं प्रेमगीतें, "पावा' 'मुरलीस्वन', 'प्रेम-कलहांतरितेचें पत्र' 'भूवरील स्वर्ग' 'स्मृतिमंजुषा' इत्यादि मात्र फारच उत्कृष्ट वाटतात. त्यांचें आपल्या मुलीवर फारच प्रेम असे व कविवर्गास फुलें व मुलें फारच प्रिय असतातच! त्यामुळें मनोरमाबाईनीं नाना व सुधा ह्यांस उद्देशून, 'झोंपेंत हंसणाऱ्या सुधेस,' 'सुधा व फूल' यांवर लिहिलेल्या कविता फारच प्रेमळ वाटतात.

कांहीं प्रासंगिक कविताही त्यांनीं लिहिलेल्या आहेत. उदाः—श्री. तापीबाई हर्डीकर बी. ए. मध्यें दुसऱ्या वर्गात पास झाल्यामुळें त्यांचें अभिनंदन करण्यासाठीं, डॉ. पां. दा. गुणे ह्यांचे स्वागतार्थ, १९१४ सालीं स्त्रियांची सामाजिक परिषद भरली त्याकरितां, प्रो. कर्वे ह्यांच्या १९१८ सालच्या वाढदिवसाच्या समारंभाकरितां, अशा अनेक सांगतां येतील. परंतु अशा प्रासंगिक कविता हें हुकमी लिखाण असल्याकारणानें त्या केव्हांही इतर काव्यापुढें गौणच वाटणार. आधुनिक विद्यार्थिनीच्या नाजुकपणावर टीका करण्यासाठीं "एक विद्यार्थिनी"

लिहिली. या कवितेंत अशा विद्यार्थिनी देशाच्या स्वातंत्र्यसंग्रामांत काय उपयोगी पडणार अशी पृच्छा त्यांनीं केली. हें वर्णन आजच्या कॉलेजच्या विद्यार्थिनींसही चांगलेंच लागू पडतें.

कोणत्याही काव्याचा किंवा कोणत्याही नाटकाचा अंत:करणावर खोल परिणाम होणार असेल तर तो दुःखभावनांच्या वर्णनांचाच होय. मनोरमाबाईच्या अशा मनःस्थितींत लिहिलेल्या कविता यामुळें जास्तच परिणामकारक झालेल्या आहेत. नाना कॉलऱ्यानें आजारी असतां तो सर्व दिवस आम्हांस किती भयंकर गेला असेल ह्याची आठवण झाली तर आजही अंगावर शहारे येतात. कॉलऱ्याचें दुखणें झपाट्यानें शरीर शोषण करणारें. पळापळानें रोग्याचे डोळे खोल खोल चाललेले, रोग्याची शक्ति हरघडी क्षीण होत चाललेली. आमचे अण्णा हताश होऊन श्री. नरहरीचे मूर्तीपुढें कपाळावर हात ठेवून धांवा करीत बसलेले. बिचारी जीजी नानांच्या कपाळावर हात ठेवून आशा निराशेच्या मिश्र भावनांनीं हेलकावे खात तेथेंच बसलेली. मी मात्र 'सलाईन' इंजेक्शनचें भांडें उंच धरून तासचे तास उभा ! हें सर्व भीषण चित्र पुढें असतां बिचाऱ्या जीजीच्या अंतःकरणाची कशी कालवा कालव त्यावेळीं होत असेल याची कल्पनाच करवत नाहीं. "काळाच्या दाढेंतून" नाना सुखरूप बाहेर पडले. परंतु जीजीनें नाना या कॉलऱ्यांत आजारी असतां उद्विग्न स्थितींतच लिहिलेल्या ओळी फार सुंदर वठलेल्या आहेत.

मनोरमाबाईच्या कॉलेजमधील मैत्रिणीपैकीं सर्वांत प्रिय मैत्रिण म्हणजे सौ. वेणूबाई मोडक एम्. ए.; एस्. टी. सी. (त्यावेळच्या कु. वेणूबाई केळकर) ह्या होत. वेणूबाई केळकरांनाही कविता करण्याची आवड असल्यामुळें व दोघी मैत्रिणींचीही रहाणी साधी, स्वभाव प्रेमळ व आवडीनिवडी सारख्या, यामुळें त्यांची मैत्री दृढ झाली. आमच्या घरीं प्रसिद्ध कादंबरीकार श्री. हरीभाऊ आपटे हे वडिलांच्याकडे ज्यावेळीं येत त्यावेळीं 'आपण त्यांचेपुढें चांगलें वागलें पाहिजे, नाहींतर आपण त्यांच्या कादंबऱ्यांत जाऊन बसूं' असें जीजी नेहमीं विनोदानें म्हणे. सुधेच्या जन्मानंतर आमच्या आईच्या सांगण्यावरून जोगेश्वरी देवीस वहाण्यास नाडापुडी घेऊन जीजी तांग्यांतून गेली असतां, आम्ही तिची बरीच चेष्टा

केली कीं, ' शिकलेल्या मुलीसुद्धां नाडापुडीवर विश्वास ठेवतात तर. ' तिनें ही अशी भीति दर्शविली कीं न जाणों एखाद्या बातमीदारानें मला अशा स्थितींत पाहिलें तर तेवढेंच अच्युतराव कोल्हटकरांच्या "संदेश"मध्यें "सौ. मनोरमाबाई रानडे जोगेश्वरीस नाडापुडी नेतात" अशी मोठ्या टाइपांत बातमी यावयाची. असे अनेक साहित्यिक कोटीक्रम मनोरमाबाईच्या तोंडून ऐकण्यास आम्हांस मोठी मौज वाटे. नाना कॉलऱ्याच्या भयंकर आजारांतून उठल्यानंतर आमच्या आईनें जीजीकडून देवीस खणानारळानें ओटी भरून हळदीकुंकू लुटविलें. अशा कुंकवानें माखलेल्या हातानेंच जीजी कॉलेजमध्यें गेली. तिचे हात पाहून वेणूबाईनें तिला बरेंच खिजविलें. परंतु जीजीनें त्यांस सर्व हकीकत सांगून जें मार्मिक उत्तर दिलें तें तिच्या सर्व आयुष्याचें गमक होतें असें म्हटलें पाहिजे. तिनें सांगितलें कीं, "आईनें हळद कुंकू नेण्यास सांगितलें होतें. आपला विश्वास असो वा नसो. परंतु बारीक सारीक गोष्टींत आपलें निश्चित ध्येय न सोडतां वडिलांस खुष ठेवण्यास काय हरकत आहे. ज्यावेळीं फक्त मोठ्या तत्त्वांचाच प्रश्न येईल तेव्हां मात्र त्यापासून आपण च्यूत होऊं नये म्हणजे झालें." अशा अनेक मनोरंजक आठवणी त्यांच्या जीवन चरित्रांतील देतां येतील परंतु विस्तारभयास्तव हात आंखडणें भाग पडत आहे.

मनोरमाबाई १९१७ सालीं बी. ए. झाल्या. श्री. नाना रानडे ह्यांस आपला कॉलेज कोर्स संपल्यानंतर नोकरीनिमित्त सुरत, मुंबई व पुणें येथें वेळोवेळीं रहावें लागलें. नाना एम्. एस्. सी. च्या परिक्षेंत उच्च वर्गात पास होऊन त्यांस मूस सुवर्णपदक मिळालें व एकंदर त्यांच्या शिक्षणखात्यांतील नोकरीस चांगलेंच स्थैर्य आलें. प्रथम नानांस नोकरीनिमित्त बरेच इकडे तिकडे हिंडावें लागल्याकारणानें, मनोरमाबाईंचे श्वशूर (दादासाहेब) हे इस्लामपूर येथें वकिली करीत असतां तेथेंच मनोरमाबाईंचें बरेच वेळां रहाणें पडे व त्यामुळें त्यांच्या ऱ्याचशा कविता इस्लामपूर येथें रहात असतांना रचल्या गेल्या असें आढळून येईल.

मनोरमाबाई या फारच कोमल अंतःकरणाच्या असत. त्यांच्या वडिलांवर आलेल्या कौटुंबिक आपत्तीमुळें व त्याच समयास त्यांचीं दोन प्रेमळ भावंडें काळानें ओढून नेल्यामुळें त्यांच्या हळुवार अंतःकरणास फारच मोठा धक्का बसला. आमचा लहानगा भाऊ " वसंत " यास बागेंत हिंडून फुलपांखरें धर-

ण्याचा फार नाद असे. याच्या निधनामुळें त्यांस फार दु:ख झालें. याच समयास पुणें येथील मलेरिया व इतर तापाच्या सांथींनीं त्यांचें शरिरास ग्रासिलें. १९२५ सालच्या मे महिन्यांत इस्लामपूरला त्या हवापालट करण्यासाठीं राहण्यास गेल्या. परंतु शारीरिक व मानसिक स्वास्थ्य त्यांस न लाभतां त्यांचा रोग बळावतच गेला. या समयीं त्यांनीं इस्लामपूरला रचिलेल्या कविता त्यांच्या मन:स्थितीची साक्ष देतात. " मना आतां कां " या कवयित्रीच्या अपूर्ण राहिलेल्या कवितेंतही त्यांच्या अंत:करणांत उत्पन्न झालेलें नैराश्यच दृग्गोचर होतें. अशा अनेक निराशेच्या भरांत लिहिलेल्या कवितांची छाननी करणें म्हणजे दु:खद स्मृति उकरून काढणेंच होय. जीजींची प्रकृति यानंतर कधींच चांगली झाली नाहीं. अहमदनगर व इस्लामपूर येथील हवेचा परिणाम ही त्यांस फारसा मानवला नाहीं त्यामुळें त्या परत मुंबईस गेल्या. तेथेंच गरोदर स्थितींतच ह्या वाढत्या रोगाचें रक्तक्षयांत रूपांतर होऊन त्यांतच त्यांचा अंत ता. १३ जानेवारी १९३६ रोजीं झाला.

बलवन्ताश्रम,
अहमदनगर
शनिवार १८ मार्च १९३९

**रा. ब. हिवरगांवकर**

# एक आठवण

'—सहजचि होतिल बालवयींच्या आठवणी; हृदय विदारुनि दावुं कुणाला सुखासुखाच्या सांठवणी.'

जुन्या आठवणी नेहमींच रमणीय असतात. त्यांतूनहि विद्यार्थीदशेंतलें निष्काळजी आयुष्य, प्रेमळ मैत्रिणी, हृदयाची पकड घेणारे अनेक संस्मरणीय प्रसंग, हवेंत उभारलेले मनोरथांचे किल्ले, यांच्या आठवणींनीं तन्मय होऊन हृदयाला सुखसंवेदना झाल्यावांचून रहात नाहीं. आपल्या जीवनाशीं निगडित असणाऱ्या एकाद्या दिवंगत व्यक्तीच्या साहचर्याचे ते सुखकर दिवस आठवून आपुलकीचें समाधान झाल्यावांचून रहात नाहीं.

द्वारकाबाईची व माझी मैत्री कशी झाली हें इतक्या कालावधीनंतर नक्की सांगतां येणें शक्य नाहीं. मी फर्ग्युसन कॉलेजांत इंटरच्या वर्गात असतांना त्या प्रीव्हियसच्या वर्गात दाखल झाल्या. मी त्यावेळीं एकदोनच कविता लिहिलेल्या होत्या पण मला काव्यवाचनाची फार आवड असल्यामुळें व त्या कवयित्री असल्यामुळें प्रथम ओळख होऊन त्या ओळखीचें पुढें उत्कट मैत्रींत पर्यवसान झालें. आम्ही दोघींनीं एकमेकींचा हात धरून वाङ्मयमंदिरांत प्रवेश करण्याचा संकल्प केला. दुर्दैवानें त्या संकल्पाची परिपूर्ति होण्याचा योगायोग आला नाहीं.

त्यावेळीं 'उद्यान' नांवाचें एक मासिक निघत असे. मी त्याची वर्गणीदार होतें. त्यांतलें एकदां एक कोडें मी सोडविलें. बरोबर उत्तराला वीस रुपये बक्षिस होतें. तें बक्षिस मलाच नक्की मिळणार अशी खात्री वाटत असल्यामुळें मी ऐटींत त्या पैशांची मैत्रिणींना जंगी पार्टी देण्याचें कबूलहि करून टाकलें. द्वारकाबाईनीं तो अंक वाचायला मागून नेला होता. त्यांतल्या कुपनावरच उत्तर पाठवायचें असल्यामुळें मी दररोज तो अंक आणा म्हणून त्यांच्या मागें लागावें व त्यांनीं 'विसरलें उद्यां जरूर आणीन' म्हणून सांगावें. उत्तर पाठवायचा शेवटचा दिवस येऊन थडकला. अंक आणण्याविषयीं त्यांना बजावून सांगितलें व दुसरे दिवशीं वाट पहात बसलें. घंटेच्या वेळीं घाईघाईनें येऊन त्यांनीं अंकाच्या ऐवजीं एक कवितेचा कागद माझ्या हातांत दिला. कवितेचें नांव 'उद्यान हरवलें' असें होतें !

अभिनव काव्यमालेच्या तिसऱ्या भागाच्या जुळवाजुळवीचें काम सुरू होतें. कांहीं कवयित्रींच्या कविता मिळाव्या या हेतूनें रा. गर्गे यांनीं कॉलेजांत येऊन द्वारकाबाईंची भेट घेतली. त्यांनीं आपल्या कांहीं कविता तर दिल्याच पण माझीहि एकादी कविता मिळवून देण्याचें त्यांना अभिवचन दिलें. माझ्याजवळ तर देण्यासारखी एकहि कविता नव्हती. दुपारीं तास मोकळा असल्यामुळें आम्ही दोघी रेसिडेन्सींत गप्पा मारीत बसलों होतों. त्या म्हणाल्या ‘ मला आतां पुढचा तास आहे पण तुम्हांला मोकळाच आहे. तर मी परत येईपर्यंत एक कविता लिहून ठेवा ना ?’ आणि खरोखरीच मी नाहीं होय म्हणावयाच्या आंत कागदपेन्सिल माझ्यापुढें टाकून खोलीच्या दाराला बाहेरून कडी घालून वर्गाला निघूनसुद्धां गेल्या. कोंडून पडल्यामुळें नुसतें बसून तरी काय करायचें म्हणून एक कविता लिहिली. तिचें शेवटचें कडवें अर्धेंच कोटें होतें आहे तों घंटा झाली. ‘ द्वारकाबाई कडवें अर्धेंच राहिलें हो ’ असें खालीं लिहून ठेवून कोणीतरी दार उघडतांच घाईघाईनें वर्गाला निघून गेलें. ‘ मी पुरें करतें हं ! ’ असें खालीं लिहून त्यांनीं कडवें पुरें केलें व वरीं गेल्या. दुसऱ्या दिवशी ती कविता—सायंतारा—त्यांनीं गर्ग्यांना देऊनहि टाकली. भर दुपारीं त्या सायंतारेचा उदय झाला. अशा रीतीनें मला मारून मुटकून तात्पुरती कवयित्री बनविण्याचें व माझ्या पहिल्याच कवितेच्या प्रसिद्धीकरणाचें श्रेय सर्वस्वी द्वारकाबाईंनाच दिलें पाहिजे.

सौ. **वेणूबाई मोडक**, एम्. ए.

अहमदनगर.

---

## श्री महाराष्ट्र शारदामंदिर ( १९२१ )



गिरीश, यशवंत, अत्रे ( केशवकुमार ), य. म. गद्रे, माधवजूलियन्, वि. द. घाटे,

रविकिरणमंडळ ( १९२३ )



गिरीश, दिवाकर, यशवंत, माधवजूलियन् , माडखोलकर, मनोरमा, गोखले, श्रीधर.

## ( विठ्ठल दत्तात्रय घाटे )

प्रिय भगिनी मनोरमाबाई रानडे यांच्या स्मृतीस हा कृतज्ञतेचा व प्रेमाचा तीलांजलि देतांना मला अत्यंत खेद होत होत आहे. मनोरमाबाईंच्या स्वयंपाकघरांत त्यांच्या चुलीपाशीं रविकिरणमण्डळाचा जन्म झाला व मनोरमाबाईंच्या निधनानंतर खरेखुरें मण्डळ नामशेष झालें. मनोरमाबाईंनीं मण्डळाच्या जन्मकालीं त्याची जोपासना सुधाकुंदांच्या जोपासनेप्रमाणें वत्सलभावानें केली. त्यांचें घर म्हणजे मण्डळाच्या सदस्यांचें एक "शांतिस्थान" होतें. संसारतापानें जीव पोळलेल्या सदस्यांनीं या स्थानाचा आसरा करावा. मानेवर जूं बसलेल्यांनीं, क्षणभर तें जूं दूर झाल्यावर मनोभावानें मनोरमाबाईंकडे धांव घ्यावी.

मनोरमाबाईंच्यांत संयम होता. त्यांचें बोलणें मोजकें असे पण करणें भरपूर असे. त्यांच्यावर एक फार मोठी जबाबदारी होती. त्यांनीं प्रेमविवाह केला होता. त्यावेळचा समाज अशा विवाहांकडे संशयी दृष्टीनें पहात असे. उलट त्यावेळची तरुण मण्डळी रानडे–दाम्पत्य एक आदर्श म्हणून समजत होती. वृद्धांना संशयाला जागा द्यावयाची नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांचा विश्वास व आदर संपादन करावयाचा व त्याबरोबर तरुण पिढींत त्यांच्या जबाबदारीची व कर्तव्याची जाणीव उत्पन्न करावयाची, आपल्या सरळ साध्या वागणुकीनें त्यांना कित्ता घालून द्यावयाचा, अशा दोन प्रकारच्या भूमिका मनोरमाबाईंच्या पुढें होत्या. त्यांनीं यश संपादन केलें. त्या आधुनिक झाल्या पण थिल्लर किंवा उथळ झाल्या नाहींत. कॉलेजांतील आपल्या बरोबरीच्या तरुणाशीं विवाह करण्यांत त्यांनीं जितकें धैर्य दाखविलें तितकेंच त्यांनीं आपल्या वैवाहिक जीवनांत पतीविषयीं निस्सीम भक्ति व मुलींविषयीं निर्भर वात्सल्य दाखविलें. पतीचें शिक्षण पुढें चालावें म्हणून त्यांनीं नोकरी केली, गरिबी पत्करली, गैरसोई सहन केल्या व मन स्थिर ठेविलें. तशा त्या तरुण वयांत मनोरमाबाई "पुरंध्री" होत्या.

मनोरमाबाईंचा काव्यसंग्रह रसिकांपुढें आहे. ते तो वाचतील व त्याविषयीं आपलें मत बनवतीलच. मला त्याविषयीं कांहीं सांगावयाचें नाहीं. कदाचित्

मनोरमाबाईंचें काव्य श्रेष्ठ दर्जाचें ठरणार नाहीं. मला त्याचा विषाद वाटणार नाहीं. त्यांची व्यक्ति व त्यांचें जीवन त्यांच्या काव्याहून कितीतरी महनीय होतें आणि त्यांचें मरण तर त्याहून सुंदर—त्याहून शांत—त्याहून पवित्र !

मनोरमाबाईंचें जीवन म्हणजे एक काव्य होतें—महाकाव्य होतें. तें उदात्त महाकाव्य—महाभारत तीस वर्षे जगून त्या अकालीं विराम पावल्या. बऱ्याच उशीरां कां होईना पण त्यांचा काव्यसंग्रह आज प्रसिद्ध होत आहे. तो रसिकांपुढें अनावरण होत असतां मी येवढेंच म्हणेन,

"जगावें तर असें, प्रेम करावें तर असें."

वि. द. घाटे

## ( माधव जूलियन् )

......जिजींचें नांव निघालें ( कै. मनोरमाबाई रानडे यांना आम्हीं 'जिजी' म्हणत असूं ), जिजींचें नांव निघालें कीं पंधरा सोळा पूर्वींचा तो रम्य काळ डोळ्यापुढें उभा राहतो. तो काळ पुन्हां कधींहि येणार नाहीं; तसेंच त्याचें स्मरणहि कधीं बुजणार नाहीं. काव्यमय स्वप्नसृष्टींत तरङ्गण्याचा आणि लोकमताचा बाऊ न करितां योग्य वाटेल त्याप्रमाणें निडर वागण्याचा काळ होता तो. आळीपाळीनें एकमेकांच्या घरीं आम्हीं साप्ताहिक चहाचर्चेला जमत असूंच; पण अधिकांत अधिक वेळां नि 'सहज' जर कुठें भेटत असूं तर नानांच्याकडे. प्राध्यापक श्रीधर बाळकृष्ण रानडे म्हणजेच 'नाना' होत. या रानडे दम्पतीविषयीं ज्याला कधीं हृद्य कुतूहल वाटलें नाहीं असा तरुण त्या काळीं क्वचितच असेल. त्यांचा विवाह म्हणजे महाराष्ट्रांत अभूतपूर्व असा प्रेम-विवाह झालेला होता. त्यांचें नांव मी बडोद्यासच ऐकिलें होतें. पुण्यास आल्या-वर मी ज्या वसतिगृहांत राहिलों त्याच ठिकाणीं तिसऱ्या मजल्यावर रानडे रहात होते. तेथें मी जिजींना प्रथम पाहिलें. पण माझी ओळख कोणाशींच झाली नाहीं. ती ओळख, पुढें आम्हीं निरनिराळ्या ठिकाणीं रहायला गेल्या-नंतर नाट्यछटाकार दिवाकर यांनीं करून दिली. याच सुमारास कवींचा परस्परांशीं परिचय होऊन काव्यचर्चा व्हावी म्हणून महाराष्ट्र-शारदा-मंदिराची स्थापना करण्यांत आली होती. सदाशिव पेठेच्या हौदावरून जाणाऱ्या रस्त्या-वर रास्ते यांच्या राममंदिराच्या जागेंत रस्त्यावरील माडींत या मण्डळाच्या बैठकी होत असत. तेथें कांहीं रविवारीं मी गेलों असतां रानडे दंपतींच्या सम-वेत गिरीश, यशवन्त, माडखोलकर इत्यादिकांची ओळख झाली. पुढें या साप्ताहिक बैठकींना कांहीं ठराविकच सात-आठ जणें उपस्थित असत असें दिसून आलें. पुढें हीं सात-आठ जणें मंदिराच्या ठिकाणीं न भेटतां आळीपा-ळीनें एकमेकांच्या घरीं चहाचर्चेला जमूं लागलीं. या रविवारच्या चहाचर्चेच्या बैठकीला 'सण्टी' ( Sun-Tea ) असें नांव असे.

काव्यरसग्रहणांत जिजी या इतर सदस्यांइतक्याच उत्सुकतेनें भाग घेत असत; पण चर्चा त्या फारशी करीत नसत. तथापि या बैठकींना नि मण्डळाला

घरगुती नि कौटुम्बिक असें स्वरूप आणून देण्याचें कार्य जें पुरुषाला साधणें शक्य नाहीं तें त्यांनी केव्हां नि कसें करून टाकिलें तें आमच्या ध्यानांतहि आलें नाहीं. त्या मानी होत्या पण माणूसघाण्या नव्हत्या. त्या फार बोलत नसत; पण बोलत तें मन मोकळें करून बोलत. मण्डळांतील व्यक्ती या मीठभाकरीहि गोड करून घेणाऱ्या आहेत हें त्यांनी जाणिलें होतें; आणि मग आपण कांहीं विशेष करीत आहों असें यत्किंचित् हि भासूं न देतां त्या उत्तम पाहुणचार करीत. मण्डळाच्या एक दोन व्यक्तींना तर त्यांनी वडील बहिणीच्या—छे ! जवळ-जवळ आईच्या प्रेमानें वागवून त्यांच्या जीवितांत थोडी हिरवळ रुजविली होती; आणि एक सदस्य तर जिजींना क्वचित् प्रसङ्गीं 'माताजी' या नांवानेंहि सम्बोधीत. पण हा भाव जिजी शब्दांनी कधीं व्यक्त करीत नसत. त्यांच्या लहान सहान शेंकडो कृतींत तो दिसे; डोळसांनीं पाहून घ्यावा. अशा माणसाविषयीं वाटणारी कृतज्ञता ही सुद्धा कृतींनींच व्यक्त करावयाची असते. शब्दांनीं ती व्यक्त करणें फार अवघड जातें.

एकच गोष्ट सांगतों. 'अभागी कमल' ज्या दिवशीं प्रकाशित झालें त्या दिवशीं संध्याकाळीं पहिली प्रत घेऊन गिरीश हे गायकवाड–वाड्यांत नानांच्या-कडे आले होते. त्या रात्रीं ते कोणातरी नातेवाईकाकडे जेवून दुसऱ्या दिवशीं गांवाला जाणार होते. त्यांची मंडळी देहूला गेली होती. प्रकाशनासाठीं हीच मिति कां हो निश्चित केली असा सहज कोणीतरी प्रश्न केला. गिरीश म्हणाले, 'आज माझा वाढदिवस आहे.' 'छे ! मग आज तुम्ही इतरत्र कोठें न जेवतां इथेंच जेविलें पाहिजे असें तत्काळ जिजींनी आग्रहपूर्वक सांगितलें आणि मंडळाच्या जवळपास रहाणाऱ्या सदस्यांनाहि बोलवायचें ठरलें. रात्रीं ११ वाजतां आम्ही सुग्रास भोजन करून उठलों. नन्तर उष्टींखरकटीं करून जिजी जेवायला बसणार, तेंव्हां आम्ही म्हटलें, 'तुम्ही बसा आतां जेवायला, आम्ही करितों सारें.' त्यांना तें पटलें नाहीं. जुन्या वळणाच्या सुगृहिणीप्रमाणें त्या वागल्या.

आणि त्या तशा थोड्या जुन्याच होत्या. त्या पदवीधर होत्या पण नवमत-वादी नव्हत्या. त्या सुधारक होत्या पण सनातनी सुधारक होत्या. साम्प्रतचें लैंगिक स्वातंत्र्य, ज्या विषयीं बहुशः बडबडच भारी असते तें, त्यांना कितपत रुचलें असतें याची शंका वाटते. प्रेम हें एकदाच नि एकाच माणसावर जडूं

शकतें ही त्यांची केवळ काव्यमय समजूत नव्हती. ती त्यांची उत्कट श्रद्धा होती. या श्रद्धेच्या सोशीक बळावरच त्यांनीं आपल्या विवाहाच्या मार्गातील अडथळे दूर करून घेतले होते. जिजींची जीवनकक्षा ही नानांच्या जीवनकक्षेहून व्यापक वा अलग होणें शक्य नव्हतें. स्त्रिया विवाहोत्तर आपल्या जिवाभावाच्या मैत्रिणींना सुद्धा विसरतात असा अनुभव येतो. जिजी तशा स्वयंकेन्द्रित नव्हत्या, त्या आपल्या कुटुम्बाशीं समरसल्या होत्या, बाहेरच्या जगाशीं त्या इतरांशीं फारशी चर्चा करीत नसत तरी त्या इतरांविषयींच्या आपल्या कर्तव्याला जागत आणि उदासीन तर कधींच नसत. आपल्यामुळें एखादा संकटांत सांपडून त्याला कांहीं अन्याय झाला तर आपण नामा निराळें स्वस्थ रहाण्याची व्यावहारिक नीति त्यांच्या ठायीं नव्हती. आपलें उत्तरदायित्व ओळखून त्या व्यक्तीची शक्य ती भरपाई करण्यास त्या आपण होऊन पुढें येत असा त्यांच्याविषयीं लौकिक नव्हे तर अनुभव होता. अशा सुगृहिणीच्या शीतल वातावरणांत रविकिरणमंडळाचीं तीं तीन–चार वर्षे फारच खेळीमेळीचीं नि सुखाचीं गेलीं. त्या गेल्या नि मंडळ पोरकें झालें.

टापटीप त्यांना आवडे नि ती त्या शक्य तितकी ठेवीत. पण नटवेपणा त्यांना आवडत नसे. उसनें शृङ्गारसौन्दर्य हें हास्यास्पदहि होतें. मनः सौन्दर्याच्या प्रभावावर त्यांचा भाबडा भाव होता. पण पुढें पुढें रूपसौन्दर्याचें महत्त्वहि त्यांच्या ध्यानांत येऊं लागलें होतें असें त्यांच्या उद्गारांवरून दिसे. इतरांच्या रूपलावण्याचा त्यांनीं कधीं हेवा केला नाहीं. त्या योग्य तें कौतुकच मनःपूर्वक करीत असत. ही मनःपूर्वकता त्यांच्या काव्यांत आढळते. जिजीच्या स्वभावाचें उत्तम प्रतिबिम्ब त्यांच्या काव्यांत पहायला मिळतें आणि तें काव्य आतां रसिकापुढें आहेच. तेव्हां हातच्या कांकणाला आरसा कशाला ?......

ता. २५ मार्च १९३९
निवान्त, पुणें ४

**माधवराव पटवर्धन**, पुणें.

## ( दत्तात्रेय लक्ष्मण गोखले )

नाट्यछटाकार दिवाकर यांच्या अप्रसिद्ध दैनंदिनींत कांहीं मनोरंजक उल्लेख आहेत.

२६ जुलै १९२२ ला कविकातळावर व नंतर रानडे यांचे घरीं. ३-८-१९२२ रोजीं. रा. गोखले यांचे बरोबर रानडे यांचे घरीं व ४-८-१९२२ रोजीं रा. गोखले यांचें नाटक वाचलें. कवि रानडे, रा. गोखले व मी असे तिघे फिरावयास गेलों. ३ सप्टेंबरला नेपियर सिनेमांतील चित्रपट पहावयास गेलों. १७ डिसेंबर गोखले आले. आम्ही दोघे कवि रानडे यांजकडे गेलों.

१२ जानेवारी १९२३ रानडे यांचे घरीं पंक्तीला, १८ जानेवारीस गिरीश यांचे घरीं रे. टिळकांच्या मृत्युदिनादिवशीं सौ. रानडे, व गोखले वगैरे जमले होते.

९ मार्च व नंतर २५ ला त्यांच्याबरोबर फर्ग्युसनच्या बागेत फुटाणे खाल्ले.

८ एप्रीलच्या नंतर २१ जून १९२३ श्रीधरपंत रानडे व दत्तोपंत गोखले येऊन गेले. त्या '—विषयीं' प्रकरणांतील आठवणी वाचल्या.

२४ जून प्रो. पटवर्धन यांजकडे माडखोलकरांचे वडील वारल्याचें कळलें.... गोखले असे पांचजण होतों.

१४ ऑक्टोबर १९२३ रात्रीं आर्यन सिनेमास गिरीश, रानडे, गोखले, सौ. रानडे व सौ. कानेटकर गेलों.

५ जानेवारी १९३१ डेक्कन जिमखान्यावर प्रो. श्रीधरपंत रानडे यांजकडे. ( सौ. रानडे भेटल्या ). प्रो. द. ल गोखले व त्यांचें कुटुंब भेटलें.

( उतारा गर्गेबंधू ग. गो. दिवाकर यांच्या कृपेनें )

दत्तात्रेय लक्ष्मण गोखले उर्फ अण्णासाहेब हे हल्लीं सांगली संस्थानांत विद्याधिकारी आहेत. 'हल्लीं परीक्षांचा हंगाम चालू असल्यामुळें ते जरासे गडबडींतच आहेत व आतांशा त्यांची प्रकृति नीट रहात नाहीं. तेव्हां कृपा करून त्यांना excuse करा' अशा आशयाचें सांगलीहून त्यांच्या पत्नी सौ. चंपूताई गोखले यांचें २६ मार्च १९३९चें इंग्रजी पत्र आलें. रविकिरणमण्डळाच्या सुरवाती-

गोदर त्यांचें–माधवजूलियनमुळें–रानडे दंपतीशीं संबंध आलेले,
तवासी यांनीं लिहिलेल्या 'गडे सुधेस' या कवितेच्या शीर्षकावर
सुधा यांचा फोटो छापलेला; कविकातळावरील विहारांत, बनेश्वर,
थील सहलींत भाग हौशीनें घेतलेला, रानडे व गोखले यांच्या एक-
बादल' या टोपण नांवानें लघुकथा ज्ञानप्रकाश व शलाका यांत
ल्या; जीवास विरंगुळा पडण्यासाठीं माधव जूलियन बरोबर तापी-
रतेस आल्यावर मनोरमाबाईंनीं सांत्वन केलेलें; एवढेंच काय पण
ईंच्या कवितेचें संपादन स्वतः करण्याचा त्यांचा तो पूर्वीचा दुर्दम-
ह इत्यादि अनेक गोष्टी आठवल्या म्हणजे रा. गोखले यांना मनो-
ाषयीं काय वाटत होतें व अजूनही असेल याची कल्पना येते.
करी शिक्षण घेतलेला वीर स्वतःच्या भावना खोल पुरून टाकतो.
ांतच काय पण शब्दांतही व्यक्त करणें त्याच्या जिवावर येतें. गोखले
ाव पूर्वीपासून मिडस्त, अबोल व विन्मुख असा आहे. पूर्वपरिचित
यांचें पत्र व भेट म्हणजे अलभ्य लाभ आहे. त्यांची मनोवृत्ति व भावना
थतप्रज्ञ मौनांतच आहेत. मनोरमाबाईंविषयींच्या त्यांच्या भावना
रतां पुढील कागद कोरा ठेवणें हेंच या प्रसंगीं उचित आहे.

— ( श्रीधर )

# [ दिवाकर ( शंकर काशिनाथ गर्गे ) ]

१ आक्टोबर १९३१ रोजीं दिवाकर निवर्तले. १९११ त प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं फर्ग्युसन टेकडीवर ओळख करून दिल्यापासून त्यांचा रानडे कुटुंबाशीं जो घरोबा होता त्याची नोंद त्याच्या रोजनिशांत किंवा महत्त्वाच्या तारीखवार टाचणांत आढळते. व पुढें मागें रोजनिशा प्रसिद्ध झाल्यावर त्या नोंदींचें महत्त्व कळून येईल. ज्या ज्या वेळीं रा. दिवाकर घरीं येत त्यावेळीं मिळेल तितका वेळ सौ. रानडे यांच्याशी गप्पा मारण्यांत व हक्कानें चहाचा पेला मागून त्याचा स्वाद घेण्यांत घालवीत. मनोरमाबाईच्या दुःखद निधनाची नोंद त्यांच्या डायरींत सांपडावयाची नाहीं.

त्यांच्या रोजनिशींतील कांहीं उतारे त्यांच्या बंधूच्या (रा. ग. गो. दिवाकर) कृपेनें येथें दिले आहेत.

**चार दोन पानांत** ( सन १९१० पासून पुढें प्रत्येक वर्षांतील कांहीं महत्वाच्या तारखा व निवडक उतारे )

२१ मे १९१३ रा. श्रीधर रानडे यांजकडे गेलों. त्यांचीं व कुमारी हिवरगांवकर यांची कांहीं काव्यें वाचलीं.

९ जून १९१४ रा. हिवरगांवकर यांचे घरीं गोरज मुहुर्तावर रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे व कुमारी हिवरगांवकर यांचा विवाह लागला.

१४ जून १९१४ ......विवाहाची मेजवानी झोडण्यास गेलों होतों.

२९ जून १९१४ ... उभयतांच्या कांहीं निवडून त्या कविता कवि अनंततनय याजजवळ अभिनव काव्य माला भाग ३ यांत घालण्या करितां दिल्या.

१७, २७ जुलैला रानडे काल्न्यानें आजारी असल्याचे व नंतर 'काळाच्या दाढेंतून' लिहावयास घेतल्याचे उल्लेख आहेत.

सप्टेंबर १४, २९, ३०, १९१४. या दिवशीं 'काळाच्या दाढेंतून' वाचल्याचे व गडकरी, ठोमरे, रानडे वगैरेशीं गप्पा मारल्याचे उल्लेख आहेत.

रोजनिशींतील या उल्लेखावरून दिवाकरांना सौ. मनोरमाबाईविषयीं काय वाटत होतें याची अंधुक ही कल्पना येणार नाहीं.

१८ नोव्हेंबर १९१९ रोजीं सायंकाळीं दीड महिन्याच्या सुधेस घेऊन मनोरमाबाई बसल्या असतां वरकरणी निष्काळजी मुद्रेनें दिवाकरांनीं एक बंद पाकीट आम्हा तिघांना अर्पण केलें. वर अशीं अक्षरें होतीं.

या पाकिटांत चि. रा. श्रीधर रानडे व कवयित्री कु. द्वारकाबाई हिवरगांवकर यांच्या प्रीतिविवाहाच्या आठवण देण्याच्या अक्षता व फुले आहेत.

दिवाकर ता. ८।५।१९२५

आंत एका पुडींत मंगलाक्षता, फुलांच्या सुकलेल्या पाकळ्या व मंगल पत्रिका होती !

२७ आगस्ट १९२७ ला त्यानीं सुधेस दिवा मोठा कसा झाला ही गोष्ट दिली. गोष्टीची भूमिका त्यांच्या व माझ्या एक समान अनुभवांवरून त्यांनीं लिहिली होती. १९२९ ते अखेर पर्यंत त्यांनीं आम्हां सर्वांवर पूर्वीप्रमाणेंच लोभ ठेवला. १९२६ ते १९२९ चा तीन वर्षांचा खंड सोडला तर मला तरी वर पुर्वीप्रमाणेंच चालू आहे असा भास होतो असें ते म्हणत. ५ सप्टेंबर १९३१ रोजी रात्रीं 'गतआयुष्यांतील गोष्टी बराच वेळ आम्ही बोलत होतो.' रोजनिशींतील शेवटची नोंद २४ सप्टेंबरची असून दिवाकर १ आक्टोबर १९३१ रोजीं निवर्तले.

दिवाकरांच्या नाट्यछटा त्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाल्या त्याचप्रमाणें 'श्री. मनोरमा' हा कवितासंग्रह. विलक्षण योगायोग.

—(श्रीधर)

( गिरीश )

## आमच्या जिजी

१९१० सालांतील गोष्ट. मी व माझा एक स्नेही साताऱ्याहून पुण्यास आलों होतों व न्यू इंग्लिश स्कूलमधें इयत्ता सहावींत नुकतेंच नांव घातलें होतें. एक दिवस साडे अकराची घंटा झाली व आम्हीं सर्व विद्यार्थी अगदीं यंत्राप्रमाणें आपापल्या वर्गांत शिरलों. इतक्यांत शिक्षकांच्या मागोमाग दोन तीन विद्यार्थिनीहि आमच्या वर्गांत शिरल्या. साताऱ्याहून मुद्दाम संस्कृतचा विशेष अभ्यास करण्यासाठीं आलेला माझा स्नेही मला हळूंच डिवचून म्हणाला "अरे ती, ती मुलगी पहा! ती काळसर वर्णाची व सर्वांच्या मागून वर्गांत आलेली. अतिशय हुशार आहे ती. संस्कृतमधें तिचा पहिला नंबर आहे म्हणे!" मीहि जरा आश्चर्यानेंच पाहूं लागलों. कारण, विद्यार्थिनी, त्यांतून संस्कृतमधें हुशार आणि त्यांतहि मुलांच्या शाळेंत! त्या काळांत ती एक नवलाची गोष्ट होती. मला त्या मुलीसंबंधीं आदर वाटूं लागला. वार्षिक परीक्षेंत त्या मुलीनें पहिला नंबर पटकावला. आणखी एक वर्ष लोटलें. आमचा मॅट्रिकचा निकाल जाहीर झाला. एका मुलीला संस्कृतची एक शिष्यवृत्ति मिळाल्याचें समजलें; म्हणून निकाल-फलकावर जाऊन नांवें वाचलीं, तों तें नांव म्हणजे कु. द्वारकाबाई हिवरगांवकर यांचें—म्हणजे आमच्या जिजींचेंच होतें.

थोडा काळ लोटला. एक दिवस मी 'मनोरंजनचा' अंक चाळीत बसलों होतों. तों त्यांत 'गोपिकातनया' या नांवाखालीं एक कविता छापून आलेली मला दिसली. कविता नक्की कोणती होती, तें माहित नाहीं पण ती सुंदर होती एवढें आठवतें. तो काळ काव्यात्म भावनेचा होता. मनाला तर काय चोवीस तास पंख फुटलेले होते. दृष्टी सौंदर्याला आसावलेली होती. कुठें कांहीं विशेष दिसलें कीं भिरभिरलेंच मन त्याच्या मागें. त्या भावनेनें सेवलेला त्यावेळचा आनंद हि अपूर्व होता. कु. 'गोपिकातनया' यांच्या नित्यनेमानें प्रसिद्ध होणाऱ्या कविता मी वाचीत होतों. त्यांत या 'गोपिकातनया' म्हणजे कु. द्वारकाबाई हिवरगांवकर, हें कळल्यावर तर विशेष आदरानें व अवर्जून मीं त्या

वाचूं लागलों. त्यावेळीं त्यांच्या कवितेनें माझ्या मनावर मोहिनी टाकली होती. त्यांच्या सर्व कवितांमधें मला त्यावेळीं विशेष कोणती कविता आवडली असेल तर ती म्हणजे "काननीं जाऊं" ही होय. पुढें त्यांच्या सर्वच्च कविता वाचण्याचा प्रसंग आला. त्यांत "जीवितेश्वरा बोलणें जरा" या कवितेनें माझें लक्ष विशेष वेधलें. त्यांचें जीवन व काव्य निराळें नव्हतें. त्यांत परस्परांच्या छाया पडछाया होत्या. जिजींची सौंदर्यदृष्टी व ध्येयासक्ति अलौकिक होती. त्यांच्या प्रीतीनें त्यांना निश्चयी बनविलें होतें. त्यांचा आत्मविश्वास दांडगा होता. त्यांचें अंतःकरण प्रेमळ व उदार होतें. त्यांनीं आपल्या भोंवती आपलें जग निर्माण केलें होतें. आणि याच जगांत, याच सृष्टींत त्या नेहमीं वावरत होत्या.

याच काव्यमय काळांत जिजींचें लग्न झालें. तो एक आदर्श प्रीतिविवाह होता. त्या सौ. मनोरमाबाई रानडे या नांवानें ओळखल्या जाऊं लागल्या. लग्नानंतर लवकरच नाना–श्रीधर रानडे–पटकीनें आजारी पडले. जिजींनीं त्यांची यावेळीं किती काळजी वाहिली व किती सेवा केली हें ज्यांना माहित असेल त्यांना जिजींच्या अंतःकरणाची कल्पना येईल. लवकरच नानांचें 'काळाच्या दाढेंतून' हें काव्य प्रसिद्ध झालें. तें वाचल्यानंतर नाना व जिजी यांच्या संबधीचा माझा आदर शतगुणित झाला.

काळच आम्हांला एकमेकांच्या जवळ आणीत होता. येथील 'श्रीमहाराष्ट्र शारदामंदिरांत' एक दिवस नाना–जिजींची व माझी गांठ पडली, व ओळखहि झाली. शारदामंदिरांतूनच 'रविकिरणमंडळ' निघालें. जिजींना अतिशय आनंद झाला. एक दिवस या दंपतींनीं आम्हां सर्व सदस्यास जेवावयास बोलावलें. मेजवानीचा वेळ रात्रींची होती. घरांत नोकरचाकरहि कोणी नव्हता. जिजींनीं एकट्यानींच सर्व बेत केला. सुशिक्षित पदवीधर स्त्री एकाद्या सामान्य स्त्रीप्रमाणें घरकामांत मग्न झालेली पाहून मला फार आश्चर्य वाटलें. कोण तो जिजींचा उत्साह ! कोण तो त्यांचा आनंद ! जेवतांना कोट्यांना व हास्याला तर काय पूर आला होता. नंतर गप्पा, चर्चा व काव्यगायन यांनीं तो सर्व वाडा दणाणला त्या कार्यक्रमांत पहाट केव्हां झाली हें समजलें हि नाहीं. जिजींना मात्र त्या दिवशीं अत्यंत समाधान झालेलें दिसलें.

रविकिरणमंडळाच्या अनेक बैठकी जिजींच्या घरींच झाल्या. पहिल्या 'किरणाची' रूपरेखा त्यांच्याच घरीं—म्हणजे गायकवाड वाड्यांतील त्यांच्या

बिऱ्हाडीं आंखली गेली. मंडळाचें व पहिल्या पुस्तकाचें नामकरणहि त्याचवेळीं झालें. नवीन ध्येयें, नवीन आदर्श, नवीन वाङ्मयप्रकार यांचा पुरस्कार करण्यांत आला. हरएक बाबतींत नवीनपणाला प्राधान्य देण्यांत आलें व नवीन ध्येयें जोरकसपणानें आपणच समाजापुढें ठेवलीं पाहिजेत असें त्यावेळीं झालेल्या चर्चेंत सांगण्यांत आलें. प्रत्यक्ष ' किरणा ' चें प्रकाशनच त्या जागेंत लावण्यांत आलेल्या एका पुनर्विवाहाच्या शुभमुहूर्तानें करण्यांत आलें. ध्येयवाद व व्यवहारवाद यांची सांगड घालण्याचा तो प्रयत्न होता. जिजी असल्या कार्यांत समरसतेनें भाग घेत असत. त्यांच्यामुळें घराला घरपण आलें होतें. आम्ही रविकिरणमंडळाचे सदस्य एकत्र आलों कीं तो सोहळा एकाद्या मोठ्या एकत्र कुटुंबाप्रमाणें रमणीय दिसे. प्रत्येकजण 'We are friends first and literary men afterwards' असें म्हणत असे. कधीं कधीं 'We stand for certain social principles' असेंहि आम्ही म्हणत असूं. हा ध्येयवाद ज्यांनीं ज्यांनीं निर्माण केला त्यांत माधवराव पटवर्धन, नाना व जिजी हे प्रमुख होते.

जिजींचें सर्व जीवनच काव्यमय होतें. ' नाना ' सारखा सुविद्य प्रेमळ पति, ' सुधा-कुंदा ' सारख्या गोड मुली व भोंवतीं वाङ्मयीन मित्र यामुळें त्यांना आपलें सांसारिक जीवन संपन्न व सर्व गोष्टींनीं भरगच्च भरलेलें दिसे; जिजी त्या समाधानानें नेहमींच तृप्त दिसत. सुधा-कुंदावर त्यांचा विलक्षण जीव असे. ' झोपेंत हंसणाऱ्या सुधेचें ' गोड दृश्य त्यांच्या दृष्टींतून आणि लेखणींतून सुटलें नाहीं. यशवंतरावांनीं ' सुधे ' वर कविता लिहल्या अगर त्यांच्या मांडीवर ' कुंदा ' झटकन् झोपीं गेली याचा त्यांना अभिमान वाटल्याखेरीज राहिला नाहीं. मंडळाच्या सदस्यांशीं त्यांचें वागणें अत्यंत सभ्यपणाचें व प्रेमळपणाचें असे. मंडळाच्या बैठकींत जिजी आल्या कीं तेथें एकदम घरगुती वातावरण निर्माण व्हावयाचें. त्यामुळें कुणी त्यांना चेष्टेनें ' अरुंधती ' म्हटलें तरी तेंहि नांव साभिप्रायच वाटावयाचें.

नानांना 'एम्. एस्. सी.' च्या परीक्षेंत उत्कृष्ट यश मिळून सोन्याचें 'मूस' पदक मिळालें त्यावेळीं जिजींच्या इतका आनंद फारच थोड्यांना झाला असेल! त्या भरांत माधवराव पटवर्धन यांना लिहिलेल्या एका पत्रांत त्या म्हणतात, " तुम्हांला कळलं का, यांना ' मूस मेडल ' मिळालं हें ? किती किती छान

झालं, नाहीं का ? " या उद्गारांत जिजींचें सर्व अंतःकरण ओतलें गेलें आहे, असें वाटतें. त्यांतच त्यांना आपल्या ऐहिक वैभवाची परमावधि झालेली वाटली; आणि त्यांत आश्चर्य कसलें ? नानांच्या जीविताशीं त्या पूर्ण समरस झाल्या होत्या. त्यांच्या संसाराला त्यांच्या या वृत्तीमुळेंच गोडवा आलेला होता. जिजी स्वभावानें फार स्वाभिमानी होत्या. गरीबीच्या संसाराचे दिवस त्यांनीं कसे काढले व त्यांत प्रेमळपणाची पांखर सर्वांवर कशी घातली हें ज्यांनीं पाहिलें आहे त्यांनाच तें समजेल. त्यामुळें त्यांच्या घरांत सूर्याचा तेजस्वीपणा व चंद्राची शीतळता नेहमींच प्रत्ययास येई.

पुण्यांतून जिजी मुंबईस गेल्या आणि आमचें एक जिव्हाळ्याचें घर गेलें ! गायकवाड वाड्यावरून जातांना अजूनहि चुकल्या चुकल्या सारखें होतें ! प्रत्यक्ष गायकवाड वाड्यांत मी व यशवंतराव बिऱ्हाड करून राहिलों असतांना त्या त्या जागीं त्या त्या प्रसंगांच्या आठवणी येत. रविकिरणमंडळाचा त्या वेळचा वाङ्मयीन आशावाद आज प्रत्यक्षांत आलेला पहाण्यास जिजी असावयास हव्या होत्या. दिवाकरांना भरपूर मिळालेलें यश, माधवराव व 'यशोगिरी' यांना मिळालेली कीर्ति, गोखले, नाना, घाटे यांना मिळालेलें वैभव व कीर्ति आणि माडखोलकरांना मिळालेलें प्रभावी स्थान डोळ्यांनीं पहावयास आज जिजी नाहींत, ही उणीव भासतेच भासते ! त्या जर आज असत्या तर त्यांनींहि पण आपलें स्वतांचें असें एखादें स्थान पटकावलें असतें !

जिजींचें प्रथम दर्शन 'कु. द्वारकाबाई हिवरगांवकर ' म्हणून झालें; त्यानंतर त्यांना 'कवयित्री गोपिकातनया ' म्हणून पाहिलें; पुढें त्या "सौ. मनोरमाबाई रानडे ' झाल्या; पुढें त्यांना कोणी 'अरुंधती ' असें विनोदगर्भ गौरवानें संबोधलें; आणि एक दिवस 'सुधा-कुंदांनीं ' त्यांना तोंडभर 'जीजी ' या नांवानें हांक मारिली. यापैकीं प्रत्येक नांव सार्थ व साभिप्राय होतें; पण आमच्या स्मरणांत मात्र जिजी या शेवटीं 'जीजी ' म्हणूनच राहिल्या !

**शंकर केशव कानेटकर**

## ( यशवंत दिनकर पेंढरकर )

मी मनोरंजन मासिकासाठीं १९२७ सालीं लिहिलेल्या लेखांतील कांहीं भागावरून 'मला मनोरमाबाईच्या कवित्वाबद्दल काय वाटतें' याची किंचित् कल्पना येईल. आज मनस्वी डोकेंदुखीच्या व्यथेमुळें विचार करणेंच अशक्य झालें आहे.

यशोधनांत छापलेली 'दिवंगत कवयित्रीस' ही मनोरमाबाईवर लिहिलेली कविता माझ्या भावना जास्त व्यक्त करतील या पेक्षां जास्त काय लिहूं ?

३०–३–३९ **यशवन्त**

पुणें

"—रविकिरणमंडळाची वाङ्मयिक कामगिरी थोडीबहुत नांवारूपास येऊं लागते न लागते तोंच त्याच्यावर एका प्रमुख घटकाची श्राद्धतिथि पाळण्याचा प्रसंग यावा हें विधिदुर्विलसित मंडळाला व मंडळाच्या उत्कर्षेच्छूंना अत्यंत दुःखकारक आहे. ता. १३ जानेवारी १९२६ रोजीं पहाटे ( म्हणजे ता. १२ ची मध्यरात्र उलटून गेल्यानंतर ) महाराष्ट्राच्या प्रसिद्ध कवयित्री सौ. मनोरमाबाई रानडे यांचें देहावसान झाल्याला आज वर्ष झालें. मनोरमाबाईनीं आपला काव्यसंसार पूर्वाश्रमींच सुरू केला होता; आणि हा संसार ऐहिक संसाराबरोबरच उत्कर्षावस्थेस लागला असतांनाच दुर्दैवानें अकालीं बंद पडला. मृत्यूची करणी विघ्नसंतोषीपणाची असून चालत्या गाड्याला खीळ घालण्यांतच त्याला पुरुषार्थ वाटत असतो कीं काय कोण जाणे ?

सुखाच्या पूर्णचंद्रानें जिथें फेसाळतो सिंधू
तिथें हे टाकुनी देती विषाचा नेमका बिंदू
विराजे अंगणीं कोठें जरी कोजागरी रात्र
तिथें थूत्कार घालाया क्षणार्धीं टाकती मात्र

हे खलांच्या कृतीस अनुलक्षून काढलेले उद्गार मृत्यूच्या करणीसहि सर्वथैव लागू पडतात. महाराष्ट्रीय कवींना अकालीं हिरावून नेण्याची मृत्यूस चटकच लागली असावी. एरव्हीं, दत्त, बालकवि, गोविंदाग्रज, रेंदाळकर, वगैरे अकालीं

कालवश झालेल्या कवींच्या सन्मणिमालेंत सौ. मनोरमाबाईंचा समावेश एव्हांच होता ना.

सौ. मनोरमाबाईंचें चरित्र अगदीं त्रोटकपणानें अभिनवकाव्यमालेच्या तिसऱ्या व पांचव्या भागांत आलें असून, विस्तृत चरित्र ' रणगर्जना ' साप्ताहिकांत रा. शं. के. कानेटकर यांनीं लिहिलें होतें, मनोरमाबाईंचें पूर्वीचें नांव द्वारकाबाई हिवरगांवकर असें होतें. यांचा जन्म ता. १४ जानेवारी १८९६ रोजीं झाला. त्यांचें सर्वच शिक्षण पुण्यास डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या शिक्षण-संस्थांतून झालें. त्या १९१३ सालीं मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्या. या परीक्षेंत त्यांना ' यमुनाबाई भट ' संस्कृत शिष्यवृत्ति मिळाली. याच परीक्षेंत त्यांचा मराठींत पहिला नंबर आल्यामुळें त्यांना न्यू इंग्लिश स्कूलचें मराठीचें ' दामले-चिपळुणकर ' बक्षिस देण्यांत आलें. ' महाडीक शिष्यवृत्ती ' हि त्यांनाच मिळाली.

त्यांच्या आयुष्यक्रमांतील तदुत्तरची महत्त्वाची बाब म्हणजे त्यांचा विवाह होय. या फर्ग्यूसन कॉलेजमध्यें शिकत असतांना श्रीधरपंत रानडेहि त्याच कॉलेजमध्यें शिकत असत. उभयतांची काव्यविषयाची आवड परिचयाला कारणीभूत होऊन हृदयाविष्करणालाहि प्रेरक झाली. देशस्थ-कोकणस्थ विवाहाचें, आज ' सुधारणा ' या दृष्टीनें, फारसें महत्त्व कोणालाहि वाटणार नाहीं. परंतु जवळजवळ एक तपापूर्वीची ही गोष्ट आहे हें लक्ष्यांत घेतल्यास त्याचें वैशिष्ट्य ध्यानांत येण्यासारखें आहे. तशांतहि विद्यार्थीदशेंतील ही सुधारणा-प्रवृत्ति विशेषच धाडसाची गोष्ट होय. हा विवाह घडून न येण्याविषयीं त्यावेळीं पुष्कळच अडथळे उत्पन्न झाले होते. परंतु उभयतांची परस्परानुरक्तता अडथळ्यांनीं विरघळणारी नव्हती. तशांतहि मनोरमाबाईंची चिकाटी आणि खंबीर मनोवृत्ति यांच्या जोरावरच हा विवाह पार पडला. त्यावेळीं त्यांनीं दाखविलेलें अढळ मनोधैर्य—

Love will find its way
Through paths where wolves would fear to prey.

बायरन्च्या या उद्गाराची आठवण देतें. प्रतिकूल परिस्थितीचे ढग मावळून अखेर त्यांचा विवाह ता. ९ जून १९१४ रोजीं झाला.

पुढें यथावकाश त्या १९१७ सालीं बी. ए. च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्या.

संस्कृत हा त्यांचा ऐच्छिक विषय होता. याच सुमारास सन १९१२ सालचें " भाई परमानंद " प्राईज त्यांच्या पदरांत पडलें. स. १९११ सालीं या प्राईजला योग्य असा निबंध न आल्यामुळें त्याच सालच्या मॅट्रिकच्या परीक्षेंत सर्व विद्यार्थ्यांत मराठी विषयांत पहिल्या आलेल्या या विद्यार्थिनीचाच त्या बक्षिसावर हक्क पोंचत होता. अशा रीतीनें कालावधीनें कां होईना पण तें प्राईज त्यांना हस्तगत झालें. बी. ए. झाल्यानंतर कांहीं काळ यांनीं पुणें येथील सेवासदनमध्यें अध्यापिकेची नोकरी करून श्रीधरपंतांना B.A. व B. Sc. व्हायला अनुकूलता प्राप्त करून दिली.

Woman's dignity lies in her being unknown; her glory in the esteem of her husband; and her pleasure in the welfare of her family.

रूसोनें खऱ्या गृहिणीचीं वर्णिलेलीं हीं लक्षणें तंतोतंत लागू पडणारें मूर्त उदाहरण म्हणजे मनोरमाबाई असें कोणीहि तन्निकटवर्ति सांगू शकेल.

श्रीधरपंतांना M. Sc. झाल्यावर Royal Institute of Science मध्यें कायमची नोकरी लागली आणि ते मुंबईला आले. येथूनच या दंपतीच्या संसाराचें बस्तान बसावयाचें; पण मनोरमाबाईना मुंबई मानवली नाहीं; आणि त्यांच्या शरीरांत आजारानें ठाणें दिलें. हवापालट करणें जरूर पडल्यावर त्यांनीं इसलामपूर, नगर इकडे कांहीं दिवस काढले आणि तसा त्यांना आरामहि पडला. आपणांस बरें वाटूं लागलें आहे असें पहातांच त्यांनीं परत मुंबईस धांव घेतली. मुंबईस येतांच त्यांच्या दुखण्यानें फिरून उचल खाल्ली.

[ " हें दुखणें शेवटीं रक्तक्षयावर गेलें. याच सुमारास त्यांचा धाकटा दीर त्याच दुखण्यानें आजारी पडून एकाएकीं वारला. त्याच्या दुखण्याचा सौ. मनोरमाबाईच्या मनावर कांहीं ना कांहीं तरी परिणाम झाला असावा असा तर्क आहे. कारण तो वारला त्याच दिवशीं त्यांनीं अंथरुण धरलें. दहा बारा दिवस एकसारखा ताप आला व त्यांतच त्या प्रसूत झाल्या. हा दिवस म्हणजे १२ जानेवारी १९२६ हा होय. प्रसूतीनंतर मात्र त्यांची अवस्था कठिण दिसूं लागली. रात्र कशी उलटेल अशी सर्वांनाच चिंता पडली. मात्र त्यांना शेवटपर्यंत शुद्ध होती. रात्रीं ९ वाजण्याचे सुमारास श्रीधरपंतांनीं अत्यंत धीरानें आपल्या दोघी मुलींस त्यांच्याजवळ बसविलें. थोडा वेळ त्यांनीं त्यांच्या पाठी-

वर हात फिरविला व डोळ्यांतून पाणी काढलें. मृत्यूची घटका भरत चालली होती. नंतर मुली झोपीं गेल्या व श्रीधरपंत त्यांचे जवळ बसले व त्यांनीं त्यांच्या नजरेस पडेल अशा रीतीनें समोर श्रीकृष्णाची मूर्ति ठेविली, लग्नाचे पूर्वीं त्यांना भेट म्हणून पाठविलेली भगवद्‌गीतेची छोटीशी पोथी त्यांच्या मुठींत दिली व आपल्या प्रेमळ पण धीराच्या वाणीनें ते त्यांचें मन परलोकच्या यात्रेकरितां तयार करूं लागले. श्रीधरपंतांच्या दिलदिलाशानें सौ. मनोरमाबाईचें मन अत्यंत शांत झालें व त्यांच्याशीं बोलत बोलत, समोरच्या कृष्णमूर्तीकडे पहात व हातां-तील भगवद्‌गीता मुठींत घट्ट धरून, त्यांनीं डोळे मिटले ! ! यावेळीं दीड वाजला होता ! !

यापमाणें सौ. मनोरमाबाई रानडे अगदीं अल्पवयांत, म्हणजे ज्या दिवशीं त्यांच्या वयाला अवघीं तीसच वर्षें पुरीं झालीं त्याच दिवशीं आपल्या आप्त-इष्टांस, दोन लहान मुलींस, प्रेमळ पतीस व पित्यास दुःखांत सोडून चालत्या झाल्या. त्यांच्या आकस्मिक मृत्यूनें पुष्कळांना बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें. ”
**गिरीश–रणगर्जना**, २२–११–१९२६ ]

रविकिरणमंडळाची सात्त्विक शक्ति आणि महाराष्ट्राची प्रसिद्ध कवयित्री ता. १३ जानेवारी १९२६ रोजीं पहाटे दिवंगत झाली.

आपल्या आजाराची असाध्यता कधीं कधीं त्यांना जाणवत असावी असें त्यांच्या एका अप्रसिद्ध कवितेवरून कळून येतें. १९२५ च्या सप्टेंबरमध्यें त्यांनीं लिहिलेल्या एका कवितेंत पुढील ओळी आहेत:—

मना आतां गुंतिशी कां भवांत ?
धरीं दृढता; स्थिर होइ आणि शांत
तुझ्यावांचोनी अडुनि काय राही
तुझी नंतर स्मृति नामशेष होई !

*   *   *

चोंच ज्यानें उत्पन्न जगीं केली
तोच चारा पुरवील विहगभालीं
वाढतीलहि मत्सुता सृष्टिसंगें
कशासाठीं तर चित्त मम दुभंगे !

आपल्या दोन मुली सुधा आणि कुंदा यांना मागें ठेवून परलोकीं प्रयाण करण्यास त्यांनीं आपल्या मनाची कशी तयारी केली होती हें वरील ओळींत व्यक्त होत आहे.

१४ जानेवारी १८९६ ते १३ जानेवारी १९२६ एवढ्याशा अल्पायुष्यांतील या कवयित्रीच्या काव्यकृतीचा थोडासा आढावा घेणें जरूर आहे.

गेल्या एक दोन तपांचें सिंहावलोकन केल्यास असें दिसून येतें कीं, मराठी कवितेचें झपाट्यानें संक्रमण होत आहे. रेंदाळकरांची कविता ज्याकाळीं विनीत होती, त्यावेळीं मनोरमाबाईनीं काव्यक्षेत्रांत पाऊल टाकलें. रेंदाळकरी वळणामागून तितक्याच प्रभावाचें मराठी कवितेस लागलेलें वळण—गोविंदाग्रजांची छाप—हळूहळू मावळूं लागत असल्याचें आज स्पष्ट दिसत आहे. तथापि यांच्या कवितेचें स्वरूप स्वयंप्रेरितच आहे. फारच झाल्यास एवढेंच म्हणतां येईल कीं, बहिरंगावर प्रथमारंभीं रेंदाळकरांच्या काळाची छाया पडली आहे. पण हा जो भास होतो त्याचें कारण रेंदाळकरांच्या काळांत शोधण्यापेक्षां खुद्द कवयित्रीच्या संस्कृताध्ययनांत शोधणें अधिक उचित होईल. मनोरमाबाई संस्कृत स्कॉलर होत्या. त्यामुळें प्रथम प्रथम यांची कविता फारच संस्कृतप्रचुर असे. अभिनवकाव्यमालेच्या पांचव्या भागांत 'रम्यभुवन' म्हणून जी कविता आली आहे ती संस्कृतप्राचुर्याची साक्ष देईल. अलीकडे हें वळण सुटत चाललें होतें. अशा बाबतींत थोडाबहुत काळच प्रभावी असतो. कवि कितीहि स्वयंभू असला तरी त्याच्या काव्यावर तत्कालीन वातावरणाचे ठसे उमटणें अपरिहार्य असतें. "कवि हा द्रष्टा असतो" (हें म्हणणें जर खरें असेल, तर) असें म्हणतांना आपण त्याच्या विचारसरणीवरच लक्ष देत असतों; व तेंवढ्यापुरता तो काळाच्या अघाडीस राहीलहि. पण काव्यप्रकार आणि काव्यबहिरंग यापुरतें तरी त्यावर तत्कालीन छाप उमटलेले असतात. रेंदाळकरांनीं निर्यमक कवितेचा पाडलेला पायंडा मनोरमाबाईनींहि अंगिकारलेला दिसतो तो यामुळेंच. सुनीत, गज्जल या आधुनिक काव्यप्रकाराच्या प्रवर्तकांपैकींच त्या एक असल्यामुळें, ते प्रकार त्यांच्या अलीकडील कवितांत आढळतात हें योग्यच होय. परंतु मनोरमाबाईंच्या काव्याचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या काव्याचें अंतःस्वरूप होय. आणि या अंतःस्वरूपाचें महत्त्व जाणून घेण्यास प्रथम त्यांच्या "काव्य आणि स्त्रिया" या शलाकेंतील लेखाकडे नजर टाकली पाहिजे. या लेखांत मनोरमाबाई लिहितात. "संत-

शींच्या कालांत ज्या कांहीं थोड्या कवयित्री होऊन गेल्या त्यांना 'स्त्री' असें राळें अस्तित्व नव्हतेंच. त्यांच्या कवितांतून स्त्रीजातींच्या मनोविकाराचें शिष्टत्व प्रायः कुठेंच आढळत नसून त्यावेळच्या संतकवींच्या सहवासाचा वेदान्तपर आणि भक्तिपर विचारांचा परिणाम दृष्टोत्पत्तीस येत आहे. तशीच थति सध्यांची आहे. स्त्रियांचीं आधुनिक काव्यें आपण जीं सध्यां ातों तीं पुरुषी कवितांचें केवळ अनुकरण आहे." मनोरमाबाईचें म्हणणें सें कीं, "नाजुक मनोविकार, वात्सल्य, शिशुप्रेम, करुण प्रसंग रेखाटणें निसर्ग–कोमल भावनामय स्त्रीहृदयास सहजसाध्य आहे......महाराष्ट्र-ाषाचित्रमयूर रा. आठले यांच्या 'सासरची पाठवणी' 'माहेरचें मूळ' ौरे कविता स्त्रीहृदयनिदर्शक असून त्या वेळच्या स्त्रीसृष्टीचें त्यांत हुबेहुब चित्र ाटलें आहे. अशा तऱ्हेचीं काव्यें वास्तविक स्त्रियांनीं लिहावयास हवीं होतीं" ांच्या म्हणण्याचा सारांश एवढाच कीं, स्त्रियांचे मनोविकार व मनोव्यापार ांचें यथातथ्य विशदीकरण कवयित्रींच्या हातूनच बिनचूक व सूक्ष्मतम होईल. मनोरमाबाईच्या काव्याचें जें महत्त्वाचें दालन आहे तें याच तत्त्वाच्या रस्कारानें शृंगारलेलें आहे. या तत्त्वानुसार कोणाहि आधुनिक कवयित्रीनें लक्षांत ण्यासारखी कृती केलेली नाहीं. आणि मनोरमाबाईनीं ती निःशंकपणें आणि ोकळ्या मनानें केली. न्यू इंग्लिश स्कूल, पुणें या मासिकाचा पहिला व शेवटचा ो एकच अंक निघाला त्यांत मनोरमाबाईची "लिहूं कुणावर कविता" या थळ्याचें पद आहे. अनेक विषय मनश्चक्षूपुढून बाजूला सारल्यावर शेवटच्या डव्यांत या कवयित्री म्हणतात कीं,—

रसिक म्हणे मज विषय कशाचा ?<br>
पाठ बोल तूं निजप्रेमाचा<br>
विचार कर तूं आयुष्याचा<br>
गुंग त्या कविता। डोलव मग सगळ्या जगता.

या उक्तीस अनुसरूनच त्यांनीं आपलीं भावगीतें गायिलीं आहेत, आणि हाराष्ट्रीय रसिकांच्या जगास डोलवावयास लाविलें आहे. रविकिरणमंडळाचीं रण, उषा, शलाका हीं पुस्तकें उघडून त्यांतील भूवरील स्वर्ग, एकाच शब्दा-ाठीं, वंचना, प्रेमकलहांतरितेचें पत्र, पुष्पास, विनवणी, निदानींचे बोल, रून, याचना, मोहना, स्मृति या कविता वाचल्या म्हणजे रसिक डोलावयास

खास लागतील, आणि लागलेहि. रमणीहृदयनिदर्शक भावगीतांचा असा प्रभावशाली प्रवाह मराठी काव्यक्षेत्रांत निर्माण करून मनोरमाबाईंनीं आपलें स्वयंभूत्व प्रस्थापित केलें आहे. मनोरमाबाईंची समग्र कविता पुस्तकरूपानें प्रगट व्हावयाची आहे. तत्पूर्वी त्यांच्या कवितेचें एतद्वैशिष्ट्यनिदर्शक स्वरूप पहावयास ठिकठिकाणीं विखुरलेल्या अल्पसंख्यांक कवितांवरच नजर टाकली पाहिजे. याच अंकांत प्रसिद्ध करण्यांत येत असलेली 'सुमनावली' ही कविताहि वरील सिद्धांतास पुष्टिदायक होईल.

मनोरमाबाईंच्या कविता उद्यान, करमणूक, सहस्रकर, मधुकर, लोकमित्र या नियतकालिकांतूनहि येत असत. विविधज्ञानविस्ताराच्या अर्धशतसांवत्सरिक उत्सवानिमित्त निघालेल्या विविधकाव्यमालेंत यांची 'नभोलेख' ही अतिशय रमणीय कविता प्रसिद्ध झाली आहे. ती वाचतांना "देवा स्त्रीहृदयीं मनोरमपणा केव्हां कुणी निर्मिला" या माधव जूलियन कवीच्या ओळीची आठवण होते. प्रणयीप्रणयिनींचा अन्योन्य संबंध दर्शविणाऱ्या

हृदय थोर तव भव्य सिंधुसम विशाल तें दिसतें
मीनासम मम क्षुद्र हृदय हें त्यांत सदा रमतें
किंचित जातां तीरावरती प्राण लया जाती
त्वन्मानसजलविणें गमतसे दुःसह ही जगती

या ओळी पूर्णार्थवाचक आणि उपमातीत आहेत. पूर्वी मनोरंजनांत आणि नंतर उषेंत आलेली "काननीं जाऊनी राहूं" ही कविता माधव जूलियनच्या "तेथें चल राणी" या कवितेंतील विचारप्रणालीचें सौम्य शीतल मूळ स्वरूप होय. "पुरे पुरे ग हंसणें" ही अभिनव काव्यमालेच्या तिसऱ्या भागांतील कविता वाचतांच वाचक गंभीर बनतो इतकी ती प्रभावी आहे. मिसेस ब्राउनिंग आणि एला व्हीलर विलकॉक्स या यांच्या आवडत्या कवयित्री आणि त्यांच्याप्रमाणें मराठींत स्वतंत्र काव्यनिष्पत्ति करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती.

मनोरमाबाईंच्या काव्यांत जिव्हाळा ओतप्रोत भरून राहिलेला असे. आरंभींच्या कवितांतून साधारणपणें कल्पनेची तरलता अधिक असते. पण काव्याचा प्राण, जी भावनेची सखोलता, ती जीविताच्या जाणिवेनेंच उत्पन्न होत असते. जीवितकोड्याची गहनता जों जों अनुभवास येऊं लागते तों तों भावना रंगूं लागते. मनोरमाबाईंच्या या रंगलेल्या भावगीताचें थोडक्यांत वर्णन करावयाचें झाल्यासः—

आवडतोय. अशा ठिकाणी रहाणें वगैरे वाटते पण असें? — —

आम्ही संध्याकाळीं रोज फिरावयास जातो. पण तिन्हीसांजा झाल्या कीं सुद्धां कुरकुर करूं लागते. कावळे आकाशांतून उडून जवळच्या झाडावर विश्रांतीला येतात तेव्हां ती त्यांच्याकडे पहाते व कां, का ओरडते. आकाश, ढग, झाडें, पानें, फुलें (अर्थात् नाहीं) तिला आवडते. तिच्या मनाजोगें ठिकाण आहे.

मंगळवारी आम्ही वाट पहात राहूंच. येतांना पैसे आणणार ना? मला हवे आहेत.

मनोरमाबाई रानडे

# कै० सौ० मनोरमाबाई रानडे

१—

जिण्याच्या वाळवंटींचा प्रवासी कमनशीबी मी
चुकीच्या चालतां वाटा चुकोनी ये तुझ्या धामीं
कवित्वाचे पसा – पोहे तुवां सेवून आनन्दें
सुदामा भूषवीला हा कृपेच्या हीरकीं हेमीं
जिव्हाळा लोचनीं तूझ्या, जिव्हाळा भाषणीं तूझ्या
जिव्हाळा अन्तरीं तूझ्या, मला तो ठेवि आरामीं
तुझ्या मी साउलीमाजी विसावा घेतला कांहीं
मनाला या समाधानी मिळाली तूझिया नामीं
दुरावे भार चित्तींचा, दुणावे भाव भक्तीचा
गमे उन्चावलों कांहीं जरा येतां तुझ्या कामीं
मला मूर्तीमधीं तूझ्या मिळाली माउली माझी
सुखें जी देइ या लोकीं नसावी स्वर्गिच्या ग्रामीं
कसें हें स्वप्नसें झालें ! अकालीं जासि तूं व्योमीं
जिण्याच्या वाळवण्टींचा प्रवासी कमनशीबी मी

२—

तुझ्या जीं अक्षरें काव्यीं कुवे साक्षात् जिव्हाळ्याचे
सुटूनी पार्थिवांतूनी तुझें तें रूप कीं नाचे
तुझ्या या काव्यपुष्पांना न ठावा दर्प दम्भाचा
खऱ्या ओघास झाकाया नसे लेणें तवङ्गाचें
विना-सौदामिनी जैसी नभीं कादम्बिनी शोभे
तसें आल्हाद देणारें तुझीया रूप काव्याचें
रसार्द्रा गीतिका पर्वें जशीं तीं इक्षुदण्डाचीं,
जणूं वा घोस द्राक्षांचे, मणी कीं चन्द्रकान्ताचे

तुझीया भावनोद्रेका म्हणूं राजापुरी गङ्गा
असे पावित्र्य तीर्थांचें तयांमाजी गमे साचें
जणूं वाग्देवतेच्या तूं सुमुक्ता कर्णपुष्पींची
खरें ऐश्वर्य तूं आर्ये ध्रुवाच्या सूर्यपानाचें
क्षणायू पुष्प हें झालें अरेरे पारिजाताचें !
घडीच्या वर्तमानानें असें भूतीं विरायाचें !

* * *

कसें हें स्वप्नसें झालें ! अकालीं लोपली सृष्टी
स्मृतीचीं चाळतां पानें अतां बाष्पान्ध हो दृष्टी

येरवडा, ११।२।२६
( यशोधन ) **यशवन्त**

ही कविता सादर करावीशी वाटते. अशा प्रकारची मराठी वाङ्मयांत ' रसोत्कट व शुद्धभावसंपूर्ण खरीं स्त्रीगीतें निर्माण करणारी कवयित्री अकालींच मृत्युंगता व्हावी हें मराठी भाषेचें दुर्दैव नव्हे काय ?

---

# गजानन त्र्यंबक माडखोलकर

## श्रीधर–मनोरमा

'घड्याळकाका ! घड्याळकाका !'

लहानग्या सुधेच्या तोंडचे हे शब्द आठवले म्हणजे १९२२ सालीं पुण्यास गेल्यावर पाहिलेल्या रानडे दंपत्याच्या प्रेमळ संसाराचें चित्र माझ्या डोळ्यापुढें उभें रहातें. माझ्या वडिलांनीं मला विसाव्या वाढदिवसाच्या वेळीं घेऊन दिलेलें सोन्याचें सुंदर घड्याळ तेव्हां माझ्या हातांत असे, व त्या घड्याळावरूनच सुधाताईनें, किंवा खरें बोलावयाचें तर, प्रो. श्रीधरराव रानडे यांनीं तें नांव मला दिलें होतें. त्या नांवाचा त्यांना अद्यापहि विसर पडलेला नाहीं. कारण गेल्या जानेवारींत मी दादरला त्यांच्या घरीं गेलों असतां त्यांनीं हंसत हंसत तें नांव उच्चारुनच माझी सुधा–कुंदाशीं गांठ घालून दिली.

रानडे दंपत्य हें त्या वेळीं नारायण पेठेंतील करंदीकरांच्या वाड्यांत रहात असे. त्या वाड्याच्या दर्शनी भागांत कै. प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांचें बिऱ्हाड होतें; व आंतल्या मुख्य इमारतींत रानडे मंडळी रहात असत. वाड्यांत प्रवेश करतांनाच उजव्या बाजूच्या माडींतील आरामखुर्चीवर रेलून गप्पा मारीत असलेली प्रो. पटवर्धन यांची जराग्रस्त मूर्ति दृष्टीस पडत असे. त्यांचे ते आवेशयुक्त हातवारे, डोळ्यांतील उपरोधाची चमक आणि त्याहिपेक्षां किंचित् विकट भासणारें हास्य यांचा विसर मला कधींही पडणार नाहीं. एकाद्या जुनाट, वठून चाललेल्या वृक्षाच्या निष्पर्ण फांद्यांची हालचाल आणि त्यांचें गांठियाळ खोड पाहून ज्या प्रकारचे उदास विचार मनांत येतात, तसेंच कांहीं तरी त्यांना बघून माझ्या मनाला वाटे. उलट आंत गेल्यावर रानडे दंपत्याचा टुमदार संसार पाहिला म्हणजे मन कसें प्रसन्न होत असे !

रानडे दंपत्याविषयीं मनांत कुतूहल उत्पन्न करणाऱ्या किती तरी गोष्टी मी मुंबईस असतांना कै. अनंततनय, श्री. माधवराव काटदरे आणि श्री. प्र. के. अत्रे यांच्या तोंडून ऐकल्या होत्या. त्यांच्या कवितेंपेक्षांही त्यांचें काव्यमय प्रणयजीवन हा त्यावेळीं एक मोठाच कौतुकाचा विषय होऊन बसलेला होता. त्यामुळें

रानडे दंपत्याचा संसार पहाण्याची आणि विशेषत: सौ. मनोरमाबाईंना भेटण्याची मला साहजिकच फार उत्कंठा लागली होती. प्रो. रानडे यांच्याशीं माझी ओळख अनंततनयांच्या घरीं झाली; व त्याच वेळीं, मला वाटतें, त्यांनीं मला आपल्या घरीं येण्याचें आमंत्रण दिलें. त्या आमंत्रणानुसार मी, आषाढांतील एका सायंकाळीं, अनंततनयांच्या बरोबर त्यांच्या घरीं गेलों.

वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावर रानडे मंडळीची बैठकीची जागा होती. ही जागा म्हणजे कवि आणि वैज्ञानिक या प्रो. रानडे यांच्या दुहेरी भूमिकेचें एक छोटेखानी प्रदर्शनच होतें. निरनिराळ्या प्रकारचीं पुस्तकें, फोटो, चित्रें, पुतळे, वस्तु यांची किंचित् अव्यवस्थित पण मनोवेधक मांडणी त्या जागेंत केलेली असावयाची. रानडे हे काव्यकलेप्रमाणेंच मूर्तिकलेचेहि नादी आहेत; व अर्धवट तयार केलेला आपला एखादा ओला पुतळा घेऊन जेव्हां ते त्याचें रूप विशेष विशद करीत, तेव्हां त्या पुतळ्यापेक्षांहि त्यावर व्याख्यान देणाऱ्या त्या हौशी मूर्तिकाराच्या गंभीर आणि कल्पक मुद्रेवरच माझें लक्ष जास्त स्थिर होत असे. त्यांच्या लहानशा चेहऱ्यांत त्यांचे डोळेच विशाल आणि वैशिष्ट्यदर्शक आहेत; व जिज्ञासा, गांभीर्य आणि विनोद यांच्या ज्या छटा बोलतांना त्यांच्या डोळ्यांत एकामागून एक झर्रकन उमटत, त्यामुळें त्यांच्या संभाषणाइतकेंच त्यांचें व्यक्तित्वहि आकर्षक वाटे.

नानांच्या मानानें सौ. मनोरमाबाई या मला त्या पहिल्या भेटीच्या वेळीं तरी कमी आकर्षक वाटल्या. मुंबईस असतांना, एलिझाबेथ ब्राउनिंगचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून, त्यांच्याविषयीं ज्या काव्यमय कल्पना मी मनाशीं केल्या होत्या, ज्या साऱ्या कल्पनांचा चुराडा त्यांना प्रत्यक्ष पाहिल्यावर झाला. नानांच्या मानानें त्या किती तरी काळ्या होत्या; व इतर दृष्टींनींहि त्यांची गणना कुरूपांतच होण्यासारखी होती. शिवाय त्या दिवशीं त्या बोलल्याहि नाहींत मुळींच. एक गोष्ट मात्र माझ्या त्याहि वेळीं लक्षांत आली. त्यांची कविता सुश्लिष्ट, संस्कृतप्रचुर आणि भावपूर्ण होती; व एलिझाबेथच्या सुनीतांतील भावनेची उद्दाम उत्कटता किंवा आर्तता जरी तींत नव्हती, तरी अंतर्गूढ प्रणयभावनेचा शालीन आणि मनोज्ञ असा आविष्कार त्यांच्या कवितांतून दृग्गोचर होत असे. त्या प्रणयभावनेची कोमल दीप्ति त्यांच्या खोल पण सतेज

डोळ्यांत दिसल्याशिवाय राहिली नाहीं; व त्या प्रणयी युगुलाचा निरोप घेऊन घरीं परत येत असतां,

नव्हती सुंदर इंदुसारखी
रूपाचा मी नव्हेच शोकी
ठरवो वेडा मज या लोकीं !
दिव्यत्वाची प्रतिभा मजला मोहवि, कळलें अतां पुरे !

या मनोरमाबाईंच्या एका सुंदर भाव-कवितेंतील ओळी राहून राहून माझ्या मनांत घोळत होत्या.

त्या प्रणयभावनेमुळेंच रानडे दंपत्याच्या संसाराला एक प्रकारचें विलोभनीय माधुर्य आलें होतें.

रानडे यांच्यांशीं लग्न झाल्यावर स्वतःचा आणि माहेरचाहि ओढगस्तीचा संसार सांवरण्यासाठीं मनोरमाबाईनीं नोकरी करून कांहीं काळ कष्टाचें जीवन कसें आनंदानें काढलें, याचीं वर्णनें मी बरींच ऐकलीं होतीं. त्यांच्या या कष्टाळू, प्रेमळ पण किंचित् तापट स्वभावाची प्रतीति रानडे मंडळीशीं निकट संबंध आल्यावर मला जास्त जास्त येत गेली. त्यांच्याइतकी गृहधर्मात दक्ष असलेली सुशिक्षित गृहिणी मी अद्याप दुसरी पाहिलेली नाहीं. त्यांच्या प्रेमळपणाचा एक प्रसंग मला नेहमीं आठवतो. १९२३ च्या ऑगस्टमध्यें आम्ही कांहीं स्नेही मंडळी बोरघाट पहाण्याला गेलों होतों. भर पावसाळ्याचे दिवस होते ते. दिवसभर पावसाचें सतत कोसळत असलेलें पाणी अंगावर घेत आम्ही घाटावर यथेच्छ हिंडलों; व रात्रीं नऊच्या सुमारास पुण्यास परत आलों. मनोरमाबाईनीं तेवढ्या रात्रीं आम्हांला गारठ्यामुळें वळूं लागलेले पाय शेकावयाला गरम पाणी दिलें; व उन्हउन्हीत, सुग्रास जेवणाची तयारी केली. त्यांची आतिथ्यपरता हा आमच्या रविकिरणमंडळाचा मोठाच आधार होता, असें मी म्हटल्यास तें खचित गैर होणार नाहीं. कारण, त्यावेळीं, डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, ते स्वतः, यशवंतराव, द. ल. गोखले आणि मी असे मंडळाचे चार सभासद 'अनिकेत' ( Homeless ) होतों; व त्यामुळें मनोरमाबाईंच्या सदासिद्ध सुग्रण 'थाळी' चें आम्हांला मोठेंच आकर्षण वाटे. आणि, मंडळाच्या साप्ताहिक सभा जरी कांहीं एका क्रमानुसार निरनि-

राळ्या सदस्याकडे भरत, तरी प्रात्याहिक अशा अनौपचारिक सभांची वर्दळ मात्र नानांच्याच घरीं असे.

रानडे दंपत्याच्या कवितेपेक्षां त्यांचें जीवन जसें अधिक काव्यमय होतें, त्याचप्रमाणें त्यांच्या स्वतःच्या काव्यस्फूर्तीपेक्षां इतरांना काव्यस्फूर्ति देण्याची किंवा इतरांच्या काव्यस्फूर्तीला वळण लावण्याची त्यांची शक्ति अधिक मोठी होती. रविकिरणमंडळ स्थापन करण्याची कल्पना कोणाच्याहि मनांत उगम पावलेली असो, पण ही गोष्ट मात्र निःसंशय कीं नानांची कल्पकता आणि जिजींची सहृदयता यांनींच त्या मंडळाची जोपासना प्रारंभीं केली. याहिपेक्षां त्या दंपत्याची जास्त महत्त्वाची कामगिरी म्हणजे यशवंतांच्या असंस्कृत प्रतिभेच्या विकासाला त्यांनीं केलेलें हळुवार सहाय्य. तो दऱ्याखोऱ्यांतला कवि ज्यावेळीं चाफळहून पुण्यास आला, त्यावेळीं त्याची उज्ज्वल प्रतिभा खरोखरच अगदीं रानवट होती. पण नाना आणि जिजी यांनीं त्यांच्या प्रत्येक कवितेवर गोड शब्दांनीं टीका करून, त्यांना नवीन कल्पना सुचवून आणि नव्या जगाशीं त्यांचा नाना परींनीं परिचय करून देऊन त्यांच्या कवितेला सुंदर वळण लाविलें. दोघांचेंहि यशवंतांवर बंधुतुल्य प्रेम होतें; व नाना पुण्यास असेपर्यंत त्यांचें घर हा यशवंतांच्या तत मनाला एक मोठाच विरंगुळा होता. सौ. मनोरमाबाईंना गृहकृत्यांत मदत करीत करीत नानांनीं यशवंतरावांच्या काय, माधवरावांच्या काय किंवा शंकररावांच्या काय कवितांवर केलेल्या मार्मिक टीकेचे कितीतरी हृद्य प्रसंग मला आठवतात. मनोरमाबाई थोड्या स्पष्ट, तापट आणि मतप्रदर्शनाच्या बाबतींत सुद्धां एककल्ली असत. उलट नाना वस्ताद, मिस्किलपणानें हंसत हंसत दोष दाखविणारे आणि गोड शब्दांनीं आपली कल्पना दुसऱ्याच्या गळीं उतरविणारे. नाट्यछटाकार दिवाकर, गिरीश, माधव-जूलियन, द. ल. गोखले, अज्ञातवासीप्रभृति जी मंडळी त्यांच्याकडे नेहमीं येत, त्यांच्या लिखाणावर रानडे दंपत्याची सूक्ष्म टीका नेहमीं चालावयाची व या ऋणानुबंधी लेखकांच्या वाङ्मयाला वळण लावण्याचें अज्ञात कार्य रानडे दंपत्यानें जसें त्यांना तसेंच स्वतःलाहि नकळत केलें आहे, असें म्हटल्यास तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

नानांची दृष्टि जशी रसग्राही आणि मार्मिक तशीच शास्त्रीयही कशी आहे, याची एक मजेदार आठवण मी कधींही विसरणार नाहीं. रविकिरण-मंडळानें

जेव्हां सुनीतरचनेच्या प्रश्नांत ईर्ष्येनें मन घातलें, तेव्हां मीही कांहीं सुनीतें लिहिलीं व तीं नाना आणि जिजी यांना आवडलींही. त्यांपैकीं 'शुक्रतारा' या सुनीतांतील.

**किंवा ज्यांतुनि इंदिरा प्रगटली तें दिव्य हेमांबुज**
**या गंभीर अथांग सिंधुवरती शून्याचिया शोभतें**

या चरणांत शुक्राला दिलेली हेमांबुजाची उपमा विशेषतः डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं चुकीची ठरविली. त्यांचें म्हणणें असें पडलें कीं, शुक्राची द्युति शुभ्र असल्यामुळें त्याला हेमांबुजाची उपमा देणें योग्य होणार नाहीं. यावर माझें उत्तर असें होतें कीं, शुक्र ज्या वेळीं क्षितिजावर उतरतो, त्या वेळीं त्याच्या कान्तींतील शुभ्रता लोपून जाऊन तिला पिवळसरपणा येत असल्यामुळें त्याला हेमांबुजाची उपमा देण्यांत कांहींही चूक नाहीं. नानांना माझें हें उत्तर शास्त्रीय दृष्टीनें अगदीं समर्पक वाटलें. पण हा वाद दृक्प्रत्ययानेंच तुटण्यासारखा होता. कर्मधर्मसंयोगानें त्या दिवशीं रात्रीं आम्ही सारेच येरवड्याला यशवंतांकडे जेवायला गेलों; व तिथेंहि पुन्हा हा वाद खूपच रंगला. जेवणानंतर आम्ही जेव्हां बाहेर अंगणांत आलों, तेव्हां क्षितिजावर उतरलेला शुक्र भोंवतालच्या विद्युद्दीपांच्या रांगांत खपून जाईल इतका पिवळसर दिसत होता. त्याच्याकडे बोट दाखवून नाना उद्गारले, 'अहो माधवराव, हा शुक्र पहा! गजाननरावांची उपमा अगदीं बरोबर आहे!' मला केव्हां केव्हां असें वाटतें कीं, विज्ञानाच्या गाढ अभ्यासामुळेंच नानांची कवित्वशक्ति मंदावली आणि त्यांच्या वृत्तींत विलक्षण चोखंदळपणा आला. नाना आणि जिजी यांना एखाद्या नव्या कवितेवरून कवीची उलटतपासणी करितांना पहाणें ही एक मोठीच बौद्धिक करमणूक असे; व रविकिरणमंडळांतील कवींच्या लिहिण्यांत जो सर्वच प्रकारचा रेखीवपणा आढळतो, त्याचें श्रेय अंशतः तरी रानडे दंपत्याच्या मार्मिक टीकेला द्यावें लागेल.

रानडे दंपत्यानें प्रणयाच्या वासंतिक बहरांत काय कविता लिहिल्या असतील तेवढ्याच. नंतर कांहीं फारशा कविता लिहिल्या नाहींत. पण त्यांचें जीवन हेंच मुळीं एक मधुर काव्य होतें. साहित्यिकांच्या ठिकाणीं सामान्यतः आढळणारा क्षुद्र अहंभाव आणि तज्जन्य मत्सरबुद्धि यांनीं त्यांची रसिकता डागळलेली

नव्हती; व त्यामुळें त्यांच्या सहवासांत अत्यंत विशुद्ध अशा उच्च बौद्धिक आनंदाचा लाभ घडत असे. स्वतःच्या कवितेविषयीं किंवा जीविताविषयीं त्या उभयतांना आपण होऊन बोलतांना मी कधींहि ऐकलें नाहीं. वस्तुतः रानडे दंपत्य हें पराकाष्ठेचें आत्मपर होतें. कित्येकांची आत्मपरता अशी असते कीं, स्वतःच्या स्तुतीबरोबर इतरांचा अधिक्षेप केल्या-ऐकल्याशिवाय त्यांना आपलें कोडकौतुक पुरें झाल्यासारखें वाटत नाहीं. रानडे यांची आत्मपरता तशा प्रकारची नव्हती. स्वतःच्या आंतरजीवनाविषयीं कधीं न बोलण्यांत जशी त्यांची अभिजात अहंता एका परीनें प्रकट होत असे, तशीच दुसऱ्या परीनें इतरांच्या कलाकृतींची बूज करून त्यांना मार्मिक प्रोत्साहन देण्यांतहि ती दिसून येत असे. आत्मपरतेचा खरा सात्त्विक आनंद हा स्वतःच्या विकासाबरोबर इतरांच्या विकासाला हातभार लावण्यांत असतो. केवळ परनिंदामिश्र अशा आत्मगौरवांत नव्हे. रानडे दंपत्याच्या या विशिष्ट आत्मपरतेमुळें त्यांचें घर हें पुण्यांतील कलाप्रेमी व्यक्तींचें संकेतस्थान होऊन बसलें होतें; व कमलाच्या गाभ्यांत जशी त्याच्या परिमलाचा परिपोष करणारी कर्णिका असते, तसें त्यांचें घर हें त्या वेळीं महाराष्ट्र शारदामंदिराच्या निरनिराळ्या चळवळींना प्रेरणा देणारें केंद्र होतें.

रानडे दंपत्यांची ही आत्मपरता इतकी उत्कट होती कीं, त्यांना एकमेकांपलिकडे दुसरें जग नव्हतें म्हटलें तरी शोभेल. त्यांच्या आतिथ्यशीलतेचें जें वर्णन मी केलें आहे, त्याच्याशीं हें विधान विसंगत वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुतः तसें नाहीं. मनुष्याची स्वार्थाची काय किंवा सुखाची काय कल्पना जितकी बौद्धिक आणि व्यापक असते, त्या मानानें त्याला इतरांच्या साहचर्याची आवश्यकता जाणवते; व त्यामुळें तो साहजिकच आतिथ्यशील आणि स्नेहसुलभ बनतो. रानडे दंपत्याची आतिथ्यशीलता याच प्रकारची होती. एरवीं त्या दोघांना आपला संसार आणि लग्नानंतर पुष्कळ वर्षांनीं झालेली आपली मुलगी सुधा याच्या पलिकडे दुसऱ्या कशांतहि रस नव्हता. या त्यांच्या आत्मपरतेचें आल्हाददायक दृश्य मी अनेकदां पाहिलें आहे. नाना आणि जिजी हीं एकमेकांशीं बोलत आणि विशेषतः सुधेशीं खेळत असलीं म्हणजे त्यांना इतरांच्या जाण्यायेण्याचें फारसें भान नसे. 'काव्यविचारा'च्या प्रकाशनानंतर गोविंदाग्रजांच्या कवितेविषयीं आम्ही सारे मोठमोठ्यानें बोलत असतां, सुधेला खेळवीत असलेल्या मनोरमाबाईंचें त्या बोलण्याकडे दुर्लक्ष असल्याचें बघून

मी त्यांना सहज गंमतीनें म्हटलें, " मनोरमाबाई ! तुम्हाला सुधा जवळ असली म्हणजे दुसरें कांहीं सुचत नाहीं ! " तेव्हां त्या हंसून म्हणाल्या, " खरं आहे तुमचं म्हणणं ! आमची सुधा म्हणजे चालती बोलती कविता आहे ! " आणि खरोखरीच सुधा ही त्यांच्या संसाराची मूर्तिमंत सफलता, त्यांच्या प्रणयजीवनांतील चालतें बोलतें काव्य नव्हतें काय ? स्वतः नानांनींच आपल्या ' ओढणी ' या हृदयंगम कवितेंत म्हटलें आहे—

**संध्येंतली रमणीयता, तारांतली चिरशांतता**
**उन्माद सौगंधांतला, गानांतली मधुखिन्नता**
**जमवून हीं दुहितामिषें निज शैशवांतिल माधुरी**
**सुचवीत, आकर्षी मला प्रेमोत्सुका गृहिणी घरीं !**

श्रीधर-मनोरमेच्या वात्सल्ययुक्त प्रणयजीवनाचें मर्म इतक्या सुंदर रीतीनें दुसरा कोण विशद करूं शकेल ?

२७।३।३९.
शांतिनिवास,
नागपूर शहर

**ग. त्र्यं. माडखोलकर**

४ एप्रिल, १९३९ चेंबूर.

या बागेंत सकाळच्या वेळीं सगळीकडे कसें शांत आहे ! चिमण्यांच्या चिंव-
चिवाटांत मध्येंच कावळ्याची कावकाव मिसळत आहे. सुतार मैना यांचे
विचित्र आवाज मनाला व्यग्र करीत आहेत. एक लालकुची बुलबुल शेंपूट
खालींवर करीत थोड्या अंतरावर बसून माझ्याकडे आश्चर्यानें बघत आहे !
डोक्यावर आंब्याची डहाळी कैऱ्यांनीं वांकली आहे. दूरच्या झाडावरची
कोकिळेची साद मनाला उत्कंठा व हुरहूर देत आहे. पायाजवळच्या फुलांवर
मधमाशा गुंगत आहेत. नाकतोड्यांची कर्कश किरकिर मध्येंच उठत आहे.
जवळच्या काडीवर चतुर किडा माझ्या सारखाच निश्चल बसला आहे. उंच
झाडावरच्या शेंड्यावर बसलेलें घारीचें जोडपें पाहून मनाला उद्वेग येत आहे,
आणि 'पिकगान,' 'काननीं जाउनी राहूं' या कवितांतलीं दृश्यें पहात मी
एकटाच गतायुष्याचा चित्रपट निरभ्र, चकाकणाऱ्या आभाळावर पहात
उदासवाणा पडलों आहें !

* * *

आज कुंदाचा वाढदिवस ! आपल्या आईप्रमाणें ड्रॉईंगची दुसरी परीक्षा
तीच देऊन, कवितासंग्रहाच्या दर्शनी पानावरील चित्र तिनें काढलें आहे.
आईचें आयुष्य तरी तसेंच नव्हतें का ? कळी उमलून, रविकिरणांत हंसणारें,
सायंकाळीं पाकळ्या गाळीत दुःखाश्रू ढाळणारें कमल मागें आपली सुगंधी स्मृति
ठेवून कालसरोवरांत अंतर्धान पावलें. आणि आतां दुसऱ्या प्रेमळ समजूतदार
कमलाच्या अडोश्याला दोन लहान लहान कळ्या आपलें आयुष्य सुरू करीत
आहेत ! किती सूचक आहे चित्र हें ! उगीच दुःख कशाला करायचें ! आपण
आतां **आज** आहों, पण उद्यांची शाश्वती नाहीं, या पावसाळ्यांत डुलणारें
गवत उन्हाळ्यांत नाहीं, आजचें फूल उद्यां नाहीं. सर्व जिवंत सृष्टि त्यावेळीं
होती तशीच आज दिसते. तेंच ते घटक दिसत नाहींत एवढेंच ! नद्या,
सागर, डोंगर सुद्धां शाश्वत नाहींत. तारे असतील, जास्त दिवस अचल व न
ढळतां राहत असतील; पण ते दूरचे महासूर्य ! त्यांचा आणि आपल्या मर्त्य
जीवांचा काय संबंध ! त्यांची ज्वलत् शाश्वती मनाचा जास्त दाह मात्र करते.

* * *

'The proper study of Mankind is Man' ( मानववंशाचा खरा अभ्यास करायचा असेल तर मनुष्यांचेंच निरीक्षण करा ) असें पोपकवी म्हणतो. मी म्हणतों 'स्वतःचेंच निरीक्षण करूंया.' १९१२ ते १९३९ च्या सत्तावीस वर्षांच्या एका पिढीच्या काळांत स्वतांतच किती फरक पडला. तरी पण मनाचा बालिश खेळाडूपणा गेला नाहीं. तरुणपणांतील रोम्यांटिक मंचरवृत्ति, (माझ्यावरून हा शब्द आला असा डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं गौप्यस्फोट केलेलाच आहे.) स्वतःची गोड फसवणूक करून घेण्याची, डोळे मिटून कल्पनेनें सहारास नंदनवन समजण्याची प्रवृत्ति अजून पूर्वीसारखी आहे. एका बाजूला वेदान्तानें मनाला समाधान वाटत नाहीं तर व्यावहारिकपणानें सर्व कांहीं करून दुःखाचें अवडंबरही माजवितां येत नाहीं.

* * *

मी सुद्धां इतर कांहीं कवींप्रमाणें गतपत्नीच्या कविता, पूर्वींच्या बेताप्रमाणें १९२६ सालींच प्रसिद्ध केल्या असत्या तर त्यावेळीं काय काय लिहिलें असतें याची चांगली कल्पना येते ! त्यावेळची मनःस्थिति किंवा त्यानंतर दोन अडीच वर्षें लहान मुलींचें खस्ता खाऊन लोकांची हेटाळणी ऐकत केलेलें संगोपन हा 'देखावा' नव्हता खास. पण एका गोष्टीचा उलगडा होऊन मनाला असह्य वेदना होऊं लागल्या. १९१२–१३ सालीं ज्या प्रणयाच्या भावना उत्पन्न झाल्या त्या यौवनसहज व रोम्यांटिक विचारप्रणालींतून उगम पावल्या होत्या. डोंगरावरच्या उथळ घळींतून वाहणारा तात्कालिक पूर आणणारा ओढा होता. त्यांत जिवंत झऱ्याचें अखंड जीवन नव्हतें. त्या प्रेमतरूचीं मुळें जीवनाच्या गूढ भागांतून पसरलेलीं नव्हतीं. मला भीति वाटते कीं बहुतेक तरुणांचें प्रेम असेंच असतें. त्या भंगुरतेची त्यांना जाणीवच नसते. एवढेंच काय तर लोकांच्या अडथळ्यांनीं, प्रणयिनीच्या खऱ्या व स्थिर प्रेमाच्या निर्धारानें, संकटें सोसण्यास तयार झालेला, नंतर फलपुष्पांनीं बहरलेला तरु खरोखरच स्थिर आहे, त्याचीं मुळें दूरवर पसरलीं आहेत अशा भ्रामक समजुतींत बिचारा तरुण असतो. निदान येथें तरी तशीच स्थिति होती. सुदैवानें सर्व गोष्टी सुरळीत पार पडल्या. वधूपित्यानें आपल्या सर्व मनीषा बाजूस ठेवून मुलीवरील प्रेमानें दिलेली संमति, वरमातेचा पहिल्यापासून दोघांना प्रेमळ पाठिंबा, वरपित्याचा पोटविवाहास सनातनी प्रामाणिक विरोध असल्यामुळें जबर हुंड्याची मुद्दाम

घातलेली अट, मुलाचें काकुळतीचें निश्चयाच्या निर्वाणीचें पत्र मिळतांच वात्सल्यानें दिलेली व तारेनें पाठविलेली संमति, सुनेच्या पायगुणानें मुलावरचें प्राणसंकट टळलें या समजुतीनें दृढ झालेलें सासऱ्याचें प्रेम—या वेळची मनःस्थिती खोटी कशी ? याच मनःस्थितींत कवयित्रीनें 'हुंडाच' ही कविता लिहिली. श्री. कृ. कोल्हटकरांबरोबर भेटण्यास आलेल्या श्री. मामा वरेरकरांनीं, 'हाच मुलाचा बाप' या नाटकांतील डॉ. गुलाबच्या चित्रणांत आपण या घटनेचा उपयोग केला असें १९२१ सालीं सांगितलें.

याच मनःस्थितींत निर्भीडपणें कवीनेंही आपल्या खंडकाव्यांत आपलें प्रेमजीवन प्रकट केलें.

या प्रेममय जीवनास सुखदायी करण्यास अनेक कारणें झालीं. लग्नापूर्वी व नंतरही सहस्रबुद्धे कुटुंबानें-विशेषतः सौ. मनूताई कोल्हटकर यांनीं कामंदकीप्रमाणें सहाय्य केलें. हरीभाऊ आपटे, तात्यासाहेब केळकर, दिवाकर, वासुदेवराव पटवर्धन, कऱ्हाडचे पाठक व 'आनंदीरमण' हर्षे, तळेगांव कारखान्याचे जोशी व बिजली भागवत, नेपथ्यपाठकार खंडेराव कुळकर्णी, मनोरंजनचे 'मित्र,' रेंदाळकर, नागेश, सुमंत, अनंततनय, गडकरी, ठोमरे, टेकाडे, बेहेरे, शं. के. किर्लोस्कर, उद्यानकार कुलकर्णी इत्यादि थोर मंडळींनीं कौतुक केलें. बिकट परिस्थितींत पत्नीचा निर्धार व हळुवारपणा जास्त प्रचीतिस येऊन आपलेंहि प्रेम उच्च दर्जाचें आहे असा भ्रम झाला. कॉलऱ्यानंतर आलेल्या मेंदूच्या व हृदयाच्या अशक्तपणामुळें आलेलें परीक्षेंतील अपयश, सासऱ्यावरील पैशाचें ओझें हलकें करण्यासाठीं सहा महिने पत्नीनें अत्यंत कष्टांत केलेली शिक्षकिणीची अल्पवेतनी नोकरी; वडील बंधूनें नंतर दिलेलें आर्थिक सहाय, डेमॉन्स्ट्रेटरच्या अवघ्या ४०-४५ रुपयांत केलेला टुमदार संसार, चिमुकल्या मुलीचें दृढ प्रेमबंधन, शेवटीं सुखाचे दिवस येऊन शेतकी खात्यांत संशोधन वृत्ति मिळून डॉ० बाबासाहेब देशपांडे, रविकिरणमंडळ यांची ध्येयप्रधान संगति लाधून आपण खरोखरीच चांगलें असलों पाहिजे म्हणूनच 'दुःखानंतर सुख' मिळालें असें वाटूं लागलें पण हें सुखस्वप्न फार दिवस टिकलें नाहीं. एके दिवशीं वज्राघात झाला आणि मन सुन्न झालें. नारळीचा उंच वृक्ष कोसळून पडला व मुळें उघडीं पडलीं.

* * *

रोम्यांटिक विचारांत उत्पन्न झालेलें, सहवासानें नकळत वृद्धिंगत झालेलें तें प्रेम म्हणजे केवळ नकली मुलामा होता, याची जाणीव हळूहळू होऊं लागतांच अंत:करणाला तीव्र वेदना होऊं लागल्या. व्यावहारिक रीतीनें दुसरा संसार थाटण्याचा विचार सहन होईना. इतरांची दिशाभूल होऊन होत असलेली स्तुति किंवा सहानुभूति मनाला टोचूं लागली. अशा स्थितींत दोन वर्षें निघून गेलीं.

*　　　*　　　*

एक गोष्ट मात्र खरी. ती कोणास पटो वा न पटो. तारुण्यांत उत्पन्न झालेलें स्त्रियांचें प्रेम खरें, स्थिर व निस्वार्थी असतें. सर्वस्व देणारें असतें. आणि पुरुष ! त्याचें प्रेम गद्धेपंचविशीचा–रोमान्सचा भर ओसरल्यावर, आयुष्याचा प्रवाह स्थिर झाल्यावर उत्पन्न होतें. पत्नीवरच तें स्थायी झालें तर त्याच्यासारखा सुखी तोच. पण जर कां तें दुष्प्राप्य वस्तूवर स्थिरावलें तर त्याच्यासारखा दुर्दैवी तोच. जन्मभर त्याच्या नशीबीं शिशिर ऋतु ! त्याच्या मानसिक यातना त्यालाच माहिती ! इतरांना सांगून कसें कळणार. नसती हेटाळणी मात्र व्हावयाची !

आणि अशी त्रिशंकूसारखी स्थिति झाली, आपल्यावर गाढ प्रेम करणारी व्यक्ति हरवली, आपल्या हांवऱ्या मनाला मिळालेलें ओंठावर पडलेलें जांभूळ तिरस्कारानें हंसत दूर आटोक्याच्या बाहेर घरंगळत गेलें; असें झालें म्हणजे एकाद्या वायुजीवि आमऱ्याप्रमाणें ( orchid ) मनुष्य एकाद्या सहानुभूति बाळगणाऱ्या वृक्षशाखेचा आधार घेऊन जीवित कंठूं लागतो. सुदैव अजून सोडून गेलें नसल्यामुळें, पूर्वींचे लागेबांधे उदार सुहृदांनीं कायम ठेवल्यामुळें, पूर्वींची डोळे झांकून सुख मानणारी रोम्यांटिक वृत्ति रक्तांतच भिनलेली असल्यामुळें, तो कालक्रमणा करूं लागतो. पण पूर्वींचीं सुखदुःखें जागेपणीं किंवा स्वप्नांत त्याचा पिच्छा सोडीत नाहींत. राखेच्या ढिगाऱ्यांतील स्फुलिंग विझत नाहीं. बैरागी संसारी, सज्जनाचा मुलामा दिलेला दुर्जन, व नकली नाणें हीं स्वत:ला पुरेपूर ओळखून असतात.

*　　　*　　　*　　　*

भूगर्भातील ज्वालामुखीप्रमाणें हिरवळीखालीं अशीं अनेक स्थित्यंतरें होत असतां भाबड्या प्रेमळ पत्नीनें मनःपूर्वक केलेली काव्यमय स्तुति कोणत्या तोंडानें

प्रसिद्ध करावयाची ? ज्ञानप्रकाशांत कवि माधवराव काटदरे यानीं लिहिलेल्या 'तुम्ही कोण' या सुनीतांतील 'लैली देवि मनोरमे ! असिस तूं, तूं श्रीधरा मज्नुन !' या ओळी अजून कसा मनस्ताप देतात हें लोकांना कसें पटावें ? पत्नीविरहामुळें नव्हे तर स्वतःच्या अपात्रतेमुळें आपण कविता प्रसिद्ध करण्यास कचरतों हा सत्याचा प्रयोग कथन करण्याचें धाडस बळेंच कुठून आणावयाचें ? १३ वर्षें अशी चालढकल केली.

* * *

पण 'कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली,' मातापितरांना हट्टानें संमति देण्यास लावून मिळविलेल्या, कष्टमय स्थितींत एक तप घालविणाऱ्या सोबत्यास आपण अवघ्या तीन वर्षांत विसरलों एवढेंच नाहीं तर आपल्या चमत्कारिक वागणुकीनें आपण कोणासही क्षणभर सुख दिलें नाहीं, याची डोळे उघडणारी जाणीव १० मार्चला एकदम झाली. आदर्श दंपती नव्हे तर एका सामान्य जन्मभर रोम्यांटिक राहणाऱ्या एका वेड्या तरुणाच्या संगतींत एका प्रेमळ कवयित्रिनें कसें आयुष्य कंठलें हें दर्शविणाऱ्या कविता प्रसिद्ध कराव्या असा मनानें एकदम धोशा घेतला. हातावर चेष्टेनें गोंदलेल्या नांवाप्रमाणें नांवांची संयुक्तता उरली आहे. पूर्वी नियोजल्याप्रमाणें दोघांच्या कविता एकत्रित केल्या आहेत.

प्रेमी युगुलें एकमेकांस निःशंकपणें पत्रें लिहितात. काव्यांत मेघ व हंस दूतांचें काम करतात. जेथें रसिक भोळा मित्र पत्रवाहकाचें काम अजाणतः करतो तेथें कवितांतूनच मनोगत कळविणें भाग ! १९१२–१३ सालांतील दोघांच्या बऱ्याच कविता पत्रोत्तरेंच आहेत. रसिकांना कळून आनंद झाला तर वाहवा. नाहींतर त्या कवितापत्रांचें कार्य पूर्वीच उरकलें गेलें आहे.

गतकालांतील सुखाच्याही स्मृतींनीं मनाला वेदना होतात. जेथें रा. द. ल. गोखल्यांना एक अक्षर लिहावेंसें वाटलें नाहीं तेथें एका अपराधी मनुष्यास सर्व आठवणी कशा उकरून काढाव्याशा वाटतील ?

संग्रह प्रसिद्ध करतांना, स्वतःचें हंसें होईल ही जाणीव असूनही हीं मानसिक स्थित्यंतरें प्राञ्जलपणें निवेदन केल्याशिवाय चैन पडेना. कवयित्रीचें उज्वल निर्हेतुक प्रेम व स्वयंस्फूर्त कविता, या आपल्या काळ्याकुट्ट पार्श्वभूमीवर उठून दिसेल एवढेंच या 'श्री' कवितांना अखेर समाधान !

* * * *

...जी शांति मनाला आयुष्यभर लाभली नाहीं ती मला आतां या सायंकाळीं जुहूच्या वाळूंत अनुभवण्यास मिळत आहे. पूर्वी आगगाडीच्या प्रवासाची दगदग सोसून उन्हांतून दोन मैल रस्ता पायानें तुडवीत आम्ही दोघें येथें येऊन सृष्टिसौंदर्य पहात बसत होतों. सोनापुरांत जड मनानें उचललेला अश्मा याच लहरींत विसर्जन केला. अशा अनेक कारणानीं कामावरून घरीं परत जातांना बाजूला वळून भर पावसांतसुद्धां येथें येऊन दोन मिनिटें उभें रहावेंसें वाटतें. हिरव्यागार सृष्टीकडे पाठ करून सागरिकेचें व नभाचें अनंतांत मीलन करणारें क्षितिज पाहून मनाला थोडीशी स्थिरता येते. क्षणापूर्वी दिसणारें मोठें व लाल सूर्यबिंब खालीं जाऊन नभाच्या बदलत्या रंगच्छटांना सागरजलांत प्रतिध्वनि मिळतो. वाढणारा अंधार हळू हळू कमी होत चंद्राच्या प्रकाशांत खुलणाऱ्या खळखळत फुटणाऱ्या लाटा, मनाच्या क्षोभाला सहभावानें आंदोलनें देत हळू हळू शांत करतात. फुटणाऱ्या लाटांवर चंद्रप्रकाशांत चक्कन् चमकत रुपेरी तार नाचत नाचत दूर जाते आणि ‘ ये माझ्या मागें ’ असें सुचविते. ओहटीचें पाणी सागराच्या अंतरींची ओढ सुचवितें. उदास विषण्ण मनाला क्षणिक सहवासाची मिळालेली देणगीच मोलाची वाटते. स्तुतिनिंदेची किंवा उपहासाची आपण तरी कां पर्वा करावी, जन्माची इतिकर्तव्यता प्रेमामुळें झाली असें वाटून मरणाचें कठीण दिव्य केलेला जीव, स्तुतिनिंदेच्या पलीकडे गेला तर सहवासानें पुनीत झालेल्या, स्वर्गीय प्रेमाचें अधिष्ठान झालेल्या मृतप्राय जीवानें तरी दुःख करीत दुसऱ्यांना विनाकारण कां दुखवावें ? क्षोभानें वर आलेलीं मोत्यें पुन्हां सागरतळीं जातात. पण रिकाम्या शिंपा व हास्यधवल फेस नाचत नाचत किनाऱ्यावर सूर्यकिरणांत हांसत चमकत पडतातच ना ? दुःखविस्मृतीचा अर्ध्य, भंगलेल्या क्षुद्रहृदयाचा तीलांजलि मावळत्या तारेस देऊन परत जगांत येऊन हा विचित्र मानव प्राणी उर्वरित आयुष्य हंसतमुखानें कंठण्यास परत भरल्या जगाकडे तोंड वळवतो.

जुहू. ४-४-३९ **श्रीधर**

~~~~~~~~~~
~~~~~~~~~~

# अनुक्रमणिका

## मनोरमा

## १ पिकास उद्देशून

“ पिका ! तूं धरी सज्जनांचीच मैत्री,
असे पूर्ण ही दुर्जनांनीं धरित्री
अमूल्या गुणा दुर्मती नादरीती,
परी त्यांस निंदावया सज्ज होती !
वृथा तूं करीशी वनीं या सुगान
तुला या नसे मूढ लोकींही मान;
तुला मानिती लोक काकासमान
अशी अप्रतिष्ठा असे काय सान ?
सदा बैसुनी आम्र-वृक्षैकदेशीं
जनां कूजनें मोद देशी प्रदेशीं
जनां मोद देशी सदा होत कष्टी
परी साध्य नाहीं जगीं पूर्ण तुष्टी !
म्हणुनि अवनिलोकां सोडुनी जाइं नाकीं
सुर तव मधुरा जी ऐकतील त्वरें कीं
अरसिक जन नाशा पावती जेधवां या
तधि अवतर भूमीं सूज्ञ लोकांस धाया ”
हे सूज्ञांनो विनवुं भजनें ईश्वरा सर्व आतां
कीं दुर्वृत्ता तिमिरसम या सत्वरीं नाशि ताता !
ऐशा रीती जन सकल ते कोकिला आदरूंत
सर्वां बोधप्रद सुविषया शंसु बाणा धरूंत.

एप्रिल १९१२. [ पहिली कविता ]

## २ चल भाऊ रे खेळायाला !

चल रे भाऊ ! खेळायाला कुठें तरी जावे
संध्या-मारुत वेलीसंगें बघ खेळत आहे !
सरितातीरीं जाऊं भाऊ मुदें खेळुं खेळ
उठ उठ चल उशीर होतो दवडुं नको वेळ

नदीसैकतीं घरें वाळुचीं आपण बांधूं या
आंत पोखरुनि भुयार, किल्ले, पूल हि बनवूं या
नदीजलासह वायुहि खेळे लहरी बहु येती
आनंदाच्या; हळूंच हसतें, खेळें सरिता ती,

संध्याकिरणें मित्राचीं तरुवनपत्रीं बसती,
मारुत मोदें त्यांच्यासंगें मधुगायन करिती !
तरुतलिं खुदकन् हंसतहंसत तीं किरणें बागडती
चल भाऊ ! चल आपण त्यांची क्रीडा पाहूं ती.

सागरगोटे-झिम्मा-फुगडी कांहिं नको मजला;
आट्यापाट्या-खोखो यांचा वीट असो तुजला !
पूर्व पश्चिमा दोघी नारी खेळति चेंडुफळी;
दिला फेंकुनी पूर्वेनें बघ चेंडू या वेळीं !

सहज झेलुनी त्यातें, प्राची खदखद हंसताहे !
त्या हास्याचा प्रवाह सगळ्या जगतावर वाहे !
आपणही चल ओंवाळा त्या आणूं या भरती
तरंगवूं विश्वाला भाऊ ! हास्यलहरिवरती.

पृथ्वी अपुली रवीभोंवतीं गरगर नित्य फिरे—
लपंडाव खेळते मजेनें, बघती तें तारे !
चिंता लेश न सृष्टि सर्वदां खेळांमधिं दंग
सरित्तटाकीं वसुनी आपण होऊंया गुंग.
संसाराचा खेळ आपणां मुळीं नको भाऊ !
भटकत भटकत बघत सृष्टिला, कुठेंतरी जाऊं !
चल भाऊ ! तर मजसंगें रे मजा पाहण्याला !
सर्वांचा प्रिय दिनमणि हा बघ जातो अस्ताला !

मनोरंजन दिवाळी अंक १९१३

---

## ३ 'श्रीधर' यांची कविता

श्रीधरा ! कविवरा ! श्री तव नामीं वसते
लक्ष्मी व सरस्वति तुजला वश कशि होते
तव विभवें किंवा नष्ट विरोधा केलें
श्री—विद्येमध्यें ज्यानें स्वस्थल केलें.
काव्येंदु बघुनि तव मनोनदी मम हंसली
त्या हृदयिं धराया धांवुनि वरती आली.
या कविता जणुं नच काव्यांबरिं या तारा
तूं वससी त्यांचा पति त्या देण्या थारा.
हिम-बिंदुप्रमाणें नश्वर कधिंहि न होती
स्वातिच्या मौक्तिकापरि चिरकाल रहाती.

'कविता' ती धन्या जी तुज माला घाली
तव चिरसंगमनें अधिकच धन्या झाली
तव काव्यसागरीं सृष्टी सगळी पोहे
ते तुषार तेव्हां चहुदिशिं भरुनी राहे !

पुणें. ९–६–१२.

---

## ४ काननीं जाउनी राहूं

काननीं जाउनी राहूं चल गडे, शांति सौख्यांत
हीं गुलाब-कुसुमें अगदीं कुचकामी मजला दिसतीं;
बाभळिचीं सुंदर पुष्पें माझें मन मोहित करितीं;
सरितेच्या तीरावरतीं बांधावा आश्रम रम्य;
चिरकाल सुखानें नांदूं आलोक सेवुनी काम्य !

मृगबाळें रानामधलीं—
प्रेमानें येतिल जवळी—
त्वत्प्रीति बघुनि त्या वेळीं

तूं वाढिव त्या प्रेमानें विसरतील तीं निजमाते,

आपणां नको उद्यान, पाहिजे परी तें रान;
बंगला नको ऐटीचा झोंपडी बरी ती सान;
सहकारतरूच्या खालीं घालुनी करीं कर जाऊं;
कोकिलादि गान श्रवुनी डोलत गे काव्यीं राहूं !

जाउनी वायु वंशांत
बैसेल गान मधु गात,
अलगूज न मजला रुचत !
मोदानें आपण राहूं सोडुनिया या संसारा ! २

निर्झरणीतीरीं बसुनी घालवूं काळ रात्रीचा;
विमलौघ जलाचा वाहे, तैसेंच हृदय हें माझें;
प्रतिबिंब इंदुचें जैसें, त्वत्प्रतिमा मन्मनिं तैशी;
प्रीतिचें गान गावोनी स्वर्गीं ने तिथें तूं मजशीं
पक्षीही झाडावरुनी
उत्साहा देतिल गानीं,
जगतास पूर्ण विसरोनी
फिरतील सदा तुजमागें, प्रेमें तूं धरशिल त्यांना ३

अस्मानी दुलई नभ हें थंडीला नेइल हरुनी;
गवताची हिरवी गादी चित्तास शांति दे रानीं;
ती कंदफळें वृक्षांचीं अशनही आपलें साधें
कल्पना सुखद मनिं येती मन तिकडे ललिते, वेधे
बोलाविति मज तरुराजि,
जाण्या मी तिकडे राजी,
यावी ही दयिता माझी;
आपुलें वृक्षराई ती स्वागत शिर नमवुनि करिल ! ४

आभरणें स्वर्णाचीं तीं— कृत्रिम ! दे टाकुनि सारीं
अक्षय्य रुचिर पुष्पांचीं देतिल तुज शोभा भारी;

## नोरमा

गावलि येइल निकटीं    सेवुनि तव तनुचा गंध;
ुजारविं त्यांच्या मिळुनी    स्वन करिल अनिल मृदु मंद;

स्वर्गीय असें तें रान
विसरविल जगाचें भान
अमृताचें देइल पान,

ाउनियां केवळ दोघें    राहूं त्या रम्य ठिकाणीं    ५

ोडुनी सर्व लोकांना    वृक्षांना करुं या मित्र;
ाश्लेष तयां द्यायातें    सर्वथैव असती पात्र;
ारंब्यावरती बसुनि    आंदोलनिं कंठूं काल !
ृथ्वी ही अपुल्या संगें    आंदोलन घेइल वेगें !

कल्पनापक्षि बैसोनी
मारुंया भराऱ्या गगनीं
दृश्याचीं काव्यें करुनी

चिरसौख्यीं जीवित वितरूं    चल गडे शांति सौख्यांत !    ६

ां    १९१२
सिद्ध मासिक मनोरंजन पुस्तक १९
रविकिरण मंडळ–उषा– १९२४.

---

# ान

सख्या कोकिला ! उंच अंबरीं गात असाच रहा
सृष्टी सगळी वश तुज झाली आहे, बा सखया !
सौख्याचा तूं निधि, तुज चिंता कसली ही नाहीं;
माझ्याकरितां निश्चिंतच तूं गात असा राहीं !
धन्य धन्य मी ! स्वर्गाची मज आली अनुभूति,
तिरस्कृती मज गंधर्वांची वाटे यापुढती.
ब्रम्ह्यानें या सर्व सृष्टिची उत्पत्ती केली
परि मज वाटे परमेशानें तव सृष्टी रचिली.
मला भासतें गंधर्वांना तूंच कला दिधली,
ऐसें तव तें महनीयत्वहि गावें प्रतिवेळीं !
भूमिवर तूं येसी जेव्हां, धन्य आंबराई—
होते, मीच न केवळ, सखया ! गातच तूं राही !
आराधिति कवि मृत्युलोकिंचे कवितादेवीसी
परि देवी ती तुला सेविते, गमतें हें मजसी !
रविला जासी सामोरा तूं प्रतिदिनिं गगनांत,
दिव्याचें तूं स्वागत करण्या सर्वथैव उचित !
तुझ्याबरोबर जाशिल तिकडे घेउनि मज जाई
कीं मी पापी म्हणुनी मजला नेतच तूं नाहीं !

२३-६-१९१२
ासिक मनोरंजन १९१३.

---

# एका पुष्पास

" कां पुष्पा वनिं या उगाच रडसी ? कां अश्रुबिंदूहि हा
जो येतो नयनांतुनी, न परते; आतां उगी तूं रहा
या निर्लोक वनीं त्वदन्य कुसुमा ! नाहीं म्हणोनी रडें ?
सर्वस्वीं तुज अद्वितीय, कुसुमें गेली त्यजोनी पुढें !

' नारींची करण्या अलंकृत शिरें पुष्पें तुला त्यागिती
आनंदें फुलती विलासिं डुलती दुःखा तुझ्या ना मिती
शोकासी त्यजुनी तुला, युवतीच्या संगे सुखा सेविती,
अश्रूंचें तव मूळ ना ? मज गमे संवेदना त्वप्राति !

' त्वत्प्राणेश्वर की त्यजी ? " न विरहा सोसावया शक्ति ये
चित्तांतीं झुरुनी नितांत कुसुमा ऐसी दशा प्राप्त ये
धैर्या जोडि परि, वियोग तुमचा होईल वेगें दुरी
आनंदार्णविं मग्न होशिल तदा स्त्री न त्वदन्या वरी !

" कोणी योषितवृंद केश कबरी स्वीकारिना त्वद्धन
कष्टी काय म्हणून शोक त्यज हा लोभे विलासीं जन
नाहीं कोणि जरी तुला सुखविते, मी त्वद्गुणा चाखितें
मद्दृष्टींत तुझी सुकोमल तनू कैशी अधर्मा वितें ? "

देठीं, असें वदुनि, मी, खुडिलें तयाला
पानें गळोनि पडतां अनुताप झाला
आधींच तें दहिंवरें भिजलेंहि होतें
आतां दलस्खलनयोगिं जल स्रवीतें.

अशि दशा बघुनी मनही द्रवे
करतलावरि ठेवि जलासवें
कृति असह्य करी परि कासया ?
व्यथित लुब्धहृदया वदलें तयाः—

" दुःखीं तुझ्या अविकाचि भर घातली मी
तोडून तूज करुनी अवमानना ! मी.
तेणेंच काय वद अश्रु प्रवाह मोठा !
माझ्याच होत अविमर्शवलें हि तोटा ! "

जन ! मनीं करुनी विचारणा
कृति करा अशि मी करि प्रार्थना
मृदुवचें अपहार करी व्यथा
व्यसनिं जे बुडती नच हें वृथा.

: आनंद जुलै १९१२

---

## ारोर्मि

या विश्वीं जो सतत फिरतो होउनी काव्यवेडा
तो सर्वांना वश करितसे आपुल्या सुप्रभावें
ऐसें होतां भगिनीसच तो कां न आकर्षि सांग
त्या वेडाच्या लहरिसहि ती चुंबि वायूसमान !
प्रेमें वाणी कटु जरि असे, गोड होते जगीं या
त्वद्वाणी ती मग अतिमधुरा कैशि हो नावडेल ?

साऱ्या लोकां, खल हि असु दे, होइ काव्यामृतानें
अत्यानंद, स्वभगिनिस तो नाहि कैसा गमेल !
त्वद्वाणी परिसूनि कंठ अवघा येई भरोनी पहा
नेत्रांतूनहि बाष्पबिंदू पडती, आनंद दाटे मनीं
विश्वाला विसरून उन्मन मन भ्रांतीस पावे तदा
कोठें जाइ कळे न ! मी परि चिरानंदींच मग्ना असे !
आहे तूंच खचीत योग्य कवितादेवीस पूजावया
तूंही संतत कल्पनादिक अलंकारें तिला पूजिसी
पूजापात्र व स्तोत्र हीं विपुलही आहे तुझ्या मंदिरीं
'ती' ठेवी वरदा करा शिरिं तुझ्या 'सावी अभीष्टा अतां !'
त्वत्-हन्मंदिर हें सुशोभित कसें केले अहा देविनें
अत्यंत प्रणयें सुगंधकुसुमें अर्पीसि तीला सदा
देवीला वहिलेच पुष्प सुकुनी नाहीं कधीं जात तें
त्याचा मात्र सुगंध दर्वळुनि तो भेदी नभःप्रांतही !
अंबूचे कण येउनी पडति ते या चातकीच्या मुखीं
यामध्यें गुण अल्पही न दिसतो ठायीं तिच्या स्पष्ट हें
मेघाचाच समस्त गौरव असें या गोष्टिमध्यें बरें
तीलाही परि व्यर्थ मान चढतो, बोले 'किती धन्य मी !'
जेव्हां मेघतुषार भूमिवरती चोहोकडे फांकती
सारा लोक सुखासनावर बसें, प्रेमार्द्र होई अती
वाटे प्रेम चहूंकडे पसरतें त्यानें खुले आर्द्रता
मी ही सेवुनि कां तुषारकण ते व्हावें न प्रेमीं रत !

जेव्हां येति सुपीक भूमि कवितोद्यानीं तुषार स्वतः
जातींना सुकुनी परी उगवती काव्यें फुलें हीं किती
यांचा गंध सुटोनिया चहुंदिशीं आनंद देतो मना
पुष्पांच्या उगमस्थलां हुडकितां कोठें न लाधे मला !
येती काव्यतरूवरी तव फुलें त्यांची मुळीं न मिती
आहे सारिच गोड मंजु मधुर स्वादू व सौंगाधिं तीं
ठेवावें तरि एक फूल हृदयीं संभाळुनी सर्वदा
कीं वाटे तरुलाच हृद्गत करूं साऱ्या फुलां लाधण्या !
मी आहे कवितावनांत नवखी वाटा न ठाव्या मला
तूं द्यावे मजला अभिज्ञ करुनी, स्वच्छंद हिंडेन मी
द्वारें त्यांत शिरावया कुठलिं हें कांहीं कळेना मला
झाडें हीं कसली तयांत वसती हेंही न ठावे मला !
पाठोपाठ तुझ्या प्रवेश करुनी येईन उद्यानिं त्या
तूं गेला परि फारफार पुढती, येऊं कशी मी अतां
उत्कंठा बहु लागली मज आतां जाण्या सुखस्थानीं त्या
नैराश्यासच पावणें लिखित हें कां मह्ललाटीं असे !
परी कसेंही करुनी न्यावें तेथें वनांत संचरण्या
मज बहु आवड आहे पुष्पांचा ही सुगंध तो घेण्या ।

६–१९१२

## ८ नाहीं योग्य जगीं

‘ नाहीं योग्य अम्ही ! जगीं उगिच ना हें जन्मणें आमचें ’
ऐसा व्यर्थ विचार नित्य वसतो मोठ्या जनांच्या मनीं
त्यांची ती परि योग्यता कधिं कमी होते न लोकीं मुळीं
त्यायोगें बहुमानही उलट ते संपादिती सन्मती !
याचें अन्य नको उदाहरण तूं आहेस डोळ्यापुढें
आलीसे मज कल्पना खरिखरी मोठ्या जनांची आतां
‘ एकेकास अशी अनल्प सुमती देतो विधी हें पहा
एका वाहति मोद अश्रु नयनीं दुःखाश्रु वाहे दुजीं ! ’

लहान शिशुची सदोदित असे वचें वोबडीं
तयास गणती सुधेपरि तदीय बंधूपिता
तसें करुनि बोल ते मम तुवां जहालें ऋणी
कशी करुंहि फेड मी नच कळे जडाबुद्धिला !

जें नेहमी वसतसे अपुल्या सकाशीं
त्याची गमे न मुळिं किंमत स्वकृतीची
तैसेंच तुच्छ गणुनी निज काव्येंपुष्पें
निर्गंध हुंगिसि फुलें, मम मानुनी तीं !
पुष्पें असंख्य फुलती बहु दूररानीं
येती न लोक-नजरेस स्वमंदभाग्यें
आहे परी रसिक तूं गति त्यास द्याया
काव्यें रचूनिहि तया वरदान देशी.

प्रेमांशुकग्रंथि परस्परांना
बांधोनि ठेवि, मनिं मोद दाटे

## नाहीं योग्य जगीं

एकेच वेळीं उभया जमेल
' उद्यानिं संचारण ' हें तयानें.
विश्वप्रदीपिं भरुनी प्रतिभाच तेल
घालाविही उपरि त्या निजकाव्य-वात
ऐसें तुवां करुनि प्रेम-प्रकाश द्यावा
साऱ्या जगा विशदही करुनि असेंच
प्रेमाचा करुनीहि नाग निजला हा त्यावरी ' श्रीधर '
कविता ही कमला सदोदित चुरी पादारविंदें तव
प्रीतीच्या लहरी सदा तव मनीं हेलविती प्रेमला
वारी विश्वि उडे, तदा उगवतीं काव्यप्रसूनें किती !
त्वत्काव्य-पुष्पमकरंद श्रवूनि येत
कित्येक भृंग असतील तयांत मीही
देतात त्रास जरि ते तुजला पुन्हांही
द्याया मधू मुळिं न त्रासासि केधवां ही !
एका पडोनि व्यसनीं दुसरें न कांहीं
चित्ता रुचे, तशिच मन्मनिची स्थिती ही
तो एकदां मधुर चाखुनिया मरंद
अन्या कशा विषयिं विक्लव होई चित्त !
पुष्पांचिया उपवनीं जधिं मी प्रभातीं
जातें तदा परिमळें भरतो प्रदेश
त्वकाव्य-पुष्प पुढतीं परि तो सुगंध—
कांहीं नसे ! मन उदासच मात्र होई !

८–१९१२

## ९ सूर्यापुढें

सूर्यापुढें मिणमिणीत दिवा प्रकाशा, देण्यास अक्षम वने धरुनी मनांत
निर्गंध मत्कुसुम-माळ तुझ्या समोर ठेवावया गमतसे मनि फार लाज !
नाहीं जरी परिमलाकुल पुष्पमाला ती घालतें तरि मुदें तव कंठिं हस्तें
सिंचोनि त्यावरति प्रीतिजला करीसी गंधान्विता बहुत मी कृतकृत्य राजा !

काटेरी झुडुपें स्वतांस म्हणुनी शालीनता दाविसी
झांकीसी गुण सर्व तूं परि जनां ते ज्ञात हो लौकरी.
झांकोनी जरि ही हिरा बसतसे खाणीमध्यें एकला
आहे रत्न जरी कठोर हृदयीं तत्कीर्ति मोठी जगीं
तेजानें अपुल्या चकाकवितसे सर्वा दुज्या वस्तुला
तैसें तूं विनयें जरी म्हणसि कीं 'मी एक आहे फुका'
सानिध्यें रसिकासही करविसी सारज्ञ भूमीवरी !

पुणें ७ आगस्ट १९१२

---

## १० कलिकागान

डोलवि वायू प्रेमभरानें लतेवरी त्या कलिकेला
अनेक परिच्या सुखदु:खाच्या गोष्टी सांगत भगिनीला.
दोघांमध्यें किती प्रेम तें दिसे न कोणा इतराला
विश्व भरोनी परि तें उरलें, प्रकाश आला जगताला
रमती हंसती खेळ खेळती बहुपरि दोघे आनंदें
सृष्टीमाता उत्तेजन दे बालक-युग्मा अति मोदें

गोष्टी सांगत असतां वायू भगिनिस वदला स्थिरचित्तें
' वाले गाणीं गाउनि आतां रिझव माझिया चित्तातें '
तेव्हां कलिका बावरली, तिज काय करावें सुचेच ना
बंधूचीही अमान्य आज्ञा त्यावेळीं तिज करवेना !
मुग्धाव्याजा कलिकेला त्या अवगत नव्हती गीतकला
बंधू प्रिय तरि इच्छा त्याची कठिण पुरविणें गमें तिला !
हृदयामध्यें गाणीं वसती तिच्या सदोदित अमुद्रित
गमती चेतोहर तीं त्यांना, ओळखिती जे तत्त्वांत
गरिब बिचारी कलिका लाजे, मिटुनी वदना गप्प बसे
कंपहि सुटला मग शरिराला विचार पडला ' करूं कसें ? '
लाली आली गालावरती, मल्लूल झाली कलिका ती
मुखांतून मुळिं शब्द न उमटे, कंठ दाटला, सुकली ती !
वायुनें परि स्थिति ओळखली तिची तेधवां हृदयांत
राग मुळीं नच कौतुक वाटे उलटच त्याचे चित्तांत
' ज्यानें त्यानें अपुलीं कामें करित रहावी विश्वांत
नेमुनि दिधली प्रभुनें इतरां तीं अपणां कशि येतात ! '
अशा विचारें समजुत करुनी घेइ अंतरि तो वात
गुंगत अपुल्या श्रवणमनोहर सुरीं रिवाला वंशांत.
कलिका अपुलें साधें वेडें गाणें दाविल म्हणुनि कसें
समीरणानें मंजुळ मंजुळ स्वनांत गावें हेंच असे !
अज्ञानी भगिनीवरी उगिच कां दीनेवरी राग हा
ऐसें मी अथवा म्हणूं तरि कसें ? कोपाई झालें महा

आहे भाग्यवती कितीतरि जगीं, बंधुत्व लाभे तुझें
झाला तो अपराध मत्करिं तुझी आतां क्षमा पाहिजे !
कोपेना भगिनीवरी परि मुळीं बंधू खरा प्रेमळ
अज्ञाना हरुनी गुणाणु तरि तो चित्तीं तिच्या घालतो
या कोपाभ्रपटास सारुनि विधू दावो द्युती उज्ज्वल
जोत्स्नानंद-समाकुला अवनिला प्रेमप्रभावें करो !

पुणें २८ आगस्ट १९१२.

---

## ११ मार्गप्रतीक्षा

प्रभातकालीं बिंब रवीचें उदयगिरीवर येतें
गिरिला अनुपम सुख त्या वेळीं अनुभवण्या सांपडतें.
स्वानंदीं जरि मग्न तरी तो, भगिनीवरती प्रीती
असे म्हणोनी झटे सारखा तुष्टा व्हावी कीं ती.
'काव्यतुषारासम' ते रविचे किरण प्रतीचीला तो
सुखवाया तिज भेट म्हणोनी पाठवुनी ही देतो
सुखद जाहली बाला सेवुनि बंधूचें तें प्रेम
अनुरागानें ईषद्रक्ता किरणें जेंवि ललाम.
धन्य धन्य ती मानी अपणा जगतामध्यें साऱ्या
गोपीतनया जेवीं माधव मुरली श्रवुनी साऱ्या.
प्रफुल्ल झाली, हंसूं लागली प्रेमानंदिं प्रतीची;
रविकिरणें सुख पावुनि, गिरितें दृष्टि फेंकि नयनांची.

सुख अनुपम हें पूर्णपणें परि अनुभवण्याचें नाहीं—
तिच्या ललाटीं ! कोण पुशिल त्या विधि-लिखिताला बाई !
नेलें हरुनी किरण गिरीनें, सवें घेउनी गेला
शक्तच नाहीं झाली त्यांना उपभोगाया बाला
दुःख करी ती अश्रू ढाळी नयनहि होति विलोल
आनंदाची लाली जाउनि फिकटच होती गाल
हाय हाय ! परि कुठुनि तिला तीं किरणें गवसायाला
गिरिनें धाडुनि जी दिधली ही उंचच आकाशाला !
दिशा प्रतीची वाट पहाते मानसिं होइ अधीर
मिळतिल केव्हां रविकिरणें मग ऐसा करित विचार !

पुणें ( ३१–८–१९१२ )

---

## १२ मुरली

असाच मुरली घेउनि माधव वाजवि चिरकाल
सप्तसुरांनीं पवित्र करि हें अंबरतल सकल
नशिबीं माझ्या नाहीं कां परि गान श्रवण्याचें
गृहा परतणें भाग होइ मज विरुद्ध चित्ताचे !
गानाशेनें हळुं हळुं बघ मी मुदामच चाले
बालमित्र जरि मज टाकुनि ते सर्व पुढें गेले
स्तब्ध जाहले जिकडे तिकडे ऐकण्यास गान
कौतुक वाटे कसा वाजवी माधव हा सान !

## श्री-मनोरमा

क्रीडाप्रांगणिं मित्र कोणि तर क्रीडनिं रमलेले
तालसुरावर कंदुक पडती, वाणी नच बोले.

मजूर लोकहि ताल धरुनि जणुं दगडावर ठोके
ठक् ठक् घालति, हात तेधवां त्यांचा मुळिं न चुके
सरितेमधलें पाणी चाले मृदुस्वरां करित
तव मुरलीच्या मधुगानाला नदी देइ साथ

वृक्ष वल्लरी डोलति ऐकुनि मुरली मोदभरें
स्वतनूंचेंही भान न राहुनि कवळिति प्रेमभरें
पारिजातही मनीं म्हणतसे ‘ किन्नर हा कोणी
स्वर्गामधला इथें आणिला ? ’ पुरा जाइ फसुनी

आनंदुनि मग म्हणे ‘ बरें हें झालें ! हा मजला
पूर्व-जन्मिचा मित्र लाभतो ! ’ प्रेमा त्या फुटला !
पैज लाविली तुवां आणखी प्राजक्तें गमतें
कीं गीतानें गंधानें वा अवनी ही भरतें !

प्राजक्तच मग हरला तेव्हां मान करित खाली
मुरली परि तव धन्या झाली, तिनें धरा भरली !
जों जों जातें पुढेंहि तों तों मुरलि बंद होई
असें वाटतें श्रवणाला मम, विकल चित्त होई

तशांत अनिलें फिरतां फिरतां मुरली मज जवळीं
धरिली तेव्हां तुजसम स्वनिं ती कर्णीं गुणगुणली !
‘ पदीं चालतें पुढें परी हें मन मागें येतें
प्रतिवातध्वज अंशुक जेवीं मागें तें जातें ’

नयनांनीं तुज तदा न पाही परी मूर्ति हृदयीं
तुझी माधवा ! उमटे माझ्या चिराय ती राही
झालें वेडी पुरीच गानें ! वदतें कांहिं तरी
मार्गामध्यें उभी राहुनी चरणें ताल धरी !

लतिका माझ्या सख्या ऐकिती प्रतिदिनिं तव मुरली
आला नच परि कंटाळा त्या ! प्रफुल्लता आली !
जाति लाजुनी पळुनि कोकिला परिसुनि तव गान
तद्गर्वाचें खंडण करिशी मुरली वाजवुन

प्रिय गायन परि श्रवती त्या तव हळूंच लपुनीया
तरुविटपांच्या पर्णामागुनि स्तंभित बसुनीया.
रुंजी घाली तालावर कुणि अलि ऐकुनि गान
नादानें कुणि दंग होउनी करि सुमरसपान

स्त्री कुणि ऐकुनि तव मुरली ती गात बसे गाणीं
सूर जमेना कीं मुरलीच्या स्पर्धेला भिउनी.
मंद समीरण सायंकालिक लतिकांशीं रमतो
तव तानांच्या अनुकरणानें त्यांना रिझवीतो.

माधव कां हा वायूरुपें लतानिकटीं आला.
असें वाटुनी तिथेंच बसतें गानश्रवणाला.
कोणी वल्ली ऐकुनि मुरली उत्कंठित होती
आनंदाश्रू ओघळुनी परि फुलें अधिक येती.

गाणें मुरलीवर तूं कसलें गात बससि नित्य
हें समजाया जीव भुकेला फार ! सांग सत्य !

मृत्युलोकची मी ! तव गाणें काय कळे मजला !
अर्थाचा तर पार न लागे या मज मूढेला.
ओंळामध्यें घेउनि कुसुमें हातींही कांहीं
ऐकत बसणें मुरली याविण नकळे मज कांहीं.

पुणें २–९–१२

---

## १३ चल तर नभिं तिकडे

अवनी वरती कशास वसती ? नभीं उंच फिरुं या !
ये ये सत्वर ! करिं कर घालुनि, जनास हिणवूं या !
मर्त्य-लोकिचें कशास उपवन ! त्या दिव्योद्यानीं
कुसुमास्वादा घेत फिरावें आनंदें गगनीं
शुद्धप्रीती बघुनी तारे स्वागत करतील
"पुण्यशील ही जोडी कितितरि' प्रेमें म्हणतील !
अगाध निर्मल नील नभःसरिं तारककमलें तीं
प्रफुल्ल झालीं, घेऊं तोडुनि स्वेच्छेनें हातीं
वदन चंद्रमा पाहुनि तव हा कमळें फुलतील
सगळीं मग तीं धन्यवादपर गाणीं गातील.
प्रेमरज्जुनें मीही गुंफुनि तीं कमळें तुजला—
कंठिं घालण्या देइन सदया ! जणूं कीं देवाला !.
भ्रमरी मी मग वसेन संतत कंठीं कमलांत
गुंगु गुंजारवा तदा मग करीन नादांत.

नश्वर पृथ्वीवरच्या कमळें काय स्फूर्ति येते
गायन करण्या ! सांग कशानें अवनी ही भरते ?
स्वर परि मम तो मधुर नसे मुळिं भुलविण्यास रसिक
फारच झालें तर तुज देइल कदाचीत सौख्य
गा गा मग तूं अपुलें गाणें लाजव गंधर्वा !
अमृतवृष्टि ते सुरवर करतिल वितर मोद सर्वा.
तव संसर्गे होईन तेव्हां धन्या मी जगतीं
' सुजन करितसे सुजन दुर्जना ' पटेल ही उक्ती.
वियन्मंडलीं झोंपाळ्यांवर झोंके बैसून
घेऊं तेव्हां गाणीं गा तूं तीं मी ऐकेन
रसिका नाहीं तरिही मोठी आवड गाण्याची
आहे मजसी, कर म्हणुनी तूं पूर्ती इच्छेची !
आकाशांतिल गंगेमधल्या बसुनी नौकेंत
विहार करुंया स्वच्छंदानें सुरास लाजवित
सुभग वायुनें नौका चाले मंद मंद व्योमीं
तिच्याच योगें देश नभाचा पाहूं या नामीं.
चंद्ररूप त्या कारंजांतुनि उडे प्रीतिवारी
सुधांशुकिरणें तींच नभाला भरतीलहि सारीं
जगताची या एक कलाही अवगत मज नाहीं
मुळीं ही तेव्हां व्यक्त हर्ष मम करितां नच येई !
हृदय भरोनी आलें प्रमुदें ! स्तंभित परि वाणी !
दिव्यानंदा व्यक्त कराया अक्षम मम वाणी !

मी जडमति ! मज कसचे माहित गीतांचे सूर
मी गुंगावें अपुल्याशीं मम गाणें बेसूर !
कर्णमधुर तव गान गाउनी उंच अंबरांत
पिपासितां मम श्रवणां सुख दे, लतांस डोलवित.
लतिका कलिका स्तब्ध होउनी मुदें डोलतील
कुसुमवृष्टि तुजवरती करुनी धन्या होतील
कमलाकर, तूं तुज आवडही कमलांची नभिंच्या
काव्यमयूखें प्रकाशवी जग, स्वरें गायनाच्या
कमलामध्यें येउनि लक्ष्मी श्रवील तव गान
प्रीता होइल तुजवरती ती, कसली मग वाण ?
मग लक्ष्मीला सरस्वतीसहि घेउनि दोहिंकडे
अधिकाधिक गा उंच सुरानें ! चल तर नभिं तिकडे

पुणें. ( ६-९-१९१२ )

---

## १४ वसंत-मधुकरी

गेला वसंत सोडोनी दुःखित झाली ही अवनी
अलंकार मग टाकुनि ते रुक्ष वसन बघ पांघरिते

*       *       *

तदा मधुकरी वाट बघे येति कदा ते दिन वेगें
गुंगुं कुठुनि सुचे तिला विरस गमे नव सुममाला
अनिल देतसे ताप तिला वसंतगमन-व्यथितेला
गुंगुं मधुनिच करीतसे परि रव कंपित मंजु नसे

मधुमासाची कां शोभा　　जगतामध्यें वितरि प्रभा
याचें उत्तर सोपेंही—　　प्रेमें भ्रमरिस भरे मही
कुसुमावर ती बसे जरी　　वसंतपुष्पाची न सरी
रंगि न खुलते ग्रीष्मांत　　जशि असते मधुमासांत.
नीरस गमतो मधु तिजला　　मास तयाचा जर नसला
स्वन कोणाला वदेल ती　　करी न वसंत जर वसती
प्रकाश भानू बहु देतो　　प्रखर ताप परि तिज होतो
मधुमासाची वाट बघे　　आम्र तरुसच ती बिलगे.

पुणे. ७-९-१२. प्रसिद्ध लोकमित्र.

---

## १५ वायू व फुलवेल

आनंदी फुलवेल ती उपवनीं होती मुदें डोलत
वायू ही करभार देत कुतुकें होता तिला सांगत
'ताई हा बघ कीं द्विरेफ तव या अंगावरी कोमल
बैसोनी करितो खुशाल अपुला गुंजारवा गुंगुनी !
त्याची भक्ति तुझ्यावरी बघुनि ही आनंदलों मी मनीं
जा जा ! तूं तरुला कथीं रसिक कीं आहेत थोडे तरी;
काव्याची लतिका गडे असासि तूं हा भृंग आहे कवी
गावोनी मृदु मंजु तो तव यशोगानें रमे गाउनी. !
हांसोनी अतिमंद कुंदरदने इंदूस आनंद दे
तारांना स्व-निदर्शनें वितर तूं त्वद्दिव्य-हास्य-प्रभा

व्योमाध्व-श्रम घालवी निज हरित्पत्रांबुनें भानुचा
पांथस्थां सकळां स्वशीतलघनच्छायातलीं बैसवी !
तो इंदू तुजला स्वकीय किरणें सानंद अर्पी पहा
त्यांचा गुंफुनि शुभ्र हार गिरिच्या सानूवरी शोभवी

* * *

ऐसें बोलुनि वायु तन्निकटिं तो वाहावया लागला
शब्दांचें मग वाहणेंहि अनिलें तें बंद केलें त्वरें.
झाला कां परिणाम तीव्र जरा हें तो बघे मागुतीं
होती वेढुन ती तरूसच लता ! गेलें वृथा जल्पन !

पुणें. १५–१–१९१३ प्र. मासिक मनोरंजन.

---

## अपशकुन

पुष्पांतील मधुरस सरला, पाकळ्या गळोनी गेल्या
कोरडी जाहली आळीं, दलराजी शुष्क सळसळल्या
वारुळें उगवलीं तेथें, सर्पांच्या आली आल्या

हे अशुभ शकुन किति होती
यांची मुळीं नाहीं गणती
दुःखांना नाहीं कमती

जी लिहिली अमुच्या भालीं होउनी क्रुद्ध ब्रम्हानें
सबजाचा सुटला गंध गुलमोहर वठुनी गेला
घुबडांनीं केलीं घरटीं, कोकिल खग पळुनी गेला
लतिकेला सोडून तरु तो धाडदिशीं भूवर पडला.

भ्रू दुभंग झाली बाई
देवळें बुडालीं कांहीं
राहिलें कुणी ना तोयीं
कारण कीं जलधिच सगळे आटून कोरडे झाले !
वीणेच्या तारा तुटल्या, सुखस्वप्नें सारीं गेलीं
वाजवी मधुर जो गीती वंशाची सजवुनि मुरली
तो मंदानिल सुखदायी लपवुनी वदन या वेळीं
शोकाचीं गीतें गातो
मृदु सुगंध त्याचा सरतो
चंड तीव्र भानुहि होतो
उडुरत्नाकरहि निमाला प्राचीचें वैभव सरलें

पुणें ३-४-१९१३

---

## २६ कावळीची याचना

सरोवरांतिल पाणी झुळझुळ शांत रवें वाही
तरंग उठती हळू हळू जणुं कल्पनाच काव्यीं
शुद्धोदक तें पाहुनि कोणा आंत पोहण्याची
हौस वाटणें अशक्य कसलें ? काकहि त्या भुलती !
सुनिर्मलीं त्या जलीं एक कुणि राजहंस राही
मौक्तिक त्याचें खाद्य पेय वा सर्वच तें कांहीं
आननांत तो मौक्तिक माला धारणही करतो
देहावरती मौक्तिक घेई मौक्तिकींच रमतो !

त्या तन्मुक्ता कविच्या कवितासम दिसती अगदीं
कवींच हा अवतरला तेथें गुंग स्वीय नादीं—
—तेथिल देखाव्याला भुलुनी कावळि एक कुणी
‘ काव काव ’ या रवीं आरडत आली त्या स्थानीं
प्रियदर्शन त्या हंसा पाहुनि वाटे तत्चित्तीं
त्याच्यासम आपण करुंया रुचिर अंगकांती
म्हणुनी लागे दगडावरती पंख आपटाया
मुक्तामय कसचीं हो ! लागे शिलापिष्ट व्हाया !
दमली शेवटिं त्राण न उरला, आ वासुनि वदन
तिथेंच निजली कष्टें, कैसातरी जीव धरुन
उदारवृत्ती त्या हंसानें देखुनि लाचार
हीनज्ञाति ती विसरुनि लागे करण्या उपचार !
काव्य-सुधामय सहज कराला यशाच ठेविलेलें
बरी वायसी होतां तिजला स्वप्न सत्य झालें
बोले तिजला ‘ बाले ! प्रियतम तूं मज आहेस
मोत्यें घे हीं थोडीं तुजला हर्षभरें नाच ’
तें हंसाचें प्रेमळ भाषण ऐकुनि तिज वाचा
फुटुनि सपाटा लागे भरडा सूर ओढण्याचा
लज्जास्पद जरि सूर तियेचा तरिहि तो हंस
हंसला नच मुळि देई कांहीं विषय अतिसुरस
स्वस्थ मनानें हंस आपल्या घरीं जलीं गेला
घरा कावळी गेली परि क्षण खळ नच नरड्याला

कांहीं दिनांनीं स्मरण पुनरपी होउनि बंधूचें
हंस-मौक्तिकासम दाणे ती टिपे जोंधळ्याचे
माला त्यांचिच गुंफुनि नेई किडक्या दाण्यांची
भेट म्हणोनि त्यास द्यावया खुण स्वप्रेमाची
अपुली माला सादर देई, मागे तन्माला
तिचा जीव ज्यामधे रंगला जी देते द्यूतिला....!....
झाली सायंकाळ यापुढें कवि गेला स्वगृहीं
काय बोलला राजहंस तें कळलें नच कांहीं.

२१-४-१३

---

## १७ पुरे पुरे ग हंसणं !

[ एके दिवशीं हंसतां हंसतां मी एकदम थांबलें. त्यावेळीं मनांत विचारांची जी खळबळ उडाली ती खालील शब्दांत चित्रित करण्याचा प्रयत्न केला आहे. ]

**पद** ( चालः—आनंदी आनंद गडे० )

पुरे पुरे ग ! हें हंसणें — किती हंसावें मनुजानें
सौख्यामागें ती छाया — दुःखाची शिणवी काया !
स्थिती दोन प्रतिवस्तूला — असती, विदित न कां तुजला ?
जलधर गर्जे हर्षानें — सौदामिनिच्या संगमनें
करांत घालुनि कर मोदें — नभभर हिंडे स्वच्छंदें
प्रियावियोगें परि तोच — ढाळी पर्जन्याश्रूंस ?
म्हणुनि पुरे ग हें हंसणें — हवें तसें कां तुज रडणें ?
वसंत येतां लता हंसे — तनुकांति रुचिरा विलसे

ग्रीष्मागमनीं तीच परी ढाळूं लागे फुलें धरीं !
येतां सविता उदया तो विचार मनिं कां उद्भवतो
येणारें मग तम खास गेल्यावर कांहीं तास !
वार्धक्य कुणा चुकलें कां गर्व नसो युवती-युवका !
पौर्णिमेस विधु गगनांत गातो नाचत मोदांत !
अमावास्यि परि कुठें लपे ? दुर्दैव न कोणा त्यजतें !
वाल अळा ग ! हसण्याला धरि मनिं थोड्या सीमेला !
मर्यादेच्या पलीकडे चाललीस तूं कोणिकडे ?

पुणें २७–५–१९१३

प्रसिद्ध : अभिनव काव्यमाला भाग ३. १९१५.

---

## २८ निज नीज माधवा !

निज नीज माधवा ! रजनी बहु झाली ती
जन निशीथ समयीं निद्रासुख अनुभविती
निर्जीव सचेतन सर्व वस्तु भूवरल्या
मृदु अंःतकरणें स्वस्थलिं निद्रित झाल्या
मृदुमनें मृदुल शय्येच्या वरि अतां
हो निद्रित मी तुज ऐसें विनवितां
उठ नलिनीसंगें भानू उठवितां
या निशीथसमयीं सर्वज्ञानें देवें
मनुजास झोंप ही लावुनि दिधली आहे

## निज नीज माधवा

अरविंदवृंद ते तडागशय्येवरती
या रम्य निशीथीं नयनयुग्म कां मिटती
तें नील सलिल बघ क्षणैक शीतल वातें
आकंपित झालें मनोज्ञता किति दिसते
या पुलिनीं कविकविता हे दंपती
स्वच्छंद विहारायासी पातती
घालते स्फूर्तिसुममाला पतिस ती
कवि गुंगुनि गेला प्रणयकथेमधिं तेव्हां
हो लीन उभयिं ही सृष्टि स्वर्ग हि किंवा !

ही पहा चकोरी आनंदित बहु आहे
प्रेमोत्कटनयनें इंदुस पहात राहे
ह्या कैरविणी बघ कशा उमलल्या बघुनी
चंद्रास संप्रती विलसे स्मित तद्वदनीं
हें मिथुन राजहंसाचें चालतें
डौलांत मधुर संवादा बोलतें
जन झोंप घेत आहे हें विसरतें
तर आतां बाळा ! झाली निद्रावेळा
अवनी ही सारी सेवी रौप्यरसाला.

२६-६-१९१२
प्रसिद्ध, मधुकर नोव्हेंबर १९१३

## १९ चांदणी

क्षितिजावरती चटक चांदणी
अव्यक्त स्वन फेकित भुवनीं
कवयित्रींची चमके राणी
कुणास ठाउक कशा रीतिनें तिलाच मोहुनि मी गेलों ॥ १ ॥

नव्हती सुंदर इंदुसारखी
रूपाचा मी नव्हेच शोकी !
ठरवो वेडा मजला लोकीं !
दिव्यत्वाची प्रतिमा मजला मोहवि, कळलें मला पुरें ॥ २ ॥

जड जगताच्या मार्गावरूनी
धांवत जातों आशा धरुनी
फुलें तुडविलीं जाती चरणीं
समोर दृष्टी ! खाली कसची ? विश्वगोल होईल नवा ! ॥ ३ ॥

गुलाबावरी असोत काटे !
असोत पर्वत कराल मोठे
येउत मार्गीं सागर मोठे
नीरस जागींची कशास परवा ? नको विचारचि मुळिं यांचा ! ॥४॥

एक चांदणी पुरेच मजला
तत्तेजोरस नयनां दिसला
पुण्याखण्ड प्राणा आला
द्रुतगति जाउनि, वश करुनी मी करीन प्राशन मधुररस ! ॥५॥

कुणा न दिसतों मी, तैशी ती
एकलकोंडा जन मज म्हणती !
वेडे सारे तत्त्व न जाणाति
विश्ववलय हें प्रोज्ज्वल झालें तारातेजोरसेंच या ! ॥ ६ ॥

आनंदाच्या ऊर्मि खळाळुनी
हृदय विदारुनि, क्षितिजा भिडुनी
जाती स्पर्शाति मृदुल चांदणी
पुलकित-तनु ती नलिनि-दाम-दक्पातें प्रेमें मज पाही ! ॥७॥

नेत्रमीलनें उत्साहांत
त्याच दृष्टिनें गाणीं गुंगत
होतों; निमिषें पूर्व स्थितिंत
आलों तेंव्हां हृदयांतच मम तारा दिसली बसलेली ! ॥ ८ ॥

बाजुलाच त्या रस्त्याच्या मी
जरा वेळ निजलों आरामीं
सोडुनि दिधलें या सृष्टीनें
मनांत रचिलें विश्व नवें, तें स्वप्न म्हणा तुम्ही हवें तर ॥ ९ ॥

—' सिंहासनिं त्या सुरेंद्र भवनीं
चारुहासिनी मजसि चांदणी
नेउनि बसवी दुजे न कोणी
सकल सुरांना लोटुनि दिधलें होतें खालीं पाताळीं ॥ १० ॥

' धरला कर कुणि तेंव्हां माझा—'
त्या स्पर्शानें झालों जागा !

......................

समजुनि आलें, ताराकर नच, परी भानुकर मज हलवी !॥१

उठुनि राहिलों उभा तसाची
नयन मिळाले त्या क्षितिजाशीं
उग्र सूर्यची पडे दृष्टिसी
निराश झालों जडपद टाकित वाट चालतों कसा तरी ! ॥१

भग्नाश तरी अंधुक आशा
मनीं बाळगुनि पंथ जगाचा
रखडत आहें पुष्पलतांचा
हृदयीं बघुनी, काव्यें वाहुनि भग्न मना रिझवितों असा ! ॥१

पुणें, २२ आगस्ट १९१३
प्रसिद्ध, अभिनव काव्यमाला, भाग तिसरा १९१५.

---

## २० स्वागतम्

( डॉ. पां. दा. गुणे विलायतेहून परत आल्यावर त्यांच्या स्वागतास ' विद्यार्थिनी ' या नात्यानें केलेलें स्वागतपद. )

ही कितीतरी सुखी भरतभू झाली । जणुं पुत्रयशें मानिं घाली
प्राचीस सूर्य हा तनय । निजप्रभा पसरि मृदुकाय
ही आर्यभूमि त्या काय— । उधळिते फुलें या कालीं ?
प्राचीन कालची ख्याती । मूल्यवंत रत्नांची ती
तेजोयुत आर्यावर्तीं । अवितथ या समयीं ठरली.
संस्कृतज्ञानकिरणांनीं भूषिता करावी जननी

निज कर्तव्यचि हें गणुनी— । रात्रि येई, पूर्वा फुलली ।
दुष्प्राप्य मान्यता-धनु हें । कर्णान्त ओढि लवलाहें
निजगुणें वांकवी पाहें । ही वीरकृती मनिं ठसली.
सद्गुणप्रकर सुगुणांनीं । शोभवी आज जो अवनी
आयुरारोग्य वितरोनी । त्या ठेवो सुखि वनमाली !

## २१ इंदुकलेचा लोप

होती खेळत रम्य नील गगनीं इंदूकला सुंदर
वायूच्या लहरीस ताल धरुनी अत्यंत चेतोहर
बाला एक करांत दीप धरुनी वीथ्येंतुनी चालली
त्या निर्लोक वसाहतींत कधिंही ठाउक नाहीं भिणें !
वेगें मारित हांक बंधुस पळे ' ये थांब थोडा गडे
भाऊ ! थांब गडे ! घरीं चल अतां हे पाय ठेंचाळले
तूं गेल्यावर आईला बघ बरें आधार कोणी नसे
कां रे निष्ठुर जाहला तुज कुणी कांहीं न कीं बोलले !
वातें शब्द तिचे अचूक गिळले, बंधू पुढें राहिला
दृष्टी आडहि होउनी भगिनिच्या मार्गावरी थांबला
धांपा टाकित फार फार जलदी बाला तिथें पातली
पाही शून्य मनें मुखाप्रति तदा निद्रिस्त पत्रापरी !
बंधूच्या निटिलावरी चमकला तो घर्म हस्तें पुशी
' भाऊ ! काय असें उगीच रडशी ? तूं फार ना शाहणा ? '

' ताई जाउनि सांग आइस गडे ! आयुष्य माझें सरे
दैवाधीन आम्ही ! उगी ! रडुं नको ! सांभाळ आईस गे ! '
हस्तांतून पडे दिवा भगिनिच्या, गेला विझोनी पुरा
शेजारीं झणि भाऊच्याच निजली त्याची तनू वेष्टुनी
गेली इंदुकला पळून लपली ! मेघावृत व्योम हो
आक्रोशा करि यामिनी, लपतसे कोणीकडे हास्य तें
विद्युत् येउनिया तिथें क्षणभरी आत्मे करी पावन
स्वर्गप्रांतिं रमोत बंधुभगिनी जैशी तडित्तोयद !

२१-११-१९१३.

## २२ काव्यसृष्टीस विनंति

कां तारे हंसुनी चेष्टा करिती माझी
कां मुरके मजला पाहुनियां तरुराजी
कां द्वार बंद हो स्वर्गींचें मजला तें !
दशदिशा शून्य कां काय कळेना मज तें
कां इंद्रकार्मुक व्योमापासुनी
दुरुनी मज पाहुनि गेलें लोपुनी
कां कुणि न शिंग देई तें मिळवुनी
ह्या गूढ भाव विश्वाचा कुणि निर्मियला
अपरत्रहि शोधुनि कारण नुमजे मतिला ! १

कां भानुरथाचे तुरंग नच मज मिळती
कां किरणवर्तिका दुराप मच्चित्तां ती

कां भालिं शशि न ये संसृति ताप हराया
कौमुदीसुधा ती कां न मिळे प्राशाया
अमृतस्यंदिनी गाती अप्सरा
त्रिदशालयिं, विचक्षण म्हणती मधुगिरा
मोहवी लास्य लक्ष्मीचें सागरा
परि एकहि यांतिल नयन गोचरीभूत
कां होइ न कोठुनि मग अनुभव नेत्रांत ! २

त्या रम्य उपवनीं क्रीडा करि वनदेवी
त्या शिलातलावरि बसुनि लतातरु सुखवी
तें स्थान जाहलें पवित्र प्रणयकथांनीं
अधिकाधिक होई वनदेवीसंगमनीं
ती देवि रुष्ट कां होई मजवरी
अपराध काय केले मी अजवरी
कां कोणी ऐकत नाहीं वैखरी
जें अजवर झालें तेंच पुढें होणार
मज सुगुण नसति ! तर, विमुखच ती रहाणार ! ३

व्रण—विरोपणार्थ स्निग्ध सुरद्रुम तैल
मज दुरासदच ना ? दुःसह व्रण होणार !
अतिसूक्ष्म शरीरा निर्मित असतां धाता
कां येइ न मजला तेथें पक्षें जातां ?
कां पृष्ठें नेइ न मजला मारुत
जर वाहुनि कुसुमें नेई गंधित

सोपानमार्गही कोण अडवित
वायुनें रज:कण जाति अनंतिं न दिसतां
कां बोलावित मज नाहिंत जरि विनवीतां ! ४

उडुभूषणमंडित विभावरी ती नटली
जोत्स्नेचें सुंदर शुभ्र वसनही ल्याली
ती गगननीलशी कंचुकिशोभा आली
धरि अलंकार ती नवचंद्राचा करुनी
संसर्गसुखा थोडयाशा प्रेमळे
दे हृदयरंजिके मजला सुविमले
किति तिला दीनवाणीनें प्रार्थिलें
परि गेली पळुनी, लपली, कां ती रुसली
हें कांहीं न कळतां क्षीण मती मम झाली ! ५

हे काव्यसृष्टि तूं अभिज्ञ सकल कथांशीं
तुजविणें न कोणी समर्थ कथण्या मजसी
व्यक्तांत आणसी भाव रम्य नव मनिचा
सकलही वस्तुच्या ! उघडि उघडि निज वाचा
तव रसनालोलुप ही मी बैसलें
ललितत्व शब्दसृष्टीचें गमविलें
मग त्यजी झणीं कोपाला कोमले !
तव हृदय-तंत्रिची धरुंदे मजला साथ
हं अतां छेड गे ! निघुं दे दिशिं पडसाद ! ६

पुणें २५-११-१३

# २३ कुसुम

[ एका गरीब मनुष्यानें, संध्याकाळीं काम करून परत आल्यावर आपल्या प्रिय पत्नीस प्रेमाचें चिन्ह म्हणून एक पुष्प अर्पिलें...पुढें कांहीं दिवसांनीं त्यांना एक सुंदर कन्यारत्न झालें ]

"थकुनि भागुनि येतांच घरीं कांते !
तुझें हास्यानन शांति मना देतें;
'इंदु दिसतां सागरा भरति येई'
उक्ति कविची प्रत्यया मला येई ! १

स्वदात्म्यावर विश्वास ठेवुनीयां
तुझ्या प्रेमावर जोम धरूनीयां
तुझ्या विरहीं दिनभरीं कष्ट करितों
करिसि सार्थकही ! मीच सुखी होतों ! २

गरीबींतच सुख मानुनी रहासी
कधीं कामाचा त्रास लव न करिसी !
तुझें गावें पावित्र्य सदा आर्ये !
दीन दुबळा मी ! नशिब तुझें भार्ये ! ३

तुझ्या अंगावर गुंजभरहि सोनें
कधीं नाहीं, तरि तृप्त असति सोने !
नित्य मानिसि पति हाच अलंकार
तुझ्या निष्ठेला मुळीं नसे पार ! ४

* * *

"तूंहि आतां क्षणभरी बैस पाहूं
दमलि असशिल मग भोजनास जाऊं !

तुझी वृत्ती सारखी नेहमीच
तुला होती परि क्लेश मनीं खास ! ५.

आज तुजला मीं फूल आणिलें हें
नसें सोन्याचें परी निसर्गाचें
पहा ! तुजला होईल सौख्य बघुनी;
शुद्ध प्रेमाचें चिन्ह अर्पितों मी ! ६.

पहा, तुजसमही वर्ण असे याचा
असे याचाही नियम हंसायाचा
तुला योग्यच हें, खोंव वेणिमध्यें
बघूं इकडे कर, मीच घालितो गे ! ” ७.

*          *          *

पुष्प खोंवियलें पतीनें स्वहस्तें;
मूर्तिमंत गृहिं प्रेम विराजें तें !
उभय हंसली ती लाजलीही कांता;
उभी राहुनि भू नखें खणी आतां ! ८.

*          *          *

पाहुं जातां तें फूल बहु दिनांनीं
कुठें गेलें लोपोनि चोळवटुनी
परी आलें जगतांत नवें कुसुम
नांव त्यांनीं ठेविलें तदा ‘ कुसुम ’ ९.
स्वावतारें वाढवी प्रेम बाला
पतीपत्नींतिल; मोद तयां झाला !

स्वलीला सौरभें तिनें सदन—
भरुनि टाकावें; तीच होई प्राण ! १०

संगमनेर. २०-१२-१९१३

---

## २४ निराशेंतली इच्छा !

आत्म्याचा हृदयैकबंध तुटतां वाटे नको हें जगत्
तारे हे न, भुतें नभीं प्रहसतीं वेडीपिशी पाहुनी
कालाला महती चढे उगवतां भानू न संपे कधीं
कां वेई न परी मलाच कुहरीं या घोर पंथातुनी ! १

संगीतामधली फुलें विकसलीं जीं पूर्वि रम्याधिक
तीं आतां चुरगाळुनी महितलीं वायूच नेई कुठें !
सारंगीतिल मंजुगान सरलें, तारा तशा गंजल्या
वायू ओरडतो भयाकुल वनीं त्यालाहि ये विकृती ! २

गुंफोनी रमणीय नील सलिलीं नक्षत्रमुक्तावली
द्यावी स्वर्गसमानता अवनिला, होती मनःकल्पना.
सूत्रें मात्र उरोनि, भंगुनि कुठें मुक्ता नभीं लोपल्या
प्राणज्योति विझोनि भीषण तनू वाटे असे राहिली ! ३

रात्रीच्या पडद्यांतुनी बघतसे तो सूर्य वृक्षावरी
आलें दाट धुकें, वरी पसरलें, पर्जन्यही पातला
संपोनिहि विहंगकूजित भयत्रस्ता धरा जाहली
निश्वासप्रलयें जगत् लुलित हो देवी उषेच्या तदा ! ४

गाणीं सोन्मद गाइलीं गिरिवरी क्रीडे जधीं चंचला
त्यांचा प्रेमगंभीर अर्थ कळला नाहींच कीं मानवा
अर्थानर्थज ताप साहुं कशि मी ? आतां प्रभो सोडवी !
दीनाक्रंदन ऐकुनी रसमया ! मृत्यो ! पथा दर्शवी ! ५

संसारीं वसुनीहि जाणुं सहसा अद्वैत-तत्व स्वयें
लोकीं होऊं निदर्शन प्रकृतिचें इच्छा कधींची असे
राहे नीरव बांसरीही अधरीं निर्वात हस्तधृत
तैसें होउनि, नंदनीं परतल्या उत्तुंग त्या कल्पना ! ६

आतां गात सदैव येथ बसणें सत्प्रेमगीतावली
विश्वाच्या कटु कल्पना न गणुनी, मत्स्वैरसृष्टींतली;
जेव्हां येईल कालपाश मजला, सप्रेम उच्चारित
आनंदें मधु नाम.... .... .... .... ! ! ! ७

१२-२-१९१५
—मासिक मनोरंजन. वर्ष २०.

---

## लिहूं कुणावर कविता !

फूलपांखरा ! थांब जरासें
लिहुं दे तुजवर गाणें मधुसें
रंग देइ तव मला रम्यसे
गात तव चरित ! फिरुं दे मज सर्वहि जगत १

अरे !—उडसि कां !—थांब !—पकडतें !
गेलें ! ! येइ न कां परि हातें ?

कोण सुखवि तुज मृदु संगीतें
म्हणुनी जाशी !           बहु वेगें अन्यच देशीं !     २

लिहूं कुणावर कविता तरि मी
सुंदर सुरेंद्रचाप-व्योमीं
लिहुं त्यावर कां कविता नामी
हेंहि पण गेलें !           काय हें विधीनें केलें !     ३

*         *         *

नक्षत्रांची मृदु नव माला
रजनि शोभविल शशिकंठाला
बुलबुल कोकिल नभिं तानेला
मी समयीं त्या !           अर्पीन तिला नव कविता     ४

तरल काव्यमय तेजोमूर्ती
काळोखाहुनि भिन्न आकृती
रजनी राज्ञी चित्रित चित्तीं
स्वप्नमय चित्रा           अर्पीन मनोहर कविता !     ५

तारा-पणत्या नभिं पाजळल्या
क्षितिजीं धरिलें चंद्रज्योतिला
केतुबाण नभिं सूंसूं गेला
उल्कासुमनें           उधळिलीं कुणी मोदानें     ६

विलसे शशि, उडु-माला गगनीं
बुडलें जग मंगलमय गानीं

कां नच येई **रजनी** अजुनीं
स्वप्नराज्ञीला !                    अति उत्सुक मी वदण्याला ! ७

*        *        *

वाट पहातां दमलें ! कळलें—
‘ खपुष्प धरण्या धांवत सुटलें ’
भ्रांतिकाव्यपटतंतू विरले
विषय कवितेला !                    कोणीतरि द्या हो मजला !   ८

**रसिक** म्हणे मज ‘ विषय कशाचा ?
पाठ बोल तूं निज प्रेमाचा
विचार कर तूं आयुष्याचा
गुंफ त्या कविता !                    डोलव मग सगळ्या जगता ! ’

पुणें मार्च १९१४.
प्रसिद्ध न्यू इंग्लिश स्कूल मासिक. (अंक पहिला व शेवटचाच. १९१४.)

---

## २६ –हुंडाच !

‘ आई ग ! रडते कां ग ?    तुज काय जाहलें सांग ?
बाबा तुज रागें भरले,    कीं कुणी दुजें बोलियलें
कां बोलत नाहीं मजसी,    कां मीच तुला दुखवीलें !
गुढग्यावर टेकुनि गाल    कां अशी मौनव्रत ? बोल !

निःश्वास तुझे आई हे
डोळ्यांत आसवें बघतां

घाबरविती मज न रहावे !

कां वर तूं पाहत नाहीं ? मूकाश्रू थांबत नाहीं ! १
हा वसंत टेकुनि गुढगे मांडीवर, तुजसी बघतो
' आई ' ग मारुनी हाका भयभीत असे झाला तो
कर एक घालुनी कंठीं दुसऱ्यानें वदना धरतो

दोघांचें हास्यहि लपलें
मीही बघ आकुल झालें
आई ग ! काय जहालें

तूं नको रडूं ग आई ! भाऊचा घे कीं पापा ! २

मग कपोल लोचन पुसुनी वदनांबुज हळुं वर केलें
निश्वास दीर्घ टाकोनी बाळास नीट बसवीलें
मृदुहास्य वळें आणोनी, मजकडे पाहुनी बोले

' वेडी तूं कांहीं नाहीं
तूं नको घाबरूं बाई
मी उगिच बैसलें ! पाहीं !

जा जरा घेउनी याला मंदिरांत या शेजारीं '
मग घालुनि पोतेरें मी येईन तुझ्या माघारीं ३

तरि उदासीन ती होती !– परि आज्ञा मान्य मी केली
मज वसंत मार्गी म्हणतो " ताई ! कां आई रडली ?
–बाबा तिज काल म्हणाले ' तेंहि स्थळ कसचें जमतें
–' हुंडाच ' असें कांहींसें ! मज नाहीं पुढचें कळलें !

.... .... .... ....

कां ताई तूंही रडसी
सांगूं कां मी आईसी
कां वद्द मला तूं धरसी
काय मी बोललों तुजला ? हें काय ? रडुं नको कीं ग ? ४
लागला तोहि रडण्याला धुसमुसुनी कीं मी रडतें !
त्या काय कळे मुग्धच तो भांबावुनि अधिकच रडतो
मग प्रदक्षिणा घालोनी गरुडाच्या ज़वळच बसतो
स्थिति दुस्सह मज आठवुनी
किति छळणुक मजपासोनी
आईबाप घेति सोसोनी
ईश्वरा ! पाव या काळीं ! सुचवी मज कांहीं उपाय
संकटग्रस्त पितरांनां सोडिव रे ! धरिते पाय !

.... .... .... ....

किति काळ बैसलें तेथें भान कुणा, काय जहालें
कोणास ठाउकें ! परि हें सृष्टींत मिळुनि मन गेलें !

पुणें १९१४ एप्रिल.

---

## २७ सागरगोटा

" दुरखाइ बने ! अजून ग ! " " हप्पी ! चुकलं तुझं ग ! "
टाळ्या ऐकूनि जागी झालें ! जिन्यावरुनी हळूं पाहिलें
सागरगोटे खेळत होती यमी आमुची माडीवरती
पाय न वाजवितां वर गेलें पाठीमागें उभी राहिलें !

" दुरखाईचा....तिरखाईशी '    बोलत होती अशी कायशी
खडा टाकिला वांकुनि खालीं    " बने ! खडा ? " वर बघूं लागली
बंधमुक्त खग उडे जसा    नभीं पळाला खडा तसा
' गंमत करण्या छान वेळ ही '    ऐसें माझ्या मनांत येई
हळुंच झेलला सागरगोटा    " दे रे नाना !—लबाड मोठा !"
मागें वळुनी रागें पाही    "हें ग काय ? अं—बघ ग आई !"
"थुश्शा"—उठली, सोगे धरिले ! पाय उंच—छे ! वाया गेलें
" बघ हं ताई तूं ! दे बरं कां ?— आइ मारते बघ तुज हाका ! "
' पुराणास कधिं गेली आई    जसें काय हं:—माहित नाहीं !'
' परत हवा कां सागरगोटा    ऐकशील कां पण—वा: ताठा !'
"हं तर म्हणुंया ?" मान हलविली,    खेळासाठीं अधीर झाली,
"सांग सांग ना लवकर आतां    बनी थांबली माझ्या करितां "
' कांहीं नाहीं; पापा गोड—'    " अं-अं-उं-उं-हं-हं-सोड "
बळेंच वरती तोंड करोनी    मुका घेतला चुंबचुंबुनी !
गालीं स्मित मधु बघुनि लाजरें    लज्जित झाले गुलाब सारे !

इसलामपूर १९१४

सिद्ध-आनंद वर्ष ९. १९१५;    अभिनव काव्य. भाग ३. १९१५.

---

## २८ तटिनींतील पुष्प

काव्यें आजवरी कितीक रचिलीं ज्यांना न कांहीं द्युती
भूगर्भीं झणिं मृत्तिकेंत लपलीं, लोकीं न तीं राहिलीं
नाहीं शोभविलें तयास कधिंही प्रेमप्रकाशें लव
झालीं निष्प्रभ दुष्करार्ककर तीं ! व्हावा कसा गौरव !
नाहीं एकहि सौरभान्वित सुम प्रेमें मला पाहत
स्वर्गप्रेमसुधा समीर मजला वाहोनि ना आणित !
....राहूं मी तटिनीतटीं उभि किती ? तें पुष्प आणूं कसें ?
' कोणी येथ तुला बरें आणियलें ? कां तर्पिसी ईक्षणें
' आशा दावियली बहूत दिन तूं ! कंठूं कसें जीवित ?
' नाहीं कींव तुला कशी ? मम व्यथा हर्षे कशा पाहसी ? '

* * *

किंचित् वाहुनि वायु पुष्प हललें, तीरासमीपीं आलें !....
' मी दुष्टा ! कटु भाषणें दुखविलें कैसें मना कोमला ! !
पुष्पा जाणित मी तुझें हृदय हें, जें मूकशी गायनें
गावोनी रमतें जरी न श्रवते कोणी दुजें या जनीं.
पुष्पा बोल ! आतां मतैक्य करुंया ! आत्मे जुळूं दे गडे !
तूं—मी होत समान ! जा विसरुनी माझें कटू भाषण !
काव्यें गाऊं मनांत रम्य अपुलीं, कोणी पुसेना जरी !
नाहीं रंगलि सृष्टि गायनिं तरी **आहे तुझी मी सदा !** '

पुणें १ जुलै १९१४.        प्रसिद्ध लोकमित्र.

---

# १९ उत्कंठितेचें गाणें

प्रभातकाळीं मैना गीतें भारुनि वन टाकी,
गत-सौख्य-स्मृति-वीचि हृदयसरिं आवेगें उठती;
सांग कसा उत्साह धरूं मग ! दिन कर्में कसलीं ?
नाहीं जोंवर भेटणार तूं कर्तव्यें कसलीं ?

तुजविणें नको तें गायन ऐकावया । गायका !
बघ ! नयनहि मिटते, रम्य नको पाहण्या, सुंदरा !
हें विश्व बुडूं दे ! होवो भू जलमयी, जीवना !

प्राणहीन तनु निःश्वसितांच्या संगें ही उडुं दे
निकटि पातली तव उडतां तर भरेल जग नादें.

हिरवा चांफा सुगंध वेष्टित घुमतो उद्यानीं,
नको ग बाई जाणें तिकडे, श्रवणेंही कानीं !
सुगंध फसविल भासच होइल मम हृदयेशाचा,
उत्कंठेला अंत न राहिल, पूर निराशेचा

ये पुष्प-रथावर स्वारी करुनी त्वरें, शोभना !
तूं राजा सकलहि सुमनांचा प्रभुकृपें मृदुमना !
उन्मत्त वायुला वश्य करी निजकरें मोहना !

अंधाराची फळी फोडुनी मनकवड्या सखया,
भेट लवकरी ! वाट बघूं किति कृष्ण कुटिल जागीं या !
जातिलतेवर पतंग पिंवळा प्रेमास्तव झुरतो,
बहुकाळानें वदन उघडिलें कलिकेनें, रमतो !

सदैव प्रेमें परस्परांशीं हितगुज करितांना
वदूं कशी मी शुष्कजीवना ! झुरतें ही दीना !
नयनांतिल मूर्ती अश्रुबिंदूसवें, रे सख्या
हृदयावर पडुं दे गाळिन तरि आंसवें, रे सख्या
परि मूर्तिहि हरसी तस्कर ! हृदयासवें, रे सख्या
अश्रु कोंदले, शोक दाटला, मार्ग बंद झाले,
तव भेटीनें मौक्तिक तरि कर अश्रूंचे सगळे !
इंदु झुगारी प्रसन्न शीतल रविकर नभिं सगळे,
हृदयीं शांती उचंबळोनी, प्रेमाब्धी डोले.
क्षण न लोटला, ग्रहण विधूला लागे; दुर्दैवा !
ज्योत्स्ना शीतल लोपुनि विरला तिमिरीं देखावा;
दशदिशा जाहल्या सुंद प्रलयवात हे वाहले
हे जलधर झांकुनि नभतल भीषणरवें गर्जले
हा अश्रूधाराप्रपात हृदयावरी आदळे
सान्निध्याचे सुखकर कर तव भास्कर ! फेकोनी
अश्रुबिंदुंवरि हास्य-इंद्रधनु झळकूं दे गगनीं !

इसलामपूर ४-११-१९१४
प्रसिद्ध—दिल्लीदरबार अंक, लोकमित्र १९१४.
अभिनव काव्यमाला, भाग ५-१९२२.

## २० फुंकणी

ही वृंदावन भू भूषित करि गोपाळ
ही वेणूनेंही कंपित केली मधुर
हे स्तब्ध चराचर सकल ऐकण्या गान
व्यवसाय विसरले गानीं भिनलें भान
हे नभोमंडळीं आले तारक
करितात कृष्णमुरलीचें कौतुक
त्या किरणशलाका प्रीति-द्योतक
रमतात नर्तनीं कुसुमाकर सारे हे
फुंकणी ही येथें प्रमोद वरिते आहे. १

मुख कृष्ण असे मम नित्य बसुनि वन्हीशीं
तरि नातें आहे भगिनींचें मुरलीशीं
रूपांत रंगला गानीं ही हरि रमला
तो संगम झाला सुखदायी विश्वाला
आमचा वायु नित्याचा मित्र तो
आनंदें ऐकुनि गीतें वाहतो
रोमांचित फुल्ल कदंबा भारतो
ही अशीच होवो पुलकित सारी सृष्टी
नयनांतुनि गळते मोदें अश्रूवृष्टी.

मार्च, १९१५ ( सुधारलेली १९२५ )
प्र. फर्ग्युसन कॉलेज त्रैमासिक.

---

# ३१ तारकाचंद्र

पहा पहा ही काय दिव्यता भव्य अंबरांत
निळी ओढणी नेसुनि रजनी विराजते शांत
निज नाथाला शोधायाला या तारा जमती
रजनिस पाहुनि मोहित होती, भंवति तिच्या स्थिरती.
जा ग ! रजनी हिंड हिंड तूं त्यांना घेवोनी
डोलडोलवुनि निजव तयांना विरहा विसरवुनी.
रजनी-देवी-मृदु-अंकावरि तारानों पहुडा
अवधी आहे अजुनि शशीला, तदनंतर क्रीडा !
अल्लड कां ग इतुक्या झालां ! विस्मित कां झालां ?
इतकी कां या जादु रजनिची !—विरह कमी केला ?
नको नको मग रजनी झटुं तूं निजविण्यास त्यांना
तारासंगें नर्तन कर तूं विहरुं दे त्यांना !
प्रेमाचा हा फेर धरोनी विहरा स्वच्छंद
शशिकृष्णाच्या मूक गायनें लागे हा छंद
या ग सगळ्या ! मागें आतां नका कुणी राहूं
रजनि देविचीं, प्रिय कांताचीं प्रिय गाणीं गाऊं.
प्रेमाच्या या अभिनव समयीं या मंगल कालीं
हांस हांसुनी मोहुनि टाकूं जग वैभवशाली !
त्या हास्याच्या प्रवाहिं जग हें बुडुनी जाईल
चला चला तर तारांनों या दवडुं नका काल.

*　　　*　　　*

## तारकाचंद्र

रुचिर तारका ! किती शोभतां अव्याजा तरुणी !
खेळ असा हा चिर चालूं द्या गगनाच्या सदनीं
वितानगंगा मृदुल गातसे ताल तिचा धरुन
वल्लभमुरलीरवानुरोधें शोधूं या स्थान

*            *            *

पण या बाई कुठें चालल्या चंद्राच्या राण्या !
कां ग लपलां ?—कळलें कारण !—लाजुं नका येण्या.
हा तर तुमचा प्रिय पति चिंतन-विषयच ना होता ?
मग आतां कां लाजुनि पळसी ? इंदूच्या चित्तां !
आळवुनी त्या गीत म्हणा ग ! लाजलाजऱ्यानों
श्याम-दर्शनीं पळति न गोपी—श्रवा सकळिकांनों !
त्या तारा तर लपल्या गेल्या, भाग्य नसे त्यांचें
चंद्रा ! तरि त्या गृहिं जाउनि दे हार प्रेमाचे.
नसे तयांचा दोष मुळीं ही मुग्धा त्या असती
प्रत्यंतर नव वधू लाजते बघ अमुच्या जगतीं.
पण कां चंद्रा तुझी प्रेयसी टंवकारुनि बघते !—
मजला ! ! आतां काय करूं तरि बघ मी घाबरतें !
छे ! !—पण....प्रेमी दृष्टि न कळली मजला ती दुरुनी
रम्य रोहिणी अशीच बघ गे ! मोदा वितरवुनी
उलटा अर्थच केला कीं मी प्रेमळ दृष्टीचा
इंदु रोहिणी ! चिर नांदा ! जय युष्मत्प्रेमाचा !
मंगल मंगल जिकडे तिकडे ! तेजोमय अवनी
तेजोमय गिरि, सरिता, लतिका, तेजोमय रजनी

त्या तेजाच्या त्या प्रेमाच्या दिव्य रसें झालीं
प्रफुल्ल कुसुमें जड धरणीवर, सुधा-स्रोत भालीं
त्या कुसुमांतिल मरंद चाखूं, अमर जनीं करतें
वाग्देवी ही मधुर्वीचीसह मधुगाणीं म्हणते.

पुणें ५–३–१९१५.

---

## ३२ माझें फूल

हीं इथें वनश्री मोदें डुलते आहे
ही प्रेमभरानें ज्योत्स्ना हसते आहे
हीं वायूसंगें नृत्य फुलें करतात
मृदु गंध विखरुनी प्रेम भरितीं विश्वांत
  जग अवघें आनंदानें वेष्टलें
  सौंदर्य सरलताभूषीं विलसलें
  तेजांतच वनदेवीला बसविलें
ही सकल मेदिनी दिव्य-स्वरूपा झाली
मम मनोविश्विं परि भीषण रजनी आली !
मज नको वाटतें कुसुमासह तें वदणें
मम आद्यकुसुम तें नसतां व्यर्थच जगणें !
हीं प्रसूनपात्रें नयनांपुढतीं नलगे
घेईल फुलांचा गंध कोण मजसंगें
  कुसुमानों ! जा तुम्हि दूर काननीं
  त्वन्मधुर मधूचें पान सेवुनी

आल्हाद न किमपी आतां या जनीं
जोंवरी न येई पूर्ण सुखाची वेळा
तोंवरी पुरे मज अविरत अश्रूमाला !
नभमंडलिं तारे असंख्य बसती नटुनी
मी कशास पाहूं !—जा हो नयनापुढुनी
हृन्नभोमंडलीं वसलेला मम तारा
अवतरे न मूर्त मग ! कशास व्यर्थ पसारा !
घनखंड मनोव्योमांत नाचती
साम्राज्य कृष्णरात्रीला अर्पिती
नर्तनीं परमसुख सौधीं बैसती
परि गढूळ सरिता हृदयगिरी भंवतालीं
वाहुनी भिवविते प्रगाढ अंधःकारीं !
गगनाचा पडदा सारुनि बाजूला हीं
नवतारककुसुमें आणिलीं वर्नि वाऱ्यांही
तें गवती डुललें फूल मनोहर साधें
मज पाहुनि हंसलें नित्यासम ही मोदें
परि तेंही घेण्या इच्छा होइना
जडतसे आतुर भ्रांती या मना !
कां पुरवित नाहीं माझी कामना
तें माझें प्रेमल फूल भेटवा त्वरित
मग काय उणें मज राहिल या विश्वांत !

पुणें ७-७-१९१५

## ३३ बकुलपुष्पमाला

बकुलपुष्पमाला, देतें प्रियाला !
रम्य शरच्चंद्रिका, सुखवि विश्वगोलका
तेविं पुष्पमालिका होवो तुम्हाला !
बहुत विरह सोशिला रजनि येइ चंचला
मूर्ति तुझी प्रेमला स्पष्ट भासते !
भेट देसि येउनी करित कल्पना मनीं
फुलें बघत मोजुनी क्रमितसे युगें !
फुलें जाति वाळुनी हृदयपुष्प-अग्रणी
नाथ ! भानुदर्शनीं फुल्ल होउं द्या !
'भ्रमर तुझ्या हृदयिं मी' वचन असें बोलुनी
सुखविलें मला मनीं परि खरेंच कां ?
भ्रमर मधू सेवितां हृदय मिटे तुष्टतां
अंतरीं न तो स्वतः वसत राहुनी !
हृदयमंदिरीं वसे मूर्ति तुझी कोंदणीं
अश्रुहार वाहतें त्यास अनुदिनीं !
बकुलहार गुंफिला अवधि किती जाहला
कंठिं घालण्या तुला उत्सुका अती !
बोलतें फुलासवें ढाळतात आंसवें
याचतात न्हाणुं दे मूर्ति तव सदा !
तुषार हार घेउनी निर्झरी कृशा वनीं
वाट तुझी पाहुनी शोकरत्र करी !

घाल माळ ही मुदें मदीक्षणास तृप्ति दे
प्रेमपूर वाहुं दे उभय लोचनीं !
हृदयसंपुटावृता प्रेम-अश्रु आर्द्रता
फुल्ल त्यास बनवितां काळ घालवूं !

पुणें ७-७-१९१५

---

## २४ हतभागिनी

सृष्टिसतीच्या हृदयावरलें
प्रणयसंगमीं उद्भवलेलें
निसर्गसुंदर पुष्प चिमुकलें
बसलें होतें मग्न चिंतनीं निर्झरतीरीं रानीं !
म्हणोत त्याला कोणी तरुणी
समजो किंवा कुसुमित अवनी
मी तर तिजला पुष्पच गणुनी
ठेविन हृदयीं सदैव जपुनी प्रेमाच्या देव्हारीं !
पर्जन्याचे दिन ते सरले
रूप जगाचें खुलूं लागलें
हरित तृणावर मानस रमलें
कां मग माझें सुम—छे—बाला दुःखचिंतनीं चूर ?
मृदुल करावर गाल ठेवुनी
दंव-मुक्तावलि ती अवगणुनी

## श्री-मनोरमा

सुंदर निर्झरकंठामधुनी
गानमौक्तिकें ध्याया सजली असे काय ही बाला !
वाह्य जगाचा विसर पडोनी
अंतर्वीणा कंपित करूनी
मना रिझविते मूक गायनीं
निर्झर ऐकत ताल देउनी गात बसें मीही गाणें !
जडली चित्ता पूर्ण भ्रांती
सर्व जगाची होई क्रांती
असें वाटलें माझ्या चित्तीं
असें काय हें गूढ सृष्टिचें कुणास उकलत नाहीं !
रूप तिचें तें लाजवि रतिला
पूर्वा देई कांति कुंतला
पद्मगर्व नयनांनीं हरला
प्रभातेंदुसम परंतु भासे निटिलप्रांत तिचा तो
नयनांमधुनी मौक्तिकमाला
तुटुनि पाकळ्या निर्झरिं पडल्या
पवन-मधुप-रसिकास्तव झुरल्या
कींव न कोणा, क्षणीं विसरलें जग हतभागी जीवाला !

पुणें. १४–७–१९१५.

## ३५ एक पत्र

होतें गुंफित हार तो बकुळिचा गाणीं मुखें गुंगत
चित्तीं गुंफित कल्पना सुखमयी भावी शरत्कालच्या
कोणा ठाउक तें कसें पण पुरी तंद्री मना लागली
' हा तो हार असाच अर्पिन मुदें पादांबुजीं कोमल ! '

वाहोनी अति मंद वायु गळली ती जीर्ण पर्णावली
येइ कोण म्हणोनि मी दचकुनी मागें तसें पाहिलें
दादा येइल शोधण्या मजसि तो, बैसे लपोनी कुठें ?
बोलोनी मग सारखें वटवटा भंडावुनी सोडिल !

तो आलाच पहा ! विचारित असे ' देशील कोणास हा ?
ताई ! सांग बघूं जरी मजसि गे आहे पुरें ठाउक
हाराचा उपयोग काय कळुंदे, दे टाकुनी तो अतां
ये जाऊं चल खेळण्यास; कसली आहे तया किंमत !

येतांना तुजसाठिं हीं वच फुलें शाळेंतुनीं आणिलीं
घे सारी, पण नाद हा त्यजुनि दे, खेळूं आतां गे वरीं !
' हो !....ताई ! पण सांगु कां तुज गडे !....आहे कशी गंमत ! '
नाहीं सांगत जा ! हं—ओळख बघूं तें काय आहे वरें !!

आलें पत्र असेल आज म्हणुनी वाटे मला एकदां
बोलूं त्यास कशी परंतु, मजला लज्जा अशी वाटली
' हरलें मी ' म्हणुनी तयास वदलें; तूं सांग पाहूं अतां
किंवा हो ! असशील कांहिं तरि तूं खोटें मला सांगत

खोटें नाहिं अतां कळेल तुजला येशील जेव्हां घरीं
शांती वाट तुझी अत्युत्सुकमनें आहे घरीं पाहत
' आहे ती लपवून ठेविलि तुझी वस्तू कशी जम्तित
नाहीं सांगत मी घरीं चल अधीं ! दे टाकुनी तीं फुलें '

ऐसें बोलुनि टाकिली उधळुनी सर्वत्र सारीं फुलें
' हें रे काय तुझें ' ?....सांगेन आईस मी
" ताई ! काय ग काय सांगशिल तूं, तें सांग पाहूं मला
' स्वारींचा मम हार टाकित असे तोडून ' ऐसेंच कां ? "

त्याचें ऐकुनि बोलणें परि मला आलें जरासें हंसूं
वेंचोनी परडींत सर्व भरलीं आम्ही फुलें भूस्थित
उद्यानास निरोप देउनि आम्ही आलों घरीं सत्वर
होती अंतरि वासना प्रबल कीं लाभेल तें पत्रही

राहे हार तसाच ! वाचुनिच तो मागाहुनी गुंफिन
आनंदाश्रु विणोनि भूषविनही तें रम्यसें लेखन
घालोनी मृदु पुष्प आंत सुरभी धाडीन मी पत्रिका
आलें धांवत आंत उत्सुक अती ! ' देईल केव्हां परी ! !

२०–७–१९१५,
पुणें.

---

# ३६ मुर्दे पवन वाहतो

मुर्दे पवन वाहतो उपवनीं लता क्रीडती
सुमंजुल रवें वनीं मुदित वंशही गातसे
हंसे हळुंच लज्जिता रुचिर पश्चिमाशा नभीं
अशा समयिं जातसे भ्रमुनि चित्त माझें पिसें !

जलें भरुनि राहिल्या असति शैल वन्यस्थली
गमे, रमत गातिही गमनिं बाल या निर्झरी
तृणांकुर धरी तया विविध छत्र वा चामर
मनोरम कलावती सकल सृष्टि तेजस्विनी !

मृदू हरित गालिचा पसरुनी सुरम्य स्थलीं
प्रशांत वन देवता गमत नर्तनीं प्रोद्यता
जलीं सहज गुंफिली रुचिर पुष्प-तारावली
दिलीं गगनिं फेकुनी प्रणयपाश वा भूषणें !

सुगंधि निशिगंध हा जगत टाकि वेडावुनी
सुधाधवल कांतिमा खचित लाजवी चंद्रिका
तशांत मग गंध तो सकल सृष्टिचें भूषण
सुरद्रुम-प्रसून ही नमतसे तयाच्या पुढें !

अशा समयिं दाटलें मम मन प्रतप्तानलीं
कुणी तरि वदा बरें कशि असूंहि सौख्यान्वित ?
नव प्रणयचिंतनीं विरहदुःखिं भाजे मन
सुरम्य नव सृष्टिचीं सरल भाषणें ही नको !

तशीच पडलें उगी विकलगात्र सौधावरी
मनीं करित कल्पना सुखद संगमाच्या अती
कुणांस नकळें किती समय जाहला चिंतनीं
हळूंच कशि मोहनी पसरते हि निद्रा सती !
अति प्रणयनिर्भरा मधुर येइ स्वप्नावली
तयांत मन गुंतलें, नच रती जगाची उरे
परी पुनरपी सुखा निरसुनीहि ये जागृती
गमे सकल जीवितक्रमण रुक्ष भारावह !
जधीं उदय या नभीं प्रिय-मुखेंदु पावेल तो
करीत शुचिं तारका त्वरित अश्रुबिंदूसहीं
तदा मुदित मानसें रचुनि प्रीति-मुक्तावली
रचोनि नव गायनें करिन त्यास हर्षाकुल !

.............

अतां नियम-हीन या सतत जीविता कंठणें
कुठें तरि कसें तरी नियमहीन आलापणें
लता सुखवुं पाहती फुलफुलोनि रात्रंदिनीं
परंतु उपयोग कां ? सुमन ढाळणें व्यर्थ तें
सुचित्र पट रंगवी विविध भास्कर प्रेमल
विचित्र सुमनावली मजसि अर्पि पर्जन्य ही
नवीन बहु यत्न ही करिल सृष्टि सौख्यार्पणीं
परंतु करि कां न ती अजुनि सत्य स्वप्नावली ?

पुणें. २२–७–१५

---

# २७ स्मृतिमंजूषा

“ पत्र वाचितां येइ उमाळा प्रेमसागराला
मोत्यांचे सर राजहंस कीं अर्पितसे मजला
कंठी घालुनि अश्रुजलांनीं न्हाणिन दिवसभरी
हृदयीं धरुनी पुसेन वृत्तें नाथांचीं सारीं ”
ऐशी वेडी कविता लिहुनी धाडिन नाथांना
विनविन कीं मज विरह न साहे ! येउं द्या करुणा !

*　　　*　　　*　　　*

पत्र घेउनी हृदय-प्रदेशीं; दर्पण घेवोनी
विंचरण्याला कुंतल बसलें पुढतीं ठेवोनी.

*　　　*　　　*　　　*

हाच आरसा मुखें जुळवुनी कितीकदा दावी
अगाध प्रीती हृदयामधली उचंबळुनी यावी.
लबाड अरशा ! चोरुन ठेविसि काय वदन मधुर ?
ते वच परि मज दिसूं लागले ओष्ठद्वय रुचिर !

*　　　*　　　*　　　*

सुवास घेतच प्रेमफुलांचा आपण दोघांनीं
नाहीं नाथ कां मधू चुंफिला सुंदर ओष्ठांनीं ?
गुलाब खुलला पहा कपोलीं !—मरंद चाखूं कां ?
.... .... काय बाइ तरि !!—कांचच सगळी
अरशा ! फसाविसि कां ?

*　　　*　　　*　　　*

विविध फुलांचा बाग बहरला ! दोनच कमलें हीं
भृंग होउनी त्यांत रमतसे मीच सर्वदाही !!
महाकवीद्वय डांटे-शेले चमकुनि जे गेले
आत्मे त्यांचे एकरुप जगिं होउनि अवतरले !—
तेच शोभले अपुल्या मानसिं, विमल वृत्ति दावी;
सुधास्यंदिनी वाणी ही ती अववी प्रेममयी !
उदार दिनमणि !—तेज वितरले क्षुद्र शशीला या
तेजोयुत कर स्फुर्ती चढवी जगताला साऱ्या !
—तुलना नाहीं वर्णन अपुरें सदाच राहतसे
नको मला परि कांहीं दुसरें ! दर्शन द्या नुसतें !

*  *  *  *

कां म्हणुनी पण तृप्ती व्हावी दर्शनिं हृदयाची ?
हृदयमीलनें समाप्ति होते गुरुव्यथ विरहाची !

*  *  *  *

पुष्प शिरीं मम तुम्ही खोविलें—काढुनी कां घेतां ?
सर्व लबाडी मजला कळली—लपवुनि कां धरितां ?

*  *  *  *

अग बाइ ! हे केस मोकळे वेणी घालूं दे
भासच सगळा ! कांत राहिले दूर प्रदेशीं ते
प्रियजनविरहें असह्य झाला अंतरिं संताप
तन्मयतेनें बहकुनि गेलें मन आपोआप

लबाड दर्पण काळें कर जा ! स्मृतिमंजूषेचें
द्वार न उघडी, नको वाढवूं दुःख अभागिनिचें !

पुणें जुलै १९१९

---

## ३८ नभोलेख

निष्ठुर धाता, निष्ठुर जगती, निष्ठुर रूढिकृती,—
त्रिकूट जमलें ! खलबत करिती, प्रणयिजनां छळिती.
खेळ भयानक ! रण माजविती, रुधिर पिण्या बघती;
धीर वीर परि काय म्हणुनि ती इच्छा पुरवीती ?

* * *

रम्य भाषणें जाउनि आला काळ वियोगाचा
अभेद्य चित्तें विरह किती तरि हा सोसायाचा !
वज्रशिलेची योग्य न उपमा, आघातें भंगे;
विरहिंहि तव वच स्मृतींत राखुनि दुःखी मन रंगे.
गत स्मृतीचीं चित्रें बघतां देहभान हरतें;
मन भ्रमे, तरि त्या चित्रातें नभिं, नयनीं लिहितें
‘ जवळि बससि तूं—’ होइ कल्पना; हावभाव होती;
वदनीं नयनीं भाव तरंगीं प्रतिबिंबित होती.

* * *

स्वार्थत्याग तव स्मरतां जडतो चित्ता अनुताप,—
व्यर्थ फसविलें पाशामध्यें मन तव निष्पाप !

आम्र धरितसे कवळुनि हृदयीं कांटेरी वेली,
शल्यें सोसुनि सुखवी मन, ती पुष्पभरें लवली.
रूप गंध नच, कला न एकहि ! निर्व्याज प्रेम
केवळ देतें उदार वीरा ! वाढू दे जोम.
हवी कशाला ती सारंगी ? असे हृदयतंत्री
तारा जुळवुनि मधुर गायनें गावीं तिजवरती.
वड्याळ टिक् टिक्—फेंक दुरी तें, श्रवुनी हृत्कंप
काला विसरूं गुणगुणतांना प्रेमळ आलाप !
पहा फेकिला नयनावाटें मोत्यांचा कंठा
हार कशाला ? करच वेढितिल परस्परां कंठा;
शिवणें विणणें ? हवें कशाला ? नांव नको त्याचें !
एकजीव हीं हृदयें झालीं, काय शिवायाचें !
अधरकांतियुत स्मित विलसवुनी अरुण प्रभा पसरी;
नाथ—रवे ! ही प्रिया धरा तव आकर्षी स्वकरीं !

*　　　*　　　*

जलदागमनीं मोर पिसारा उभारुनी नाचे
प्रतिभाशालिन् ! कवनीं गासी स्वागत प्रेमाचें !
अनुकार करीं निजरमणाचा मदमत्त मयूरी,
स्वीकारी हें हृदय, तुझेंची असे हृदयहारी !
तुझीं गायनें ऐकत असतां मन हें बेताल,
किती धन्य मी ! तुझ्या संगमीं लपुनि चरे काल.
घनरवश्रवणीं विरहि मनाच्या संतापा बहर;
वीज चमकतां, द्युति मिळतां तव मनिंची, ये धीर.

सुखद गायनस्मृति होवोनी तल्लिन मम वृत्ति,
जवळ बैसुनी तींच गायनें गासि, गमे चित्तीं.
अकांड तांडव पवनासंगें प्रबला जलधारा
करिती तेव्हां तीव्र जाळतो विषाद जीवाला.
हळहळ लागे, शोक भरे मनिं, अश्रुपूर गगनीं
कोण ढाळितें ?—गाल पदर मम भिजले अश्रूंनीं !

*          *          *

दिवसांमागुनि दिवस चालले वाट किती पाहूं ?
कुशलवृत्तिचें लिखित धाड तरि, उशीर नच लावूं !
पत्रांतुनि तव हृदय समजतें, नयनांतुनि दिसतें;
तूं-मी एकच, लिहुं मग कवणा जें हृदया पटतें ?

*          *          *

प्रेमकरांगुलि धरुनि तुझी मी चालत असतांना
सकल वस्तुंना विसरुनि जातें, स्मरतें तव ताना.
लाजाळूची लतिका लपली, लाज कुठें उरली ?
लाज कुणाची ? निजहृदयाची ? इश्श जळो मेली !
छे ! मी वदलें कांहितरी हें; कोटिक्रमच वृथा
होइल करणें ! निर्लज्जच मी, बरें काय म्हणतां ?
विनोदसमयीं पाणी चमके नयनीं, मी हरतें
वेडि खुळी परि सौख्य सेवितें, तव हृदया वरतें !
नकोच सोडूं हात सुखद हा, अविरत प्रेमसुधा
संचरुं दे प्रतिरोमीं गात्रीं नवचैतन्य सदा.

करस्पर्शनें, प्रेममीलनें, प्रतिनेत्रनिपातें
जागृत स्वप्नें पडती, होतीं खरीं, साक्ष पटते.
अश्रुस्मरणी फिरवुनि जपतें मधुर तुझें नाम
भक्तावर कर दया—हा न कां प्रेमाचा हुकुम ?

*  *  *  *

ज्योत्स्नारंजित घालविल्या किति शरदीर्व रजनी;
विषाददीर्घा घालविणें परि भाग पडे रुदनीं !
हिंदोळ्यावर बसुनी प्रेमें गाणीं तूं म्हटलीं;
चंद्र लाजला, गर्व हरपला लपे ढगाखालीं.
अशुभ तेंच मज होतें गमतें, तूं कोठें लपसी !
चंद्र उगवला तरी न दिससी, अंत किती बघसी ?
लतिकावलयीं शशि नसतां करि नर्तन खद्योत;
क्षुद्र जनांचे चार बघुनि तुज जडे काय खंत ?

*  *  *  *

हृदय थोर तव भव्य सिंधुसम विशाल तें दिसतें
मीनासम मम क्षुद्र हृदय हें त्यांत सदा रमतें;
किंचित् जातां तीरावरतीं प्राण लया जाती,
त्वन्मानसजलविणें गमतसे दुःसह ही जगती !

*  *  *  *

क्षुद्र मीन कां प्रतिबिंबित मी इंदु तुझ्या सलिलीं,
तव प्रेमाला भरती आणी बांधुनि करजालीं;
तव हृदयाची खळखळ होतां अस्थिर शशिबिंब,
सुख-दुःखाचा भार तुझ्यावर जीवन-अवलंब !

रत्नाकर ! दे विचार-मौक्तिक-गण तळिंचे मजला;
कर-तारेनें हार गुंफुनी उधळिन गगनाला.
हृदयावर कां थर बर्फाचा ? विचार ते लपले;
परावर्तनें किरण इंदुचे निष्प्रभ बघ झाले.
कवण रीतिनें तुला आळवूं ? मूक कसा बनसी ?
हाय ! जळाली जोत्स्ना ही बघ ! स्मृतिहि सकल हरिसी !

* * * *

त्वत्प्रेमाचें पान कराया जीव तहानेला,
दानशूर तूं पुढें ठेविसी सुधापूर्ण पेला !
करितां करितां पान तयाचें त्रिभुवन हो फुल्ल,
सर्व संपतां-छे संपे कां ?—मना पडे भूल !
वेड जडतसे ? एक तुझें तें मधुमंजुल हृदय
स्मरतां रमतें, परि न काव्य करि शब्दीं शिरकाव.
त्या हृदयाची, त्या प्रेमाची, दिव्य सुधेची त्या
फेड करुं कशी ? तुल्य न जवळी थोर तुझ्या हृदया !
मारुतगानीं तन्मय कुसुमें माना डोलवितीं,
पवन करितसे छिन्न पाकळ्या नष्ट सुरस-कांती !—
असें वाटतें काय तुला वद ? पसरूं दे गंध !
ठेविन हृदयीं, अधिकच विखरिन दिगांतिं स्वच्छंद.
हृदयपात्र तव प्रेमसुधेनें वाहूं दे पूर्ण !
उन्मत्त मनें करीन प्राशन, त्यांतच पोहेन.

* * * *

विरह तनुतनू निर्झरणी हलु दरींत झुळझुळते
व्यथा न साहुनि, तुझ्या चिंतनीं गात तिथें बसतें.
नाथ ! अतां किति हृदय-परीक्षा बघतां यावेळीं ?
निकषघर्षणीं सुवर्ण संपे, हळहळ मग जाळी !
‘ आम्र फुलतसे युवतिगायनें ’—कविजन संकेत;
यत्न गावया करितां विरली स्फूर्ती नामांत !
लक्ष्य तव मुखीं, स्फूर्ती कसली ? म्हणूं काय गान ?
हृदय-चोरिची तऱ्हा नवीनच दिलीस शिकवून ?
कां म्हणुनी पण दोषुं तुला ? तव ठेव सुखें जपुन.
श्रांत होइ कां तरु जरि लतिका अर्पितसे सुमन ?
सद्गुणमंजरि तुझी इंगितां मनिं येई शुचिता,
मंगल विदिशा उत्सुक होते वाट तुझी बघतां.

*　　*　　*　　*

शयनावरती पडतां जागृत गतस्मृती होती,
सुखस्वप्नांनीं पुलकित हो तनु निद्रेंतच रात्रीं.
अर्धजागृता असतां मी, विधु स्पर्शी किरणांनीं
गवाक्षांतुनी; गमे सुखविशी तूंच मृदु करांनीं !
स्वप्नामध्यें रात्र संपते, येइ निशा त्वरित,
मत्सरपूर्णा विघात करि ती डोळे मिचकवित.
येत नसे कां तुजला अजुनी दीनेची करुणा ?
हृदयकथारसपानिं तव सदा तृषिता मम रसना.
निशाच रुचते रम्यतरा सुखस्मृतीकल्पनांनीं
संगमिं होतिल रम्यतरा मग अखिल दिनरजनी.

रोषयुक्तमुख उषा, भानुही; साहूं दिन कैसे ?
सुधा धाडिसी काय दयाळा ! सदया ! इंदुमिषें ?
शशिकररज्जू धरुनि चढेनच, तुझ्याकडे ध्यान
खुशाल कोपें उषा चडफडो ! हाः सारें स्वप्न ! !

*　　*　　*　　*

नभोलेख हा पुसला येतां नयनिं अश्रुजाल !
उत्कंठायुत तोडि निराशा हृत्कंपनमाळ !

विविधज्ञान विस्तार ' विविध काव्यमाला ' जुलै १९२१ ( लेखन १९१९-१९२०)

---

## २९ बा पिका !

| | |
|---|---|
| बा पिका जरा स्थिर बैस, | मधुमास येइलच खास |
| गा मग तूं अपुलें गाणें | तन्मय कर मन tानेनें |
| समजोत ' काक ' तुज लोक, | न दिसो हि मनाची झांक |
| स्फूर्तिनें रचियलें काव्य | मनसरसिं लपवुनी ठेव |
| मधुगिरा सुखवि मम चित्ता | विपरीत म्हणें परि जनता |
| जाउनी धुळीला मिळणें | हें केवळ तत्व न अपुलें |
| स्वर उंच ठेव हृदयांत | मधुमासिं आण लोकांत |
| वाजवतिल टाळ्या तुजला | एकाग्रमनें त्वन्मतिला |
| हृदयांतिल ओव थांबेना | ठावे परि रूढी बघ ना ? |

परि नांव नको रूढीचें    बघु दे तिज खळगे खांचे
जा करीं येई मनिं तव तें    परि गाऊं नको या परतें
रंभण अनुभवितिल लतिका    एकजिवें घेतिल झोका
त्या समयिं उघडि निज वदन    तनुसार्थक त्या रिझवून !

१९१५

---

## ४० संक्रांत

वर मधुर स्वरांचीं गोड पुटें चढवावीं,
नव वस्त्र लेउनी हास्यमुखें अर्पावीं;
परि दुसऱ्या दिनिं जन मार्ग आक्रमी पहिला,
धात्वर्थ असो ! परि अर्थ न आतां उरला !
शर्करा खूप पेरावी वरिवरी,
निज वैररुप दडवावें अंतरीं,
ही लटकी नटवी प्रीती जगभरी,
रसनेस बोंचती शल्यें व्याजोक्तीचीं,
कुचकामी चंचल संक्रांत असे नित्याची.
क्षण मान मुरडुनी पाहिल जिकडे धरणी
हिमखंड वितळुनी दृश्य खुले कुसुमांनीं,
कटु शिशिर संपुनी वसंत मधु नांदेल,
परि वैर आमची पाठ कावें न सोडील

## संक्रांत

संक्रांत रूप सृष्टीचें बदलिते,
प्रतिवत्सर पुनरपि दावी कृत्य तें,
स्थित्यंतर चिरकालाचें कुठुनि तें
परि तेंहि असू दे ! आपण सृष्टीमागें !
हें ढोंग पुरे ! व्हा अज्ञानांतुनि जागे !
जगिं अज्ञानाची रात्र पुरी होवोनी
रवि शिक्षणकर-संजीवन दे सिंचोनी.
निस्वार्थ मातृकर सुनीति-शिक्षा-पटलें
शिशुमनांत चढवी, ( ध्येयाचीं वर शल्यें. )
देईल स्फुरण हा हलवा उद्यमीं
स्फुरवील बाहु वीरांचे रक्षणीं
भूषवील पूर्वज सारे भूषणीं,
ये पुरुषा पौरुष, स्त्रीत्व खरें महिलांत
त्या दिवशीं भारत सजीव, ती संक्रांत !

मुंबई ११–१–१९१६.
सहस्रकर १९१६
अभिनव काव्यमाला भाग ५

# ४१ पांवा

वाजिव सखया पुन्हां तुझा तो पांवा ऐकूं दे
पवित्र नादें दऱ्या दऱ्या ही नभ सारें भरुं दे
प्रीतिपालवी जोम धरोनी जगभर वाढोनी
मानव प्रकृती ऐक्य पावुं दे ! करिते आळवणी !
त्या तुझ्या सुरानें सुखमय होते धरा ! रे सख्या
अक्षय्य लागला ध्यास तयाचा मला ! रे सख्या
रात्रीच्या रात्री जागुनि मी काढिल्या ! रे सख्या
प्रशांत कालीं तरी येइना ऐकूं तव पांवा
कां कंटाळा करिसि असा रे ?—गातें मी धांवा.
हिरवें आसन तृणराजीचें त्यावरतीं बसुनी
वाट पहातें मधु पाव्याची, आली वनराणी.
अधीर झाली सृष्टी ही तव पाव्यासाठीं रे
वाट बघूं किति छळती बघ घे गार मला वारे !
प्रेमाची मूर्ती अखंड तूं प्रेमला ! रे सख्या
प्रेमाचीं गीतें गातचि दे दर्शना ! रे सख्या

.....................................

मनोदृश्य तें हृदयिं चितारुनि भावि सुखाशेचें
अंतःकरणीं गुणगुणतें स्वर मोहक पाव्याचे !

पुणें. २३–७–१९१६
उद्यान.

---

आहे अंबरिं शांतचित्त शशि हा प्रेमें पहा चालत
तेजाचे कण देत देत जगतां मंदानिलाच्या सह,
खेळे तूलवनासह प्रविरल प्रेमें लपंडाव ही,
तो पाहोनिहि मोद मेदिनि कशी हास्यासना जाहली !
इंदूलाहि बघूनि ही कुमुदिनी प्रेमें हंसे भूवरी,
स्वर्भूसंगम त्या क्षणींच घडला,—साम्राज्य तें प्रीतिचें;
विश्वाची कटु दूषणें विसरुनी रम्या लता मंगला
प्रेमालाप करीत याच समयीं नाथांसवें शोभल्या !
सारी सृष्टि अशीच शांत बनुनी हांसे विधूच्यासह,
पापी कृत्रिमताहि भीषणवती गेली कुठें लोपुनी !
ऐशा मंगलकालिं मीच बुडलें का शोकवापीमधें
नाथा ! काय म्हणूनि अंत बघतां ? घ्या प्रेमजालीं दृढ !
कोणाला जुईचीं फुलेंच रुचती, कोणास जोत्स्नाकर
कोणा तारकही, कुणासहि सुधा, कोणास गंगाजल
तें सारेंच परी कसें पडतसे मागें तुझ्या कांतिनें
व्हावा अक्षय लाभ त्वत्चरणिंचा ही एक इच्छा मम !
आतां स्वप्नसुखें सुरम्य तरि तीं ज्योत्स्नेमधें लाभु दे
प्रेमाची मृदु कल्पना सुललिता चित्तास ती भारित !
आहे चित्त परी कुठें मम इथें ?—तें पादपद्मीं तुझ्या !
सारें तें सुख दुःख काय म्हणुनी मातें कळावें तरी ?

तें कांहीं नुमजे ! भ्रमूनि दमलें ऐशा सुकाळीं गडे !
प्रेमाची मधुवृष्टि सिंचुनि तरि ही शांतवी व्याकुला.

पुणें. २५–७–१९१६

---

## ४३ हस्तीं घेउनि व्योम....

हस्तीं घेउनि व्योम लेख लिहिते ताराक्षरीं यामिनी.
साध्या जाति-सुमाक्षरीं सहृदया उद्यानदेवी लिही.
कासारीं जलदेवि पंकजिं लिही त्या प्रेमलेखाप्रति;
माझा लेख परी कसा तुज रुचे शंका अशी वाटली !

*  *  *  *

जेथें प्रेम वसें तिथेंच असतो अन्योन्य व्यापार हा,
सारें तुच्छ गणून, प्रेममय ती मूर्तीच चित्तीं ठसे !
आत्म्यांचें मधुमीलन प्रणयनें जेथें असें जाहलें
आहे कारण काय शंकित असें व्हायास माझ्या मना ?
'तूं स्फूर्ती मम नित्य' तूं म्हणुनियां गीतें मधू गाइलीं,
तीं येतां मनिं, सर्व पार विलया जातात शंका अतां !
आकाशांतिल तारका खुडुनियां तूं माळ जी गुंफिली,
उद्यानांतिल रम्य जातिकुसुमें वेणींत जीं घातलीं,
जें अंभोजहि प्रेमचिन्ह म्हणुनी हस्तीं धराया दिलें,
ही सारी बघतें पुनः पुनरपि होण्या मनः सान्त्वन !
नाहीं आयकिलें कधीं पिकरवा ! व्हावें कशालाच तें ?
माझा कोकिल तूं गडे परिसतें गाणीं तुझीं आज हीं !

ताना कोमल मंजुळाहि घुमती कानांत अद्यावधि,
टाकी भारुनि व्योम ! होइल जरी विश्रान्त, प्रत्यग्र त्या.
आहे मी जरि त्याच त्याच कवनीं नादें तुझ्या गुंगत
द्यावी एकतरीहि धाडुनि गडे ! ती तान नव्या तुझी

*　　*　　*　　*

प्रेमानें मम शब्द गोड करुनी घे याहि लेखांतले;
आहे काय अशक्य सृष्टिंत तुला ! मी मात्र वेडी-खुळी !

पुणें. २६–७–१९१६
उद्यान.

---

## ४४ गातच आलें मृत्यूचें गीत !

वहात होता मंद समीरण सायंतन मधुर,
परिमल पसरी नंदनवनिंचा अवनीवर सकल.
पर्णांचें अवगुंठन सारुनि कलिका तरुवरुनी,
लज्जाकम्पित डोलत होती अनिला पाहोनी
सृष्टीच्या इतिहासिं सुवर्णाक्षरीं लिहुनि ठेवी,
प्रेमदृश्य रवि,—कवीस रुचतें इतरां नच बाई !
रक्तपात रणिं राज्यक्रांती महत्त्व या येई,
सृष्टीचे मधु बोल मात्र ते विलयाला जाई
कधीं न मानव-सृष्टीसंगम जनतेला रुचला
सृष्टिदेवि हा काय म्हणोनी पक्षपात घडला !

हृदयंगम वच, दिव्य प्रीती जीस्तव मनिं ठसती,
त्या तुज स्तवुनी कवी गातसे, रुचे हीच रीती !
असो ! कवी तो लिहीत होता कलिका-वृत्तान्त
गायन कुणिसें गातहि होतें सतेज गगनांत;
त्या गानाचा सूर गुतला कविच्या चित्तासी,
कलिकेचें पावित्र्य गावया तार चढे मनसीं.
इतुक्यामध्यें रक्तबिंब पश्चिम दिग्भालींचें
हाय ! नष्टलें, शोकें झाले कपोल निष्प्रभसे !
उष्णशीत अश्रूंची युगपद्वृष्टी कमलांत
प्रणयगान तें गातच आलें मृत्यूचें गीत !

पुणें ७–८–१९१६ उद्यान. अभिनव काव्यमाला भाग ५, १९२२

---

## ४५ हिंदबाला

विश्वोद्यानीं बसली कोणी चिंतातुर रमणी
सूत्रें उकलित निसर्गतेची निश्चल दृष्टिंतुनी
अफाट सारा पडे पसारा दृष्टीभंवतालीं
'काय म्हणूं या ! होइल कैसें ?' चिंता तिज पडली !
हस्तीं होतीं सगळीं सूत्रें जगताचीं पूर्वीं
अधिकारानें बनली होती सुरम्य ही उर्वी.
करयुगुलांतिल माला नेली काळकरें हरुनी
भीषणरूपें विकट हास्य तद्वदनीं ये खुलुनी.

अबला होती तशीच चिंतित बसलेली तेथें
सात्विकवृत्ती धारण करुनी, जरि न कांहिं रुचतें
उद्यानांतिल पुष्पें तरुवर लतिका प्रीतिमयी
निसर्गसौख्यें भोगित होतीं रमणीसह त्या ही
कोणि न कोणामध्यें आणिलें वितुष्ट द्वेषानें
प्रेमग्रहणीं मृदुराज्ञीच्या वसती मोदानें.
काल परी हा खलतर आला, कोण न त्या नमतो ?
सत्वगुणानें तटस्थ बसणें हाच नियम होतो !
गगन रणांगाणिं सडा शिंपिला घनतर रुधिराचा
मदमत्तांचें युद्ध काय तें ? रक्तपात त्यांचा !
बाला झाली मनांत दुःखी; थांबिव हें देवा !
अखिल जगाला झाला दुःसह दारुण हा दावा !
पटपट बदलुनि रक्तरंग घन कृष्णवदन झाले
पश्चिम भागीं कलियुग चालें, जग मूर्च्छित पडलें.
पुष्पें तरुवर लतिका होत्या विव्हळत दुःखांनीं
रक्तबिंदुचा प्रभाव पसरे साऱ्या उद्यानीं.
तिमिरध्वंसक जगसंजीवन उदयोन्मुख किरणीं
आशा ठेवुनि प्राचिरवीची वाट बघे रमणी.

इस्लामपूर १०-१२-१९१६
प्रसिद्ध उद्यान.

---

## ४६ स्तोत्र !

आत्म्याच्या घटका ! कवीश्वर सख्या प्राणप्रिया.......
प्रेमें चिंतुनि गोड नाम तव मी जोडीतसे दो करा
जोडूं कां परि हात मान नमुनी नाहीं तुझी किंकरी
राहे मी तव लाडकी ‘ सहचरी ’ वेढोनि काया करीं !

काव्योद्यान-विहंगमा पसरुनी सत्प्रेम पंखें वरी
जाऊं ये चल गात गोड कवनें हुंगोनि पुष्पें नवीं
माझा गायक तूं, तुझें कवन मीं, मी स्फूर्ति, तूं राग हो
जीवां पूरक तूं तुझ्याच प्रणयें हें विश्व कीं रम्य हो !

अस्तां जाउनि चंड भानु रजनी रम्या असे पातली
मीही शांतमनें अतां करितसें निद्रेस आराधना
नाहीं मन्निकटीं परी दिससि तूं प्रेमप्रकाशें मला
अर्पी मानसपूजना तरि गडे घ्या गोड तें मानुनी !

मी तारा गगनीं प्रकाशत असे, अदृश्य तूं चंद्रमा
आत्मे दिव्य उदात्त थोर ठसली माझ्या मनीं भावना
कांतामुग्धमुखारविंदमधुपा वेणूधरा चाटुला
स्फूर्तीनें कवनें रचीत बसुंया मोदांत भूमीवरी !

प्रेमें हृत्फलकीं स्मृती सुप्रतिमा मोदाश्रुनीं कोरते
प्रेमें चुंबिन न्हाणुनी तिज अतां झांकोनिया लोचन
स्वप्नें सारखि गोड आज पडुं दे, भेटेन स्वप्नीं तुला
प्रेमें मारित हांक ‘ × × × ’ गडे ! गालांत हांसेन मी !

गावोनी तव स्तोत्र अल्प निजतें उत्कंठ त्वदर्शना
देतें प्राण तसें तुला हृदय हें तूं ठेव संभाळूनी
' तूं-मी ' भेद नसे अतां मग कुणा हें स्तोत्र गाऊं तरी
देवा....! स्तोत्र गात निजते '....' तुझी देवता !

पुणें सप्टेंबर १९१६

---

## ४७ डोहाळे

डोहाळे जनकसुतेचे पुरवीले श्रीरघुरायें
तैसेच रुक्मिणीसतिचे तोषविले यदुकुलरायें
मग तृप्त-दोहदिनिं महिला प्रसवती धीरवीरांना
विद्वान राष्ट्रपुरुषांना विदित हें आर्यवनितांना
ते भविष्यसूचक चाळे
पाहुनीं तुझे डोहाळे
पुरविण्यास सगळे जमले
मृगवर्षास्नान करोनी मंगलमय आली धरणी
बोल हं ! बोल झडकरि ग ! घे दोहद पूर्ण करोनीं ! १

या समयिं हिंदभूमीची दिसते मज चढति कमान
कीं सुपुत्र-सूचक सुचवी दोहद निःसंशय जाण
मित-भोजन-भाषण सुचवी अंतरंग सुतमनिंचें तें
' हा काल नसे वाणीचा, कार्याचा ' हें सुचवीतें

ती वीर-लवांकुश-माता
प्रद्युम्न-पित्याची कांता
जी प्रसवी शिव भू-त्राता
तुज वीरजननि देवो त्या आशीर्वच मंगल शिरसीं ! २
भारतभूकंठमणी तो भूषण जो कुलजगतासी
उदरस्थ पुत्रशुक्रेंदु प्रेरणा करी वांछांनीं
बोल हं ! बोल झडकरि ग ! घे दोहद पूर्ण करोनी ॥

इसलामपूर ११-६-१९१७

---

## ४८ मुरलीस्वन

मन होई वेडें, ऐकुनि कानीं, मुरलीस्वना तव मोहना
तार मनाची जुळतां गानीं
झरझर अश्रू वाहोनी
अंतःकरणा पिळवटुनी
मी तर देवा ! चुकलीमुकली, छळती मना मृदु भावना १
दंगल चाले देशोदेशीं
पटल धुराचें आकाशीं
भूवर खचल्या शवराशी
प्रशांत चित्तें ऐके एकच मुरलीस्वना तव मोहना ! २
मर्त्य देह हा, नरक भोंवती
पशू खेंचती आशा खालति

प्रेमकर तुझा बाहे वरती
रज्जू धरुनी चढण्या बघतें मुरलीस्वना तव मोहना ! ३

पुणें १८-१-१९१८ रविकिरणमंडळ, शलाका, ९-९-१९२५

---

## ४९ कवितादेवीस

रुसलीस कशी मजवरती ? तव कृपा संपुनी गेली ?
रागावुन गेलिस दूर ? कायमची गट्टी तुटली ?
येसी न पुन्हा कधिं काळीं ? दीना मीं मनिं हिरमुसली.
दिन किती होऊनी गेले
तव दर्शन नाहीं घडलें
सेवेस तुझ्या अंतरलें
लागून राहिला चटका। लागेना विषयीं गोडी !

श्रीज्ञानेश्वर तुकयाशीं। मुक्तेश्वर श्रीधर कविशीं
केशवसुत कविराजाशीं। रामाशीं बालकवीशीं
गुजगोष्टी करण्या रमली। बोलेल कुठोनी मजसी ?
मी आहें केवळ दुबळी
पारखी गुणांना असली
शरण ही तुला परि आली
हृत्पुष्प अर्पिलें तुजला। निर्माल्य तरी दे मजला !

१९१८

---

## ५० प्रेमकलहांतरितेचें पत्र

प्रेमाची कलिका अकालिं गळली ! हें काय झालें बरें !!
नाहीं हें उपमान योग्य ठरलें !—त्वत्प्रेम संपे कधीं !!
वेडी मी ! परि काय हें बरळतें ! हें ऐकिलें कां कधीं
कीं व्योमामधली अशेष सहसा आटोनि गेली नदी !
देहातीतपणें यथेच्छ विहरूं कोणी म्हणूं लागली
ती हास्यार्ह ! समान सर्व गणिते विश्वीं स्वयें स्वर्धुनी
एकादीसच बुद्धिवैभवबलें लाभे सुख प्रीतिचें
मी तों एक अबुद्ध क्षुद्र अबला !—आशा कशाला तरी ?
धर्मी पापच आत्मघात गणिलें !—नाहीं दुजें पुण्यही
जन्मीं आचरलें ! करूं मग कशी मी घोर तें साहस !
चित्तातें परि हा विचार न पटे एका क्षणानंतर !
प्रेमाच्या प्रतिनादिं कर्ण बहिरे !—राहूं कशाला तरी ?
विश्वप्रीतिकरा ! सुमंजुल कवे ! सौंदर्यप्राप्ती रुचे
इच्छा एकच—सत्वरी मज अतां मृत्युंगता होउं दे !

पुणें, १९१८
रविकिरणमंडळ, उषा, १९२४

# ५१ अभीष्ट चिंतन

( प्रो. धोंडो केशव कर्वे )

अभिमता गुरो तुज प्रणाम भावें करितों
या मंगल समयीं अभीष्टचिंतन करितों.
ही महिलासृष्टी झोंपीं गेली होती
संस्कृती पूर्विच्या पूर्ण विसरली होती
जें परावलंबन पुरुषां हतबल करितें
त्यानेंहि अम्हांला पूर्ण ग्रासिलें होतें.
परि मनू पालटे पूर्ण जागृती येतां
उत्साह संचरे स्वत्व अंतरीं स्फुरतां
परमोच्च शिखर ध्येयाचें सोज्ज्वल
गांठण्यास भारत उचले पाउल
परि स्मृती आमुची तुला, अम्हां बाहोनी
देउनी ज्ञानकर घेसी वर उचलोनी !
इतिहास हिंदवी वीरमणीसमवेत
स्त्रीरत्नयशेंही असे पूर्ण तो युक्त
त्या वीरप्रसू त्या विदुषी गृहिणी कुशला
त्या दिव्य स्त्रियांच्या वंशज भारतमहिला
ही स्फूर्ती दृष्टी दिव्य ज्ञान देवोनी
तूं केली भारत-भूमी पूर्ण अंगांनीं
स्त्री पुरुष समबल कार्यीं गुंततां
त्या क्षणीं येइ सिद्धीची पात्रता

तूं पूर्ण यशाची दिधली भागेदारी
उपकार तुझे हे, आस्था तव ही सारी !
अतिकृतज्ञतेनें मूक जाहली वाणी
हा दुःखमुक्त जन पाय अश्रुंनीं न्हाणी
तव परंपरा ती पुढतीं चालविण्याला
दृढनिश्चय करिती मनांत साऱ्या महिला
तव ज्ञानजलाचें आतुर प्राशन करुनी
या सिद्ध कन्यका कार्यीं क्षम होवोनी
निजदेह झिजविला कार्यीं, कष्टला
उद्धारक दीनजनांचा जाहला
तुज दीर्घ—आयुरारोग्य—सौख्य वितरावें
ही एक प्रार्थना ईशा भक्तीभावें.

पुणें, १८–४–१९१८.
ज्ञानप्रकाश.

---

## ५२ रम्य भुवन

पुष्पें अनंत फुलतात वनप्रदेशीं
नीलांबरीं विलसती उडुरत्नमाला
सायंतनीं सुरुचिरा शरदभ्रशोभा,
नेत्रोत्सवाब्धिसुषमाहि तरंगलीला !
ज्योत्स्ना नितांतसुखदा सकलेंद्रियांस
आल्हाददायक वनीं मृदु गंधवाह.

सौंदर्यसारहि तसेंच सुरेंद्रचाप,
डोले लता तरुतती नव नर्तनांत.
बालारुणद्युति उषःसमयीं विराजे,
प्रेमें करी विहगवृंद सुमंजुगान
साजे दवांबु कमलीं, कमलें तडागीं
सारेंच रम्य खचलें भुवनांत भासे.

पुणें. १९२०
अभिनव काव्यमाला, भाग ५. १९२२

---

## २ उषा

रंग बहारीचा उषेच्या सस्मित गालाचा
पडद्या आडून निरीक्षी नाथाचें वदन
पटपट बदलोनी मनाचे भाव येति वदनीं
राजाची स्वारी रथासह पृथ्वीवर आली
राही दडलेली कांता उषा कां न आली?
सुकुमारी बाला लाजली पुढें यावयाला
तुझेंच वैभव हें प्राप्त तरि कोणाला आहे?
नवरसगीतांनीं वर्णिती भाग्यवंत कवनीं
मोत्यांची माळ अर्पिली तरुंनीं तेजाळ
कर्णमधुर गानें गाइलीं विहंगवृंदानें

पुष्पांचें लेणें    लतांनीं दिधलें भक्तीनें
अपापल्या परिनें    जो तो गातो प्रेमानें
'शकुनाची वेळ    असे ही, सुभाग्य उधळील'
असेंच मज गमतें    पूर्वींची उषा सुभग येते.

पुणें, १९२०
ज्ञानप्रकाश

---

## ५४ भिकारीण

भिकारिण झालें ।    तुजपुढें हात पसरीले
अखिल जगाला ये कंटाळा.
शाप शेंकडों येति कपाळा
मारुनि हकलुनि देती मजला
अशा या काळीं ।    तुजकडे भिकारिण आली.
तूं प्रेमाचें, सदयत्वाचें,
उदारतेचें, विद्वत्तेचें,
दातृत्वाचें, नैतिकतेचें,
अससि माहेर ।    चिंता मम होईल दूर.
वस्त्राभरणीं देह नटावा
वसतिस्थाना हर्म्य असावा

वाहनांत आराम मिळावा–
नसे मुळिं वांछा । तव कृपा हीच मम इच्छा !

*　　*　　*

सार्थक झालें मम जन्माचें
उदार भिक्षा लाभायाचें
भाग्य उघडलें, सहर्ष नाचे–
मन्मन आतां । भलभलतें भकुं दे जनता !

पुणें, १९२०
रविकिरणमंडळ, उषा, १९२४

---

## ५५ गोड मूल

कशी गोड ही हांसतसे　पाहुनि मम मन गुंगतसे
रडणें मुळिं ठाउक नाहीं　खेळायाची नित वाई
खाऊ बाऊ सब झूट　आनंदाची लयलूट
खळी कपोलीं–तेज लोचनीं–बघत हर्षुनी
उचलणार कोणाहि नाहीं　तुज करण्या कौतुक वाई !
ठेवा हा आनंदाचा　मृदुल उच्चतम प्रेमाचा
देवाचें वसतिस्थान　ब्रह्मपदाचा सोपान
सौंदर्याची ही मूर्ती　गंधर्वांची ही स्फूर्ती
राग उषेनें, प्रभा रवीनें, सुधा शशीनें
हिजपासुनि नेलें थोडें　प्रेमें केलें जग वेडें !

पुणें, १९२०

---

## ५६ सुधा व फूल

कुसुमें आवडतीं भारीं
पाहुनि नाचे वायुपरी
धांवत वेण्याला जाई
सुधेस आवरुं किति बाई !
—कारण कां पण या कांहीं
नहा सुधे तूं पुष्पांहीं !
पुष्पसंगमीं हो दंग
करूं कशाला तव भंग ?
परि त्यांचें करशिल काय
चुरगळुनी हें बघ जाय !
परि तें हंसतें अजुनि कसें ?
त्वन्निकटीं सुख सेवितसे
मोक्ष लाभला तव हातीं
तिथेंच प्रभुजीची वसती
जगभर दरवळला गंध
कीर्ति हाच त्या आनंद
—खेळुं नको हा खेळ परी
मंदानिलसम कृती करी
मातेच्या अंकावरतीं
सुखें नाचुं दे पुष्पें तीं

अग ! नकोशी फुलें कशीं
बिलगतेस कां मला अशी ?

पुणें. १७ आक्टोबर १९२०

## ५७—छबुडी

‘ छबुडी माझी राजस बाळी सोनी ही छकुली ’
यांतच साऱ्या उपमा घे तुज, सरस्वती थकली.
तानसेन सृष्टीचा कुठचा गीत तुला गाई
तूंच तुझी तुज गाणीं गावीं ! कसले हे गवई !
झोप तुला कां येईना ग ? हवें काय बाई !
चाळे चाळा तरि मी वेडी म्हणतें अंगाई !

पुणें, १९२०.

## ५८ झोंपेंत हंसणाऱ्या सुधेसः—

तुज काय वाटलें काय स्वप्न तुज पडलें ?
झोंपेंत हांससी ! मोह पडे मज बाळे !
जागृतींत चाळे अमित करुनि हांसविसी
निद्रेंत म्हणुनि कां देव हांसवी तुजसी ?
तूं सकल जनांची होसी, लाडकी
तुज बघुनि नाचती पुष्पें, सारखीं

स्थिरविसी तारका व्योमीं, कौतुकीं
हृदयांत करुनिया प्रवेश सृष्टीमाता
गुद्गुल्या करितसे काय सुधे तुज आतां ?
या तुझ्या स्मितानें हृदय स्निग्धतर बनतें
जडमूढ चकित मन मोदें पुलकित होतें
पतिपुण्य संचयें लाभ अशीचा झाला
पापिणीवरी हा कृपादृष्टि घन वळला
उपमान तुला विश्वीं ना गवसतें
संबोधनिं केवळ तुझिया तृप्ततें
मम शरीर आत्म्या ! तुज हें समजतें
स्मित मुखास बघुनी विलोभुनी मन जाई
तव प्रेमसमाधी भंगत तरि मी नाहीं.

पुणें, १९२०

## ५९ माझीं फुलें

उपवनीं फुलें विस्कळलीं वेंचुनी घराला नेलीं
कुंपणावरी ही चढुनी वळचणीमधें पडलेलीं
पोरक्यासारखी दिसलीं, तीं सर्व सिंचुनी आणिलीं,
ज्या जगिं न विचारी कोणी
तुडविती प्रतिष्ठित चरणीं,
मर्मभेदि कटु वाक्यांनीं,
त्या असल्या गरिब फुलांच्या तुमच्यास्तव केल्या माळा.

प्रीतीच्या परमेशाला हृत्सरोराजहंसाला
आळवितें भक्तीभावें करिं घेउनि या फुलमाळा
मृदु गंध जिचा दरवळुनी भेदुनिया जाइ नभाला
स्वीकार तिचा करणारे
सर्वस्व उलट देणारे
येवोत शांति देणारे
आशा ही दृढतर धरुनी लोटिते युगासम दिवस.
ही रीत न कोणा रुचते आवडो न ती कोणाला
हेटाळुनि टाको मजला निंद्या मज मानो महिला
हृदयाच्या प्रेमळ अधिपा लाभो तव प्रीतीझेला
—ही एकच इच्छा मनिंची
मूलभूत प्रतिवांछेची
क्षिती मुळीं न मज लोकांची
गहजबाची न मज परवा त्वच्चरणशरण्यचि आतां
सौंदर्यहीन मम रूप उज्ज्वलता परि प्रेमाची
सद्गुणां पारखी वृत्ती सरलता परि प्रेमाची
जडबुद्धी काव्यविहीना प्रखरता परि प्रेमाची
जें न्यून, भरा प्रेमानें
बाष्पांध भावदृष्टीनें
प्रार्थितें रुद्ध वाणीनें
चिरकाल असें दासीचें राहू दे प्रेम-सुभाग्य !

२२-१-१९२१

## ६० वंचना

आहे येथ सुधा सुषुप्तिवश ही, निद्रिस्त सारे जन
व्योमीं तेथ सुधाकर स्रवतसे धारा सुधेच्या मृदू ,
कासारीं उठती तरंग मृदुल, स्वांतीं समाधानता,
राही कां चिकटोनि खोल परि मच्चित्तीं उदासीनता ?
जातें गुंतुनिया दिनीं मन जरी हें कामकाजामध्यें
येतां रात्र परी उजाड सगळें ओसाड भासे जग;
सौख्याचे क्षण आठवून अपुले मागील कालांतले
होतें आतुर दर्शनास अपुल्या; संमूढ चित्त भ्रमे.
नांवा पुस्तक घेउनी कशितरी वाचावया लागतें,
नेत्रें वाचित तेंच तेंच फिरुनी भावार्थ ध्यानीं न ये;
जों निद्रामिष आणुनी पहुडतें पोटीं सुधा घेउनी
तों ' नाना ' वदुनी मला बिलगली झोपेंमध्यें बालिका.
आहे दुःसह हा वियोग सहणें साहीन कैशीतरी
मुग्धाव्याज सुधेस कां परि अशी द्यावी मनोवंचना !

इसलामपूर.
२१ जानेवारी १९२१

रविकिरण मंडळ, ' किरण ' १९२३. अभिनव काव्य-माला, भाग ५, १९२२

---

## ६१ लपलेली इच्छा

सेवाया मिळणें तव गानमाधुरी
लपलेली इच्छा ही चित्तिं अजवरी !
मुखस्तंभ बनलासी ! – काय करुं तरी ? १

कांहिं काल गाउनि कां स्तब्ध बैससी
हृदयाची हुरहुर तव दिसे न शांतशी
गानजलें शांत करी मन अतां तरी ! २

गानाशा दाविलि मी, वृक्ष-वल्लिकां
डुलति मुदें श्रवुनि घेति पुष्पबालकां
गिरिनिर्झर गगन वसे मुदित अंतरीं ! ३

वाणींतुनि ओत सुधा, सृष्टि नाहुं दे
रम्य प्रेम-काव्योदधिमाजि पोहुं दे
अंतःसृष्टींत घुमव लहरि झडकरी ! ! ४

पुणें, ५–७–१९२१

---

## ६२ रूपमोहना

निघे जिंकण्या जग तोऱ्यानें कटाक्षपातानें
ध्वज-पल्लव तो फडफड करितो विजयोन्मादानें.
विशाल चंचल निळ्या लोचनीं लाजविल्या हरिणी
कुंदकळ्या मनिं झुरूं लागल्या रदनां देखोनी.

## श्री-मनोरमा

गुलाब झाले अति हिरमुसले बघुनि कपोलांस,
मिटल्या ओष्ठां बघुनि कोप ये गुलाबकलिकेस.
सौंदर्याचें क्रीडाप्रांगण रम्य निटिल भाग,
स्नेहहीन केशांत अडविले युवजन-अनुराग.
चाफेकळिला रडत बसविलें सरळ नासिकेनें,
चंद्रकोर दडि देउनि बसविली त्या भ्रुभंगानें.

*　　*　　*　　*

रूपमोहने ! पसरुनि अद्भुत जादू नयनांची
कोमलचित्तें वांधुनि आणिसि चरणीं तरुणांचीं.
ओंवाळुनि टाकिती किती हे जीव तुझ्यावरुन
आशा इच्छा अर्पिति तुजला देवी समजून.
उन्मन कवि ते रचुनी कवनें साहित्यें पुजिती,
सहवासेच्छू मनांत कोणी विरहानें झुरती,
तुझी अनन्या रती लाधण्या कितीक तरि झटती
भग्नहृदय परि करुनी अंतकपथ दाविसि अंतीं.
जनदृष्टीला दिससि मनोरम काम्यरूपमाया
असा कोण परि जगीं असे जो जाणी तव हृदया ?
रंगी नटते जनमन हरते नटी अभिनयांनीं !
अशीच व्हावी कीर्ति तुझी कां वद लाजिरवाणी ?

पुणें, १२–९–१९२१
प्रसिद्ध अभिनव काव्यमाला भाग ५.

---

## ६३ सौंदर्यें नटल्या दिशा—

सौंदर्यें नटल्या दिशा सकळही, आकाश ज्योत्स्नायशें,
चाले हांसत हांसवीत जगता प्रेमापकर्षें शशी,
जाती एकवटूनि विश्वहृदयीं निष्पाप सद्भावना,
गुंगोनी मनिं आठवी प्रणयिनी प्रेमाचिया भाषणा,
विष्णू पाठवि शीतरश्मिस नभीं क्षीरोदधी निर्मल,
दुग्धाची करि पौर्णिमा विधु अजी खैरात पृथ्वीवर.
रम्यालोक जगास ! काय परि तें होई मला ! दुःसह !
लागे आग जगास आज गमतें, नाहीं कुठें शीतल
जाई होरपळून जीव सहसा विश्लेषधारेवर,
ज्या ज्या उद्भवती विकार लहरी तैशाच जाती लया.
भाग्याची असतील त्यांस रुचते शोभा निसर्गांतली,
दुर्दैव्यास, मनांतल्यासम तमीं, लोपूं गमे केवळ !

१७–१०–२१.
ज्ञानप्रकाश–काव्यशास्त्रविनोद ६–१–२४.
रविकिरणमंडळ–उषा. १९२४.

---

## ६४ गाई आल्या परत

गाई आल्या परत घराला दिनमणि अस्तां गेला
आकाशांतुनि थव्याथव्यांनीं जाई वायस-माला.
फडफड करतें वटवाघुळहि भयाण वृक्षावरतीं
खेळ बंद करुनीहि बालकें स्वगृहीं परतत होतीं.

युवयुवतीगण हवा खाउनी गृहमार्गाला लागे
आजीबाई पुराण ऐकुनि गप्पांनीं ही भागे !
पवन गंधहर बगीचांतला उत्कंठित करि चित्त
तरी नयन मम पुढील दारावरती खिळुनि रहात
कांहि वाजतां खुट् कुठुनीही वाटे सायकल आली !
किति वेळां तरि अशा तऱ्हेनें पुरी फसवणुक झाली !
भरभर जाउनि फुलें वेंचलीं येणें झालें म्हणुनी
गुलाब जाई मधुमालति मृदु यांचा गुच्छ करोनी
फुलदाणित ठेवून चहाची तयारि केली सारी
माडीवर जाण्यास निघालें,—कुलुप दिसलें दारीं.
ज्यांच्यासाठीं फुलें वेंचलीं दूर श्रम करण्याला
कधींच गेले आर्यपुत्र ते दूर श्रम करण्याला.
श्रम ओसरुनी आठवलें तें, खेद भरे चित्तांत
क्षणभर आनंदाचा शेवट होई नैराश्यांत !
चोळा मोळा करुनि, वाटलें, फुलें फेंकुनी द्यावीं
उद्वेगाला पाट काढुनी द्यावा नयनाकरवीं
फिरुनि वाटलें पुष्प-नाशनीं अभागिनीला काय !
पुष्पांची स्थिति मजसम पाहुनि गहिवरलें मम हृदय !
हृदयिं पुजावें प्रेमाश्रूनीं हृद्य मनोमूर्तीतें
भाग्याच्या दिवसाची पाहत वाट, युगें क्रमितें.

पुणें. १७–१०–१९२१.

## ६५ पदसेवा

वसति ठायिं तव गुण परिसाचे लोहचुंबकाचे,
हर्ष पावती तुझ्या संगतीं जन ते भाग्याचे.
नकली नाणें असे न तरि कां आकर्षित होतें ?
लोह म्हणूं तरि कांचन कां नच संस्पर्शें बनतें ?
पदरीं पडलें पवित्र झालें कटाक्षजलसेकें
तार मार वा हृदय तुझें हें मागतसें इतुकें !
कुठची दानत ! कोण कशी मी कसच्या मोलाची ?
कां नच केली पुरी चौकशी अजाण बुद्धीची !
तरी अशीला अंगिकारिली सदया प्रेमानें,
गाऊं कुठवर महिमा वदनें ! मनीं मूक गाणें !
उपमातीता ! उपमाभूषण तुजला उपमर्द
मनःपूजनीं एक मागणें ‘ ठेव सुसौहार्द ’
तव हृदयाची राणी होणें कशास बहुमान
क्षुद्र भावनावश दासीला लाभो तव चरण
गुलामगिरी ही गोड सुखाची करण्या पदसेवा,
पतकरण्याची हिला मुभा दे, स्वर्ग निकट यावा !
प्रीतीच्या राज्यांत कायदे कसे कुठें न कळे
होय गुन्हा तरि पदच्युता करुं नको तया वेळे !
पदसंवाहनिं मुखरविवीक्षणिं साहस जर घडलें
बालरविप्रभ सौख्य हो गडे मजप्रत त्या वेळे !

पुणें, १८-१०-१९२१ अभिनव काव्यमाला, भाग ५. १९२२

## ६ अनुताप

जेधवां करिसि तूं मजसह वादविवाद
मम वृत्ति वळतसे करण्या तव अनुवाद.
मीपणा लोपतो, दुर्बलता मन वरतें;
तुज विरोध करण्या मनांतही नच येतें !
मृदु भाषणौघिं वाहोनी जातसें
स्वत्वास विसरुनी मागें येतसें
बोलशील त्याला माना तुकवितें
जादूचें जाळें पसरुनि माझ्यावरती
कां असा गाजविसी प्रभाव अबलेवरती !
अनुताप देतसे स्मृति आतां तेव्हांची
कां धनीण नव्हतें तेव्हां मम हृदयाची ?
मम चित्तवृत्तिचीं रम्य फुलें जीं फुलतीं
कां मीच टाकिलीं चुरगाळुनि तव हातीं !
आतां न होउं देणार मी असें
निर्धार मनीं फिरफिरुनी करितसें
जीवास कष्ट परि फार होतसे
डोळ्यांनीं देखिल बोलुं नको माझ्याशीं
मज विचार करूं दे स्वतंत्र मम हृदयाशीं !

पुणें २४-१०-२१.
अभिनव काव्य माला, भाग ५.

---

## ६७ दुरून—

आनंदी फुलपाखरूं झुकतसे निर्बंध बागेमध्यें
धांवे बागडतां सलील चिमणी गुंगे मनाशीं जशी
तैशी बागडशी मुली ! बहुपरी पर्वा जगाची नसे
सौंदर्यें भरल्या जगांतहि गडे ! नाविन्य, वाटें, तुझें
जें जें निर्मल सच्चरित्र जागीं, तें कां आचराया भय ?
'कोणी देतिल दूषणें' नच शिवे चिंता तुझ्या मानसा
दृष्टी कौतुकपूर्ण चौकस तुझी बुद्धि स्थिरावें जिथें
जेथें कोमल सुंदरत्व दिसतें सद्भाव पावे जय !
मूर्ती मोहक गोजिरी चिमुकली उल्हासवीते जडा
नादें गुंगत भिंगरी रिझविते आबालवृद्धां जशी
पाहोनी तव गोड बालसरल स्वाभाविक क्रीडन
होते उत्सुकता अनावर तुझें गे घ्यावया चुंबन
निश्वासें करपून टाकशिल ना ? हे पापिणी ! स्पर्शनीं—
घेतें त्वत्तनु सांठवून दुरुनी चित्तांत नेत्रांतुनी.

पुणें. १९२२.
रविकिरणमंडळ 'शलाका' ९-९-१९२५.

## ६८ पुष्पास

माझा जीव फुले तुलाच बघुनी, तैसेंच त्या कारण
नेत्रा केवळ तोषदायि न मना, साऱ्यांत तूं भूषण.
साक्षीदार म्हणूनि होसि पहिल्या भेटीस तूं आमुच्या,
विश्वाची सुषमा तुझ्यांत, गमते ! देसी स्मृती पूर्विंच्या.

पुष्पा ! पावन जाहलेंसि मृदुल स्पर्शें तयांच्या सदा
कालावात न मानुनी वरियली प्रत्यग्रता तूं सदा.
आलापें नव प्रेमराग कथिसी बेभान वृत्ति बने
त्या वृत्तींत समाधिमाजि जगणें—आयुष्य हें भोगणें

८-३-१९२२.
रविकिरण मंडळ—उषा. १९२४.

---

## ६९ एकाच शब्दासाठीं ! !

जीवितेश्वरा ! बोलणें जरा
काय आगळीक होइ जोडितें करां !
मौन सेविशी, कां दिनीं निशीं ?
अनुभवासि वागणूक येइ कां अशी ?
प्रीतिसुंदरा ! चारु तव गिरा
ऐकण्यास जीव गडे होइ बावरा !
कुठुनि वृष्टि ती ! नाहिं हांव ती
अणुभरीच—भाग्य हेंच—तीच सद्गती !
एक केवळ, शब्द कोमल
रुक्ष हृदयिं ओत खोल प्रीत सोज्वल !
जीव यास्तव, दिव्य पदिं तव
कधिंच अर्पिला न परी प्राप्त वैभव !
व्यर्थ भासला, काळ हा मला
भावि कठिण ! कंठण्यास धीर कोठला !

तव मनोहर, वचन मधुतर
गीत-पुष्प-लहरि-गंध सारितें दुर !
हृदय दुर्दम, झुरणि कायम
लागलीच समज ! हाय ! अंति उपशम !!!

इसलामपूर. ९–३–३२.
रविकिरणमंडळ ' किरण ' ९ सप्टेंबर १९२३.

---

## ७० फुलें उधळलीं !

मी तूज पौरगणिं पाहुनि नित्य येतें
कैसें परी मन तुला समजून येतें !
तूंतें बघून ठसवून मनांत घेणें
एकांतिं चिंतन सुखें कृति हीच जाणें !
सानंद पौरजन उल्हसितांतरानें
उद्घोषतात जयसूचक आरवानें
ते गेंदबाज गजरे नव पुष्पमाळा
चित्तांतला नगरच्या सुचवी उमाळा !
पंचारती तुजवरूनहि भाग्यवंती
ओवाळिती स्मितमुखी रमणी सुकांती.
सत्कार घेसि हंसुनी अतिमंद त्यांचे
प्रस्थापिती अभिनिवेश तुझ्यापुढें जे.

बालें तुझ्या चरणिं नम्र शिरें करीती
चित्तप्रसक्त अनुराग दिसून येती.

.......................

मी मात्र पाहुनि तुला दुरुनीच घेतें
इच्छा मनांतिल मनांत दडूं पहाते
ते उंच उंच तरु छत्र तुला धरीती
वर्षावि वल्लि विविधा सुमनें करीती
वायू सुगंधयुत चामर ढाळतात
त्वत्स्तोत्र-गायन करी खग जेविं भाट.
सारे चराचर जगत् त्वदधीन झालें
सेवा यथाक्षम तुझी करूं सर्व आले
आनंदिं त्या मिसळणें मज शक्य नाहीं
गूढस्थिता हृदयपूजन मात्र देई.
स्वीकार वा न, मजला किमपी न खेद
हास्योल्लसत्वदनदर्शन हाच मोद !

* * * *

अंगावरी उधळिलीं कुसुमें जगांनीं
जीवास मोहन, तयांतिल या म्हणोनी
त्वत्स्पर्शपावनसुमास अलक्ष्यमाणा
आणी तदा द्रुतगती फुललें जरी ना !
अद्यावधी जपुनि ठेवियलें तवार्थ
होतें अतां तुजवरी स्त्रजुनी कृतार्थ

नाहीं कृती समजली जरि तूज माझी
राहील ही परि मला स्मृति नित्य ताजी !

पुणें ५–७–१९२२

---

## ७१ फुलें उधळलीं !

तुम्हीं मला ओळखत नाहीं पण मी तुम्हाला ओळखतें. प्रजेनें राजास ओळखावें; पौरजन आपला उल्हसित अंत:करणानें जयजयकार करतात, झुबकेदार पुष्पहार घालितात, भाग्यशालिनी स्त्रिया जयमोदसूचक पंचारती ओवाळतात, बालक आपलीं मस्तकें त्वदाशीर्वचनापेक्षेनें त्वच्चरणधूलीलग्न करतात, वायू तुझ्यावर चामरें ढाळतो, उंच वृक्ष छत्र धरितात, मार्गलता पुष्पें ढाळतात ! आणखी कितीतरी जण तुझ्यावरील प्रेमानंद व्यक्त करण्यांत गर्क असतात !

मागें अशाच प्रसंगीं तुझ्या अंगावर फेकलेल्या पुष्पवृष्टींतलें रस्त्यांत पडलेलें हें एक बकुळीचें फूल मी जिवाभावानें जपून ठेवलें होतें, तें मी आतां तुझ्यावर फेंकतें. माझें हें कृत्य कोणी पहाणार नाहीं ना ? फूल तुझ्या अंगावर पडलेलें तुला कळणारही नाहीं, पण निदान तुझा स्पर्श तरी त्यास घडूं दे. लोकांची गर्दी गेल्यावर मी तें उचलून घेऊन पुन्हां पूर्ववत् पेटींत घालून ठेवीन. खिडकीआडून सर्वांच्या मागें उभी राहून तुझें रूप हृदयांत साठवूं दे. मग माझें बकुलपुष्प आहेच. एकांतांतील स्निग्ध अश्रूंनीं त्यास नित्य ताजें ठेवीन.

पुणें. ५–७–१९२२ [ गद्यकाव्य ]

---

## ७२ भूवरील स्वर्ग

हृदयीं फुलला बाग प्रीतिचा, नयनीं ताराद्युती,
कल्पतरुसाम्य येइ मनगटीं.
शब्द मधुर ते करिती साक्षात् स्वर्गसुधासिंचन
आणिती मनिं किन्नरगायन,
स्वरूप-लावण्यास देखतां अहंभाव हा गळे,
तुच्छ मज नंदनवन तुजमुळें.
स्वर्ग हा शब्द मज वाटेना मोहक,
त्वद्दूषित वसुधा होई आकर्षक,
त्वद्दर्शन वाटे पवित्र तीर्थोदक,
वाटे झाली जीवसफलता उरे न जागिं वासना;
जहाली जयशाली भावना !
मिळे जिवाला मृत्यूनंतर निश्चित नाहीं परी
स्वर्गसुख येतें चालुनि घरीं;
सुखसोहाळे प्रियसहवासीं झिडकारुनि घावया
न उत्सुक मुक्ती साधावया;
प्रीत प्रियाची अढळ साधणें हेंच ध्येय बाणलें
प्राण मम इथेंच हें गुंतलें;
आयुष्य–समाप्ति जर होणें लौकर
निष्प्रेम करी मन त्यांचें देवा ! तर
निष्ठुरता पावो मजविषयीं अंतर

तरीच देवा ! मृत्यु हवासा स्वर्गहि तेव्हां नको;
तोंवरी भाषा असली नको !

पुणें ६–७–१९२२
रविकिरणमंडळ, 'किरण' १९ सप्टेंबर १९२३.



## ७३ चार अश्रू !

होते चंपक मोगरा उपवनीं प्राजक्त ते सुंदर
सौगंधें कमनीय मोहक मृदू वायूसवें डोलले
आकांक्षा महनीय—नित्य हंसुनी रात्री प्रकाशें भरूं
पावित्र्यें निज सौरभीं धरणिला विख्यात विश्वीं करूं.
वासंती नव पालवी, डंवरले घोसांत पुष्पांकुर
अर्धा रंग भरे न तोंच उठुनी डावांतुनी चालले ! !
लागे कीड मुळीं, सपर्ण निजला प्राजक्त भूमीवर;
झालें चंपक-मर्म छिन्न, सरलें स्वारस्य जीवांतलें;
थंडीनें परि मोगरा करपला, गेली झडोनी कळी
आकांक्षा विरल्या—तमांत धरणीवायू रडूं लागलीं.
दैवाला बघवे न मीलन असें या मर्त्य भूमीवर
प्रेमानें जुळलेच व्याधशर ते नक्षत्रकुंजांतले !
दोघांचे विरहाश्रु झेलुनि स्मृती देवाकडे पातली
तारे चार मृगांतले करुनि ते त्या संगतीं ठेविली ! ! ! !

पुणें, १४–८–२३ **श्रीधर-मनोरमा.**
रविकिरणमंडळ, ' किरण ' ९ सप्टेंबर १९२३

## ७४ सारंगीवाली

कुठें घरदार ! नाजुक तूं कवळी नार !
अंगीं यौवन मुसमुसलेलें
मस्तकिं कुरळे केस विखुरले
वस्त्र जीर्ण रदनयन झळकले
हाच शिनगार ! सारंगीवाली पोर

थंडी वारा पाउस ऊन
कसें रक्षिसी यापासून
सर्व कुळकथा दे सांगून
दिससि गुलजार ! जगिं कोण तुला आधार

डोळे कां ग ! भरुनी आले
सारंगीचें गायन सरलें ?
निःश्वासानें तिला पाहिलें
गोड गाणार ! दुःखी कां ही अनिवार

आधाराविण वेल तगावी
जलाविणें कमलिनी फुलावी
हंसी पद्माविण शोभावी
खुले तितुकीच ! जणुं सकाळचा इंदूच

शोकाग्नीवर हृदय धगधगे
धीरत्वाचे जळती धागे

उच्छ्वासां कढ येई वेगें
वेल सुकुमार ! जाहली अधिक बेजार ! ५

पुणें. १९२३

---

## ७५ पत्राची वाट

संदेश-दूत पथिं बघुनी आनंद मनीं संचरला
प्रीतिचे दिव्य संदेश घेउनी येतसे मजला
उत्कंठित उत्साहानें, घेण्या कर पुढतीं केला
दुर्दैव आडवें आलें करि निराश मच्चित्ताला
उल्हास मनाचा गेला
अश्रूकण नयनीं भरला
कांपरें भरे पायाला
या कोण वदे वाणीला ' तव पत्र न रुचलें त्याला ! ' १
नाहीं कां तुम्हां रुचली पत्रिका विनोदें लिहिली
रुष्ट काय मजवरि झालां दासी ही मानसिं झुरली
जगिं कुणाकडे मी पाहूं वृत्ती तव पदिं वाहियली
अपराध क्षमा करुनीया
घोरांतुनि मुक्त कराया
पाठवा लिखित अजि सदया
ही एकच इच्छा पुरवा, विनती ही या चरणांशीं ! २

नगर, २२-१-१९२४

---

## ७६ जुनाट वृक्ष

होता एक जुनाट वृक्ष सगळ्या रानांत तो एकटा,
वारा पाउस ऊन, दिव्य सुभगा तैशी उषा पाहत
ब्रह्मानंदिं निमग्न, भंग न करी वृत्ती कुणी निश्चला
योगी भासत हा खरा ? विहगही सेवीत प्रेमाश्रय
आले आणि कितीक ते परतले रानांतुनी चालत
कोणी घे समशेर, कोणि परशू कोणी पशू लांकडें.
वाहे काल अखंड, मानवकृती भिन्नप्रवाहान्वित
पाही वृक्ष परी उदास जगता, ईशाकडे लोचन.

सुरत जून १९२४ (अपूर्ण)

---

## ७७ प्रेमोद्भव

गप्पागोष्टिंत रंगली गुरुजनीं मूर्ती यदा देखिली
वाटे पंडित कोणि बोलत असे विद्वत्सभेच्या स्थलीं
सांगोपांग विवेचनात्मक तशी वादप्रिया पद्धती,
वाणी मोहक; बालवृद्धसुमनें तेव्हांच आकर्षतीं.
नाहीं त्यांतिल लेश अर्थ कळला या बुद्धिहीना मना
कोठोनी मग भाषणीं मिसळणें कोठोनि त्या भावना
होती बिंबत लोचनीं रसिकता लोकांचिया कौतुक
वाढे आदर हें त्वदर्थ बघुनी माझ्या मनीं भाविक !

सुरत मे १९२४. (अपूर्ण)

---

## ७८ निदानींचे बोल

खुशीनें लागलें नादीं तसा ये डाव रंगांत
अहंता सर्व लोपोनी सळाळे प्रेम अंगांत
दुजें कांहीं नुरे चित्तीं तुझ्या नेत्रीं खिळे दृष्टी
अकस्मात् शांति जीवाला सुधेची लाभली वृष्टी
शरच्चंद्रप्रभा विश्वा जणों कीं व्यापुनी राही
प्रभातीं गंध प्राजक्तीं मला भूला मिळे कांहीं !
असें वेडीच मी नाथा ! कलेचा दिव्य तूं तारा
उदारा ! मात्र त्वच्चित्तीं तिरस्कारा नसे थारा
तुझी जोडी मिळायातें जहाले फार सायास
गुणांच्या अंतराची कां नुरे जाणीव प्रेमास !
जशी आली तशी गेली तुझी राजापुरी गंगा
तुझा हा खेळ थट्टेचा करी मद्भावना-भंगा
उभारा आटला माझा मनीषा जाहल्या फोल
कड्याचा मार्ग चिंचोळा कशी मी सावरूं तोल ?
तुझ्या एकेक शब्दाचें जगीं ना आढळे मोल
पुन्हां तें प्रेम जोडाया करूं मी कायरे ! बोल
घनव्यापा निशा भारी चढे डोळ्यास अंधारी
फुलें हीं सोनटक्क्याचीं सुकोनी चाललीं सारीं
उभी मी प्रीतिच्या दारीं कशी राहूं, किती वेळ !
सख्या रे ! जीवघेणी हा सरायाचा कधीं खेळ ?

कसा दुष्प्राप्य सोन्याचा फुका हा चालला काळ
पुराची वाटते भीती कडेला सांचला गाळ ?
नको हा खेळ थट्टेचा थडीला पैल ने प्रीत
परीक्षा नित्य घेओनी सुवर्णा झीज ये मात्र
स्मृति मागील प्रेमाची दिलेल्या तूं प्रसूनांची
पहा अक्षय्य हृत्प्रांतीं जपूनी ठेविली साची
तुझी सत्संगती लाभे जहालें त्यांत मी चूर
परी टोंचे मनाला कीं तुझा कां पालटे नूर
निमूं दे उत्कटा वृत्ती वळें दावी न प्रेमाला !
निदानींचेच हे बोल मिळूं दे मोक्ष शंकेला !

मुंबई, एप्रिल १९२५
रविकिरणमंडळ, शलाका ९–९–२१.

---

## ७९ जीवित-सार

दृष्टीला भिडवूनि दृष्टि अपुली जेव्हां तुला पाहतें
नेत्रीं तेज सुमार्गदर्शक तुझ्या; हें प्रत्यया येतसे
माझें काय कुठें कसें चुकतसे, सांगावया तें तसें
आहे हक्क तुझाच ! चालव तसा, हें स्पष्ट मी सांगतें.
कोणाच्याहि पुढें न मान अपुली मी वांकवीली कधीं
कोणाच्याच मतास मान न दिला मी आजपर्यंतही

घेतें आचरणीं स्वतंत्रपण जी प्रत्येक गोष्टींतही
ती ही त्वत्पुढतीं विनम्र बनलें आधीन दृष्टीमधीं !
त्वद्दृष्टींतच काय अर्थ भरला जाणें न अद्यावधी
भांबावूनि, स्वतःसही विसरुनी, माझें नुरे धोरण
तंत्रानें तुझिया सदैव असुनी लोपानिया मीपण
भावी काल सुखें क्रमूं तुजसवें हा हेतु चित्तामधीं
नाहीं घेत हिरावुनी तरि तुझें स्वातंत्र्य वृत्तींतलें
जें जें रम्य दिसे तुझ्या सुनयना स्वीकारुंया प्रेमला
स्वेच्छें चाखुं फुलांतली मधुरुची कां द्वेष त्यांचा मला
जो आनंद तुझाहि, तोच मजला, हें सार जीवांतलें !

इसलामपूर, जून २९, १९२५

---

## ८० गाणें ऐकतांना—

मधुगंधपूर्ण उद्यानें
हीं खुशाल डुलती सुमनें
मृदुगीत लकेरी घेत
तें तिकडे गायनयंत्र
पथिं येणारे जाणारे
थांबविती क्षणभर चाल
मोहुनियां प्रेमी हृदयें
आशेस प्रेरणा देते
माझ्याच परी कां हृदयीं
कालत्राकालवच होई
हुरहूर लागुनी राही
कसली ती नकळे कांहीं
तरि जीव लुब्ध हा होई
वाटे कीं, तूं येत्रोनी, ऐकत हें गीत बसावें !

सौंदर्य माधुरी सौख्यें तुजवीण न मजला सहवे
स्थिति कशी मनाची होते हें तूंच मनीं जाणावे
* * * *
* * * *
* * * *
ही वेडी आशा बाई
व्यर्थ व्यर्थ हृदयां भुलवी
ती निष्फळ विनती व्हावी
ते कधींच गेले त्यजुनी मर्मास घाव घालून !

इसलामपूर, जून ३०, १९२५

---

## ८१ एक विद्यार्थिनी

पायीं घालुनी शू, धरी निज करीं रॅकेट टेनीसची
ओव्हर्कोटहि बायकी चढविला, वेणी रुळे सैलशी
कोट्या झोडित वर्गबंधुवरती, प्रोफेसरांच्यावर
बाला मोहक मैत्रिणींसह कुणी टाकी पदें सत्वर.
जातीचा अभिमान जाणुनि पुरा अंगीं तिच्या बाणला
डोळे बेदरकार, घे पुरुषही तीच्यापुढें नम्रता
अंगीं ताठरता, पदीं चपळता, वाक्ताडनीं उद्धता
शोभे सर्व प्रमाणसुंदर तिला, हें श्रेय बाहूबला.
लीलेनें फिरवीत ब्यॅट करिंची वादांत उच्चैस्तर
होतो भास जणूं करीं धरि गदा कौमोदकी श्रीधर

किंवा ही महशूर रजपुतपरी वीरासवें झुंजतां
आवेशांत चढे, गमे जणुं तनू-यष्टीकडे पाहतां
देवा ! कां रमणींमधें ठरविली स्तुत्यर्ह नाजूकता
स्वातंत्र्योन्नतिला विनाबल कसें येईल त्यां साधितां ?

इसलामपूर २५-८-१९२५, प्रभा १९२७.

---

## ८२ सुभाषितें

( फक्त पहिलें संस्कृतांतून भाषांतर केलें आहे )

'पंकासमान तुज त्यागियली गणूनी
शून्योपभोगचरितीं जरि पामरांनीं
कस्तूरिके ! लव न खेद धरी मनांत
जाशील गे रसिकभूपति-भूषणांत.' १

रत्नें भरोनि कुठचे दिसतील हंडे
चोहोंकडे पसरलीं बघ काचखंडें
टाकीं पदें जपुनि ना तरि कांपतील
इष्टस्थलाप्रति विलंबन पावशील ! २

भूषा न केशकबरींत कुणी मृगाक्षी
रे कर्णिकार करिती तुज कीं सुवक्षी;
खेदा म्हणोनि न करी, शिरिं गौरिनाथ
अत्यादरार्पित धरील वनोवनांत ! ३

गेला उडोनि शुक पंजरमुक्त होतां
आराम बांधवजनासह भोगुं आतां !'
आला न वेग लव तों, घुसला तनूंत
खाळून बाण ! चिरशांति मिळे क्षणांत ! ४
हा राम ! राम जर हे वच मैथिलाचे
'हा जानकी !' वदति अश्रुहि राघवाचे
प्रेमोत्सवीं समसमान तथापि सीता
झाकी निरश्रु विरहानल मौनचित्ता ! ५

इसलामपूर, २८-८-१९२५

---

## ८३ विचार-तरंग

कुरूपा निंदोनी उपहसन आप्तेष्ट करिती
गरीबी पैशाची म्हणुनि वर सानंद थुकती
करावी सर्वांनीं हंसुनिच उपेक्षा सुम-हती
अशा आयुष्याची खचित फिटली हौस जगतीं !
कलाहीना विद्या विदित न उपालंभ म्हणुनी
नसे ही संसारीं व्यवहारिणी किंवा कुशलिनी
म्हणो कोणी कांहीं, क्षिति मम मना ना किमपिही
तुझ्या नेत्रीं माझें जर सकल होतें मधुर ही !

* * *

मनीं किंतू कांहीं धरुनि त्यजासि तूंच जर कां
तरी या प्राणांची गमत मजसी किंमत फुका

असे त्वद्दृष्टीनें जरि जगतिं त्वद्योग्य जन ही
कशाला खेदानें झुरत मनिं राहूंच लवही ?

*　　　*　　　*

तुझ्यासाठीं मातें जननिजनकें जन्म दिधलें
तुझ्या सेवेसाठीं वपु मम प्रभूनें घडविलें
जरी नाहीं केलें मम तनुमना सार्थक तुवां
जिण्यापेक्षां तैशा गमत मजला मृत्यु बरवा !
असे ठावें कीं मी अललित अडाणी तुजपुढें
तुझी कीर्ती मोठी, मज जनिं परी दुर्गुण जडे
कृपादृष्टिक्षेपें सहज करिसी अंतर दुरी
किती ही पुण्याई ! सफल असते प्रीतिच खरी !

इसलामपूर, २८-८-१९२५.

---

## ८४ पत्रांतील फुलें

उद्यानीं सुकुमार जातिकुसुमें वायूसवें डोलती
हासोनी हंसवीत सद्गुणबलें अभ्यागतां वंदिती
लोकांनीं सगळ्या सुगंध लुटुनी नेला जरीही घरीं
होतो तत्तनुचा उणा न किमपी, आनंद त्यांतें वरी
रात्रींचा जरि तारकागण नभीं स्पर्धा तयांची करी
होई पूर्ण-पराभव-प्रकट तो, आमोद कोठें तरी
पृथ्वी या कुसुमामुळें बनतसे स्वर्गाहुनी मोहक
भेदाभेद न, एकजात सकलां होतें प्रमोदें सुख !!

थोडीं घेउनि तीं पवित्र सुमनें माला नवी गुंफुनी
द्यावी वाटत पत्रिका-सुचतुरा-दूतीकरीं धाडुनी
तों बोले रमणीय मूर्ति मनिंची, " तोडूं नको तीं फुलें
त्यांना प्रेमनिदर्शनास्तव नको दुरी कराया बळें "
राहो प्रेम असें अखंड हृदयीं, कां पाहिजे वाच्यता
आपोआप परस्परांस कळते वाऱ्यांतुनी हृत्कथा !

इसलामपूर, २८-८-१९२५, प्रभा १९२७.

## ८५ जीवाचें सार्थक

'हृदय तुझें मी' कां मग आतां उशीर हा झाला
आत्म्यांचें हें दृढबंधन करि प्रेमरज्जुजाला.
उदात्त थोरहि दिव्य तुझें तें हृदय दया वाहे
अंत न आतां बघशिल माझा धीर मना आहे.
आणुनि पुष्पें, त्या आभरणीं सजवशील मजला
प्रेमस्यंदी मरंद करितो गंधित धूलीला !
खळबळ हृदयामधली सारुनि स्थिरवी सिंधूला
चंद्र परी तूं उलट आणिसी उधाण प्रेमाला !
तुझ्या संगमें विश्व सनातन गमतें नव दिव्य
ग्रहगोलांना धीर देतसे प्रणयभाव काय ?
जिकडे तिकडे सुगंध सुटला ! काय असें झालें !
नव तेजानें दिशा फाकल्या, मर्त्य चकित झाले !

* * *

प्राणनाथ ! ही तुमची सारी प्रेमाची लीला
मंगल मंगल मला म्हणूं द्या हृदयभेटवेला !
भव्य नभः प्रांगणीं तारका हंसती लुकलुकुनी
उतरुं लागल्या कौतुक बघण्या रजतरज्जु धरुनी
कांहीं बसल्या वेलीवरती कुंदरदन खुलती
कांहीं लपल्या माझ्या हृदया हलुं झोके देती
दोन बैसल्या बघ तव नयनीं हिणवितात मेल्या !
मन्नेत्रांतुनि दोन बिचाऱ्या हिरमुसुनी गळल्या.
असला बाई प्रभाव तुमचा ! मज मोठें नवल
रुचली कैशी कल्पतरूला ही खुरटी वेल ?

* * *

तुझी थोरवी कशी गाऊं मी ! मूक तुझी कांता
हृदय उघडुनी सत्तेचें बघ, प्रीति रची गाथा.
किती दिवस तरि वाट पाहिली आशा जगवोनी
भेट दिली तूं, क्षुद्र जनांच्या निंदा विसरोनी.
घनरव ऐकुनि भिऊनी जातें भित्रें मन माझें
तुला बिलगुनी राहिन केव्हां नित्य असें वाटे !
जिकडे तिकडे पहा पसरला दावानल घोर
हृदयफुलाला कोण तुझ्याविण नेइल हलुवार ?
निबिड काननीं भटकत असतां मनांत तव मूर्ती
काय करुं शके पिवळी नागिण ? नाममंत्र चित्तीं !
फुलांतला मी गवतावरच्या मधु चुंफुनि गिळला
तुझ्यावीण परि गोड न लागे ! त्याचें काय तुला ?

## श्री-मनोरमा

सुंदर वस्तू बघतां अवचित जीव उचंबळतो
डोळे मिटुनी वद्द बसतसे, भास तुझा होतो.
वेडावुनि मी कांहींबाहीं वदतें तारेला
फुलें झुगारुनि देतें, बसती चरके हृदयाला.
अश्रुजलाचें अभिषिंचन मग हिरव्या चांफ्यातें
येइल त्यांतुनि मूर्ती कां तव बघत असें बसतें;
सजीव होईल बागेंतिल कां मदनाचा पुतळा
रम्य तुझें मधुरुप घेऊनी परतवील काळा !
निशिगंधाची काव्यमाधुरी तुज आकर्षोनी
आणिल तुजला सत्वर येथें ! राहतसे बघुनी.
सळसळ सळसळ पिवळीं पानें वाजतिं पायतळीं
तरु शिर लवुनी स्वागत करिती, कमलें फुल्ल जळीं;
प्रसून चित्रित धवल कौमुदी गालीचावरती
राजा ! पंचारती काजवे नाचुनि बघ करिती
कारंजाचे तुषार उडती, माळा त्या बनल्या
निसर्गदेवी सज्ज जहाली स्वागत करण्याला.
फुलें उमललीं, गाणीं गातीं ' हा राजा आला '
' हा तर माझा ! ' ' हृदयसखा प्रिय ' ' आला ग आला ! '
प्रेमस्निग्ध तूं दृष्टि रोखतां प्रफुल्ल मन झालें
काय उणें मज जगतीं राही ! दिव्य मनीं भरलें.
रहा बसोनी इथेंच आतां जाऊं नको कोठें
स्वर्गीं आतां असेंच जाऊं प्रेमाच्या वाटे !

*   *   *

परागरंजित मंद वायुचा बुरखा घेवोनी
हेमकामिनी उपवनिं फिरली जगता विसरोनी
कारंजांतिल मृदु लहरींसह नाचुनि तीं पर्णे
अखेर घेतीं चिरविश्रांती जलतालिं शांतीनें
निशा-मुखश्री काय वर्णु मी ! तुलाहि ठावी ती
कवीश्वरा ! तुजपुढें काय मी—तारा रविपुढती

*　　　*　　　*

नवरागोदयचिन्ह बघुनि जलिं ओष्टांचें स्फुरण
लाज वाटली किती तरी मज ! अवनत हो मान !
बघूं कशी वर ? किती नाचलें तव वदनीं हास्य
हृदय करी जरि तव वक्षावर सगर्व तें लास्य !
काय बाइ तरि, लबाड पाणी ! फेकिन मी दगड

..........................

*　　　*　　　*

परस्परांचीं हृदयें कथिलीं ज्या मधुवाणीनें
तीहि जनांना विषसम गमली !!! जाऊं दे गेलें !!
त्या सुखसमयीं भानच नव्हतें लोकांचें इतर
प्रेमोपायनिं अपुल्या भासे तया विष प्रखर.
हृदयदीप निज रम्य समयिं त्या होई प्रज्वलित
वियोगसमयीं दुःख छटेनें जरा कमी होत !
हृदय जरी हो पवित्र समयीं भाविवृत्त—विमुख
सोडुनि देऊं लोकमतांप्रति वृत्ती साशंक !
सृष्टिसतीच्या निश्वसितांना महत्त्व देऊनी

जनास विसरुनि, बोल सृष्टिचे घेऊं ऐकूनी
मोदाश्रूंनीं हृदयलेखही कोरूं हर्षानें
सृष्टिदेविला सुखवूं गाउनि तेंच रम्य गाणें

*         *         *         *

फुलें विकसुं दे प्रेमतरूचीं, हृदय करी उघडें
बोल बोल रे ! नेत्र उघड रे ! दे मज प्रेमधडे.
अणूअणूंतुनि मृदुभावांचे कुंज कुंज फुलले
दिशादिशांतरिं दिव्यत्वाचें भांडागार खुलें !

*         *         *

नाहीं आतां सोडणार कधिं राहिन बसुनि अशी
प्रेमजाल तुज गुंतवितां मग सांग कसा जाशी !
आत्म्यांचें दृढबंधन झालें ! विहरूं जोडीनें
फुलाफुलांच्या दिव्य तारका बनवूं प्रेमानें;
पुन्हां वाहवूं प्रेमरसाचा निर्झर सुकलेला
पूल वाळुचे किल्ले रुचती काव्यजीवनाला.

*         *         *

जरी न वदसी तरी मनाला गूढ तुझें कळतें
नेत्र कळविती सगळे ! असलें गुपित कुठें लपतें ?
अनुरागान्वित वदन पाहुनी भरती हृदयाला
पूर्वींच्या त्या स्वप्नमालिका आज खऱ्या ठरल्या !
कांहिं नको मज ! रात्र नकोही ! कशास स्वप्नें तीं ?
मूर्तिमंत तूं जवळ राहतां ! निशा भासमय ती.

*         *         *

जीव वाहिला पदांबुजी तव ! यांत सर्व आलें
क्षणसहवासीं अनंतसौख्यें हृदय पूर्ण धालें.
चिरसहवासा लोलुप आशा परि दैवाधीन
जीवन; माझें समाधान नच नेई काढून !
विचार कसला करणें आतां ! मत्प्रेमा स्थिरता.
सार्थक झालें जन्माचें ! ये, ये काळा आतां !

इसलामपूर, आगस्ट १९२५

---

## ८६ तुझें प्रेम

मन्मनिच्या राजहंसा ! हें प्रेम तुझें अनिवार ! !
जन्मींचें भाग्य उदेलें, म्हणुनीच प्राप्ति तव मजला
मी अंकित तव, तूं माझा, ही खात्री पटली अखिला
किति घरे पडत असतील, मत्सरग्रस्त हृदयाला
दुर्लभ तें चालत आलें
मम मनोगृहीं स्थापियलें
इतरांचे वांया गेले—
ते प्रयत्न केले फार ! हें प्रेम तुझें अनिवार ! १

मी तुझी बांधिली पूजा, अभिषेक प्रेमसलिलाचा
मोदाश्रू–मौक्तिक–माला स्वीकार करावा यांचा
सर्वस्व वाहिलें तुजला जाणिसी तनुमनोवाचा

## श्री-मनोरमा

मी कशी जरी असलें
सर्वांहुनि प्रिय तुज झालें
मज श्रेष्ठ-पदविला नेलें
तूं—मीपण माझें हरलें ही वृत्ति तुझी दिलदार ! २

शुचिरूप वैभवोपेता समशांत सौम्य तव दृष्टी
उन्मादकारि नच तेज स्नेहाची करिते वृष्टी
जन हपापलेले दिसती तव दिव्य प्रीतीसाठीं
फल परी तपश्चर्येचें
माझ्याच मिळें कायमचें
उकलिलें गूढ तव मनिचें
सारथ्य मिळे संसारा अभिमान न कां येणार ! ३

या उदात्त प्रेमतडागीं जाहलों लीन उभयांत
विसरले जगाचे व्याप स्वार्थाचा करुनी अंत
जगिं एकामेकांसाठीं निर्मियलें आ—विश्रांत
उभयांस तत्त्व हें पटलें
त्वत्सुखार्थ किति मी झटलें
अपुरेंच यत्न मज गमले
चिरकाल काय टिकणार मन होई मग हळुवार
हें प्रेम तुझें अनिवार ४

इसलामपूर.
३१–८–१९२५

## ८७ सुमनावली

मधुरास्मिता मृदुशीतला विधुची प्रभा बघ फांकली
सुखशांतिदायक शुभ्रता उधळोनिया क्षितिमंडलीं !
मृदु वायुच्या झुळकीसवें तरुवल्लरी हळुं डोलती
हिमशुभ्र पाहुनि चंद्रिका गुजगोष्टि तीं करुं लागलीं ?
कुसुमें सुवासिक नाचुनी जनमानसासहि वेधिती
सुमवाटिका रसिकाप्रती रिझवीत तत्पर राहिली !
अतिमंद वीचि जलाशयीं पवनासवें मृदु कांपती
कमलावरी अलिगुंजनस्वनता प्रदोषिंच लोपली !
पसरे अलौकिक स्तब्धता जणुं मानवी अवनी लपे
प्रकृती परात्पर देवता अधिकार चालवुं लागली !
समयीं अशा मज वाटतें, भटकूं सुदूर कुठें तरी
भय कोठचें-शशिमित्रता, प्रियकांतनामजपावली !
हृदयोत्कटा प्रणयोज्वला स्मृति मानसीं उजळूं पुन्हां
विरहानला शमवावया करुं अश्रुंची सुमनावली ! !

इसलामपूर, १–९–२५
मनोरंजन, फेब्रुवारी १९२७. उपा.

## ८८ मना आतां कां !—

मना ! आतां गुंतिसी कां भवांत
धरी दृढता; स्थिर होइं आणि शांत
तुझ्यावांचोनी अडुनि काय राही
तुझी नंतर स्मृति नामशेष होई !
तुझ्यायोगें आप्तेष्ट दुःखि झाले,
कधीं नाहीं सुख तुवां त्यांस दिधलें
कोण परवा करणार तुझी आतां
मृत्युवांचुन मज नसे अन्य त्राता
चोंच ज्यानें उत्पन्न जगीं केली
तोच चारा पुरवील विहग—भालीं
वाढतीलहि मत्सुता सृष्टिसंगें
कशासाठीं तर चित्त मम दुभंगे !
प्रिया कांता ! सोडून तुम्हां जातां
व्यर्थ शोकानें................
..............................
..............................!!

इसलामपूर, १ सप्टेंबर १९२५

## ८९ याचना

द्या आतां वरदान प्रेमला ! द्या आतां वरदान

रविसहवासीं प्रभा रंगली
अरुणासंगें उषा हर्षली
प्रेमनिर्भरा हसूं लागली
दृश्य बघोनी भान हरपतें, मन होई बेभान १

भूमी जलदागमिं टवटवली
फुलें मनोहर नाचुं लागलीं,
प्रीतिरसीं तीं निमग्न झालीं
सुखी असुनि तीं, मींच करावें जीवाचें का रान ? २

लता डोलते तरुसंगमनें,
ल्याली पुष्पांचीं आभरणें
उधळित विश्वीं प्रेमगायनें
मोह पाडुनी जीवाला तीं, टाकिति भारुनि कान ! ३

तरुशाखेवर पक्षी रमती
गुंग दंगले प्रेमकूजितीं
विरहाचें भय शिवे न चित्तीं,
तोलुनि त्याशीं स्थिति बघतां मम, व्याकुल होती प्राण ४

सुखी असूं दे विश्व विचारें
शिवो न दुःखाचें त्या वारें

येउनि पडुं दे मजवर सारें
सहन कराया शक्ति असावी एकच इच्छा जाण
प्रियविरहानें दुर्बल झालें
हतदैवानें जर्जर केलें
आधिव्याधी पीडित झालें
तरी करूं फिर्याद कुणावर, दैव असे बलवान्

इसलामपूर, सप्टेंबर १९२५.
रविकिरणमंडळ, 'शलाका' ९–९–१९२५.

## ९० स्मृति

हातीं घेउनि चार पांच गजरे आलांत जेव्हां घरीं
चोहोंबाजुंस पाहिलें हुडकुनी, ठेवोनि मेजावरी
दृष्टीच्या तुमच्या असे विषय मी कीं अन्य कोणी तरी
शंका वाटुनि यावयास पुढती संकोचलें अंतरीं !
भाग्याची इतकी असेल रमणी कोणी जरी राजसा
हेवा कां करूं मी तिचा, सुखवुं दे प्रेमा तिच्या मानसा
माझें प्रेम तुम्हावरी जडतसे हें भाग्य कां थोडकें
हा संतोष हिरावण्यास जगतीं कोणी न केव्हां शके
राहोनी क्षण हा विचार विरला, मागोनि येवोनिया
वेणी भूषविली तुम्हीच गजरा सप्रेम घालोनिया

आनंदास उणें गमें जग मला, दुग्धीं पडे साखर
कीं त्वत्प्रेमनिधान मीच बनलें, तूं सर्वजीवेश्वर
पूर्वी तूं क्षण-संशयें द्विगुणिता झालीस सौख्यप्रदा
प्रीती ! तूं स्थिर आज मात्र विरहीं झालीस ना तापदा !

इसलामपूर, सप्टेंबर १९२५
शलाका, रविकिरणमंडळ
९-९-१९२५

## १ मोहना !

मोहना ! राजीवनयना ! देइं आतां दर्शना
तापलें विरहानलानें पुरे झाल्या यातना ! मोहना०
प्रेम अपुलें सांधलें दृढ हेतु आला जीवना
लपुनि बससी दूर देशीं काय मनिं तव योजना ! मोहना०
दीर्घसूत्री रात्र जाचे व्याकुला मम भावना
दर्शवी चित्तीं तुझ्याही मत्समा संवेदना ! मोहना०
'पीडलों तव विरह-तापें' गोड वच हें बोल ना !
'त्यजुनि नाहीं जात' स्वप्नीं येउनी तर सांग ना ? मोहना० !

इसलामपूर, १९२५
शलाका-रविकिरणमंडळ
९-९-१९२५

## ९२ विनवणी

किती करूं विनवणी याहो राया या वांचुनी !
देव भावाचा भुकेला सत्य करा वैखरीला
वांचण्याची माळ केली गळां आपल्या गुंफिली
हृदयाची भक्ति ज्योती आरती ती ओंवाळिली
पंचप्राणांचा नैवेद्य समर्पिला तुम्हां वंद्य
अवघें शरीर वाहिलें सेवेलागीं झिजविलें
भक्तालागीं आज्ञा व्हावी प्रेमकसोटी पाहावी
तुम्हासाठीं जन्म माझा लावा आतां योग्य काजा !
गडे ! उगा कां उशीर भेट द्या हो वेळेवर
अंत नका पाहूं आतां तुम्हांवीण कोण त्राता
जनीं वसुनीही झाली तुम्हांवीण ही एकली
जीव झाला हा हैराण नुरे देवा ! देहीं त्राण !

इसलामपूर, सप्टेंबर १९२५ [ शेवटची कविता ]
रविकिरणमंडळ, ‘ शलाका ’ ९–९–१९२५

# श्री—

( श्रीधराची कविता )



श्रीधर रानडे

## १ मनी

"नको भाउ ले ! कलुं दंगा तूं मादि मनी निदली
धोष लागली तिला तांगली, ललुन ललुन दमली
उथल्यावलती तेल लावुनी थो थो घालिन मी
शुक्क तांगला कोत घालुनी देचिल ना मामी ?
काले भाऊ ! उगीत हंततो ? तुदें काय दातें !
बाऊलि मादी मला अवलते ! कलिन पाहिदें तें !"
वेडीं विद्री ही चिध्यांची बाहुलि तव ताई
टाकुनि दे ती सुरेख दुसरी देइल तुज आई !
"नको अमाला दुतली तिथली ! मनी मादि माला
तिला अवलतें किती तली मी ! विचाल तूंच तिला !
नको विचालूं ! दागी होइल ललेल ती मग ले
उलि खलकतीं धुनें मादें लाहिल कीं थगलें
'मनी वाइत' भाऊ ! अथलें बोलुं नको काईं
कलीन फू मी पुना कदींही बोलनाल नाईं !

---

## जलसा

पहा रसिकहो ! पहा कसा
निसर्गनिर्मित हा जलसा ! ॥ध्रु०॥
सरोवराच्या नील जलीं,
घनतरुवृंदाच्या खालीं,
मुदें चंद्रिका नृत्य करी,
ठेका त्याचा वायु धरी;
प्राणिमात्र हें
लीन जहालें,

भान विसरलें,
लहरी येती पाण्याला,
हंसते फिरते ही बाला !
समीप सिकतेच्या जाती
लहरी, चुंबन हळुं घेती;
मंजुळ उमटे ध्वनि त्याचा
नूपुर जेवीं चरणींचा;
निसर्गनिर्मित,
सुस्वर, सुंदर,
वाद्य मनोहर
वंश लाजवी मुरलीला,
रंग चढे मग नृत्याला !
मोद दर्शवी कुसुमकळी
डोकें हलवुनि वरखालीं;
सारे तारे नभिं हंसती,
आनंदानें बहु खुलती;
यापरि खेळे
स्वच्छंदानें,
निजनृत्यानें
दृष्टिस ती ज्या क्षणीं पडे
बाला, कविमन करि वेडें !
पहा रसिकहो ! पहा कसा
आनंदाचा हा जलसा !

---

## २ हरपलेलें रत्न

पुत्ररत्न या वेडीचें आज हरपलें मोलाचें
हिंडुनि धुंडुनि बहु दमलें परि न सांपडें जें गेलें
रानीं पडलें, गगनिं पळालें, कुठें दडालें
सांगा कोणी तरी मला साह्य करा या अबलेला ! १
वाऱ्या वेगें कां पळसी थांब बोल रे तूं मजसी
पदर पसरते तव भगिनी त्राता नाहीं मज कोणी
माझा छकुला, तुजला दिसला, कुठेंहि असला,
गेला असला स्वर्गाला वार्ता त्याची सांग मला !

काय ?–मिळें तें मज बाळ ? धन मी देइन तुज सकल
फेडिन तव ऋण प्राणानें जरा पाहुं दे तें तान्हें
पण छे कुठलें, सुदैव असलें, बाळ सोनुलें,
दिसेल कां मज जगांत या ? मुकलें ना मी हाय तया !
माझ्या कानांशीं हासें परि तें कोठें नच गवसे
हाक मारितें मधुर स्वरें पण तें स्वप्नीं ना सारें
गोजिरवाणें, माझें तान्हें, बाळ लहानें
सोडुनि गेलें मला तरी राहुं कशाला संसारीं !

---

## ४ प्रातःकाळीं पडलेलें इंद्रधनुष्य

गगनश्रीच्या हातांतिल कंकण हें चमके
रत्नखचित तें सप्तजातिच्या किरणांनीं झळके
सागर-दर्पणिं पाहुनि कुंतल पश्चिमदिग्देवी
विंचरतांना रविला पाहुनि वर गजरा खोवी !
गजऱ्यांतिल तीं फुलें-तारका इतस्ततः पडलीं
रंगी लोकर मात्र त्यांतली ही कां उरलेली
रवीचिंतनीं निमग्न झाली पश्चिमदिग्बाला
भान न राहुनि उलट लावि कां कोर कपाळाला ?
सौदामिनिशीं बोलत बसला रवि तें बघण्याला
वक्र भृकुटी करुनि दुजी कां डोकावी बाला !
रविकर वरवर बघतां भासे धवल खरा योगी
मेघांचे उपनेत्र चढवितां पुरा खुले रंगीं !

श्री—

सलिल-बिंदुशीं विवाह झाला रविकरदेवाचा
अंतःपट तइं धरिला होता सुवर्ण मेघांचा
पापिजनाची या भूवरल्या दृष्ट न लागावी
म्हणुनी गालीं कृष्ण ढगाची तीट कुणी लावी
वनदेवींनीं तेव्हां सुंदर नाना रंगांचा
अर्पण केला शालु जरीचा अहेर प्रेमाचा
आकाशाच्या दांडीवरती कोणीं वाळविला
तो शालू हा, इंद्रधनू नच भास तुम्हां झाला !
पूर्व दिशेशीं क्रीडा करुनी अस्ताचलिं आला
मागें वळुनी इंदु पाहतो नवल दिसे त्याला
पूर्व दिशेशीं कुजबुजणाऱ्या रविला पाहोनी
कोप वाढुनी रक्तपणा ये चंद्राच्या वदनीं
म्लानवदन मग भानु आपलें मेघपटालिं लपवी
इंद्रधनू नच, भिन्न रंगयुत कोर चंद्र दावी
नंदनवनिंचि ही कां देवी ओणवली खालीं
या भूवरची मोहक कुसुमें वेंचाया आली
इतर सुवासिक मोहक कुसुमें देतिल वृक्षलता
नाना कविवर अर्पण करतिल मनमोहक कविता
रूपहीन हीं गंधहीन परि प्रेमानें दिधलीं
म्हणुनि देवते घेउनि यांना ठेव तुझ्याजवळी

---

## कवि-प्रभाव

प्रभाव माझा कसा केवढा ठाउक इतरां जनां नसे
सांगे ज्यांना ते ते म्हणती खचित लागलें मला पिसें
मनांत माझ्या येतांक्षणिं तो तारा खुदखुद कसा हंसे
लताफुलांना पशुपक्ष्यांना बोलाया मी लावितसे
रानामध्यें सुंदर निर्झर मम जादूनें गात पळे
सांगुं किती मी ? प्रभाव सगळा माझा कोणा कधीं कळे !
आप्तइष्ट मज म्हणती वेडा, त्याची नाहीं मला क्षिती
दोष असे कीं हंस समजुनि काका देई मी मोती !
सृष्टीचा मी पुत्र लाडका म्हणुनी मज ती दाखविते
भांडागारें गुप्त आपलीं, किल्ली त्यांची मज देते
कविता केवळ जीवन ज्यांचें त्यांची करितों मी सेवा
हंसोत सगळे लोक मला ! मज त्याची नाहीं मुळिं परवा !

---

## अंतिम साध्य

शांति देवते ! आप्तजनांना सोडुनि तुज जवळी
नित्य बसावें अशी मनीषा असे सर्वकाळीं
देशिल मजला निवास जेव्हां निशिदिनिं एकांतीं
देउं नको मज भयाण वाडे, उदास ती वसती !
'घू घू घू घू' घुबडें करितीं, पाकोळ्या उडती
उदास असली भयाण जागा ! नको कल्पना ती !

ने मजला तूं निबिड वनीं मी राहिन सौख्यानें
रम्य दऱ्यांतुनि भटकत फिरतां गाइन मी गाणें
हरित तृणाची शेज पसरली तें शय्यास्थान
मधुर फलांचें सेवन करणें, निर्झरजलपान
पर्वतशिखरीं बसतां शोभा दिसेल सृष्टीची
भान राहिना मलाच माझें ! स्मृति मग कोणाची
तन्मय ऐशी वृत्ती माझी होइल ज्या काळीं
गाणें गाइन सृष्टीचें मी बसुनी तिजजवळी
शांति देवते ! अशा रीतिनें वनांत गमतीनें
दुष्ट जगाला विसरुनि जगणें, आनंदें मरणें—
अंतिम माझें साध्य असे हें, साधो केंव्हांही
स्वर्ग नको मज, हेंच पाहिजे ! म्हणो कुणी कांहीं !

---

## ७ मातृसान्त्वन

घो घो घो घों सुटेल वारा रात्रीच्या वेळीं
त्यांतुनि येइन बसावया मी आई तुजजवळी
दचकुनि जागी, चांचपुनी तूं बघशिल अंथरुण
होतिल तेंव्हां मी नच दिसतां व्याकुल तव प्राण
नको रडूं तूं आई ! अगदी कारण कां कांहीं
सदा हिंडतां फिरताना मी तुजजवळी राही

कंठ भरोनी येइल खेळणिं वस्त्रें पाहूनी
विवेक करुनी रहा आइ तूं भाऊला जपुनी !
जातों सोडुनि रडूं नको परि सदैव तुज जवळ
वास करिल हा वायूरूपें तुझा लहान बाळ

---

## झोंपाळा

विस्मरणाच्या झोल्याला    झोका दे चल ये बाळा !
बसुनी हिंदोळ्यावरती    जाऊं आपण वरवरती
वरवर जातां, पाश तोडतां
स्वतंत्र होउनि भुर उडूं    आनंदानें हसूं रडूं !
झोका गेला गगनाला    जातां तेथें वर रमला
दुःख कशाचें, सुख जन्माचें
लागत सुटतें पाठीला    डर जगताची कोणाला !
विस्मृति जगताची होई    आज उद्यां ठावें नाहीं
जगा विसरलों, मीच राहिलों
मीच व्यापितों जगताला    जगही विसरे तसें मला !
संसाराचा व्याप तुटे    चिंताग्नीचा ताप सुटे
झुडपें रानें; वणवण फिरणें
आवडतें जर हें तुजला    घे तर मोठ्या झोक्याला !
विस्मरणाचा घे झोला    विस्मरणाचा पी प्याला
धुंद होउनी, गाऊं गाणीं

मोदें प्रेमें उल्हासें, मोठे झोके घे खासे !
समुद्र खेळवि फेसाला विस्मृति डोलवि आज मला
अरे असें हें, काय जहालें
स्वतःस विसरुनि मी गेलों, पुरतें गाया नच उरलों !

---

## ९ मार्गप्रतीक्षा

सृष्टिसुंदरी ही नव नवरी
वाट पहाते होई घाबरी !
हरिततृणाचा शालु पांघरी
सरिता वाहे कांठ रुपेरी
नागाकृति नग घालुनि सुंदरी ! वाट पहाते
सलिल सांचलें पर्जन्याचें
शोभति ठिपके शालूवरचे
शीतल वायू झुळझुळ वाहे
तृण-तनु रोमांचित ही सारी ।
कलिका खुलल्या सख्या मिळाल्या
भ्रमर देखतां भान विसरल्या
तरुवर वेली अर्पिति माला
धीर न धरवे होइ घाबरी !
लाली गाली अशोक फुलला
कूजित काळी करी कोकिला

टपटप गळते दंहिवर-माला
मूक आंसवें गाळी भूवरी ! वाट पहाते

---

## पतंगाचें आत्मवृत्त

बंदिवास सोसुनि आलों या वनीं
आनंद मुळीं मावेना मम मनीं
स्वच्छंदानें गगनीं फिरण्या तयार मी जाहलों
फिरलों, वन पाहुनि रमलों !

किति पतंग मजसम दुसरे हिंडती
आनंदें मधू पुष्पांचा सेविती
परंतु मजसम सुंदर कोणी नव्हता त्या काननीं
पाहती सगळे टक लावुनी !

सौंदर्य पाहुनी माझें तोषलीं
सुमचित्तें त्या उपवनिंचीं गुंगलीं
सुंदर होतीं खरीं परंतू नाहीं विनय जिथें
ठरेना प्रीती माझी तिथें !

झुडुपांनीं झांकुनि गेली वनलता
परि मोद मनाला होई पाहतां
पानांमध्यें लपली होती साधी भोळी कळी
सुंदरी पाहुनि मज लाजली !

रूपानें जरि नव्हती ती आगळी
विनयानें शोभत होती ती कळी

श्री—

मधुर सुधेचें पान कराया उत्सुक अति जाहलों
जवळी जाउनि मी बैसलों !
हाय हाय ! कोठुनि आला या वनीं
हा अधम किडा तिज दुखवी चावुनी
दुःख साहिना खाली पडली नाजुक माझी कळी
गेली क्षणामध्यें सुकली !
हा मधुर सुधेचा पेला लाधला
नेतांना ओठाजवळी सांडला
कसा क्षणभरीं वास सखीचा घडला नाहीं मला
माझी दया न आली तिला ?
प्रेमानें निवडुनि जी मी काढली
जी दुजा प्राण शरिराचा भासली
सोडुनि ती मज गेली देवा ! नाहीं मज लाभली
आतां आशा मज कोठली

---

## ११ रमणीगान

गा ! गाच अशी तूं रमणी ऐकेन स्तब्ध होवोनी
तव गान ऐकुनी माझ्या हृदयांतील तंत्री वाजे
तव वाणी ही रसभरिता ऐकुनियां कोकिल लाजे
हृदयांतिल धडधड ठोके धरतात ताल गानाला
आलाप घेसि ज्या ताना रोमांचित करती तनुला
तव कुटिल नेत्रक्षेपानें भरती ये मनसरसाला

तव दिव्य गानवृष्टीनें पालवी फुटे प्रीतीला
उन्मत्त तदा मी बनतों
वेलींना रंभण देतों
कुसुमांचें चुंबन घेतों
स्थापना हृदीं तव करुनी आनंदें गातों गाणीं !
गा गाच अशी—
तव मंदस्मित गे ठेवी स्वर्गांत धरा नेऊन
वदनांबुजिं दृष्टी देतां आकंठ गान सेवीन
तूं सतार छेडित गातां हृदयीं मी साथ करीन
तव काव्य ओघ हा वाहे करितों मी त्याचें पान
तव प्राप्तीसाठीं सखये द्यावासा वाटे प्राण
हातावर ठेवुनि गाल
पायानें धरितां ताल
थांबतो ऐकण्या काल
बैस तूं गडे चिरकाल नादांत गात मधु गाणीं !
हें विरहगीत गातांना वृत्ती तव तन्मय झाली
नयनांतुनि वाहति धारा अश्रूंनीं भूमी भिजली
हें खास नसे दुसऱ्याचें, स्फूर्तीनें येत विचार
मनिं दुःखपूर मावेना, कवनांतुन ये बाहेर
रडरडुनी डोळे सुजले अश्रूंनीं गाल नहाले
तुज विरह कुणाचा झाला माझा कां—सांग मज बाले ?

श्री—

—पाहुनि मज चमकुनि उठली
वदनावर टवटवि आली
टाकुनी वाद्य मग खाली
मजकडे स्मितमुखी बघुनी चपलेसम गेली सदनीं !

---

## १२ खोप्यांतलें फूल

काव्य-कल्पना अमरलता ही विश्वोद्यानीं लावियली
नकळे कोणी ! परी वाढली, प्रेमतरूला कवटाळी.
वाढत गेली, कुसुमें आलीं, यौवनभारें टवटवली
प्रभा फांकली चहूंदिशांना पुष्पभरानें नत झाली.
सुगंध तेव्हां वनीं पसरला मधुकर आले धांवुनिया
अधीर झाले—केव्हां मिळतें —सगळे—अमृत चाखाया.
दाटी पाहुनि लता लाजली काय करावें तिज न सुचे
प्रेमबंधु तिज उपाय सांगे तो तर तिजला मुळिं न रुचे.
मधुकर झाले लुब्ध तुझ्यावर करिति याचना प्रीतीची
'गुं गूं' करुनी विरव्या वालति पूर्ती कर तूं इच्छेची
विचार असला तिज नावडला मधुकर वृत्ति तिज ठावी
विगलितकुसुमा वृद्ध लतेनें सांगितली तिज स्थिति भावी !
रसिक परंतू नीच वृत्तिचे भ्रमर त्या स्थलीं बहु जमले
प्रेममिषानें करिती याचना, प्रयत्न वायां परि गेले !
जेव्हां कळलें दुस्तर मिळणें, कपट फळाला नच आलें
निंदा करुनी उच्च रवानें ते खल गेले त्या वेळें.

घाणेरीच्या फुलांभोंवती गेले गुंजारव करिती
तीहि तयांना यथेच्छ रमवी, तिटकारा ये मग चित्तीं.
'कसें करावें, जन्म फुकट कां ? जगीं नसे कां कुणि भोक्ता
सकल जगानें रसिक ठरविले, आवडती ते नच चित्तां !

चिंता करिते, मलूल झाली पण येई हें कर्णपथीं
नितांत मंजुल गायन कुठलें, अस्फुट हंसणें विजनपथीं ?
मम चित्ताला मोद द्यावया जगदीशें कां पाठविली
रसिकवरांची जोडी, इतकी भाग्यवान मी तरी कुठली

दृष्टिपथावर तिजला दिसली, पाहे उत्सुक होवोनी
हांसत खिदळत बहीण भाऊ आले धांवत उद्यानीं !
करांत घालुनि कर मोदानें, अल्लड बालें कंठानें
गाणीं गातीं प्रेमभरानें, रमत चाललीं नादानें

हात लावितीं या कुसुमाला हलुंच हुंगितीं पुष्प दुजें
लाजाळुचीं पानें मिटतां बाळ विचारी 'कां लाजे ?'
जगदीशाचीं मुग्ध बालकें सर्व जगाचीं आवडतीं
त्यांना पाहुनि फुटला पान्हा नाना लतिकांच्या चित्तीं !

आनंदानें मुग्ध बालकें विश्वोद्यानीं बहु फिरलीं.
येतिल केव्हां मजजवळी ही चिंता लतिकेला पडली.
गंध फुलांचा बंधुस जेव्हां कळला तेव्हां वेगानें
करांत धरुनी कर भगिनीचा निघे जावया वाटेनें.

काटे रुतले बिकट वाट परि सुगंधास ते भुललेले
परवा कसली, विस्मृति पडली, समीप आनंदें आले.

प्रेमभरानें लवलेली ती लतिका दिसली नयनाला
आनंदानें नेत्र चमकले उकळी फुटली हास्याला
आश्चर्यानें मुखीं अंगुली, बंधुस्कंधावर भार
स्तब्ध राहिली, मोहित झाली पाहुनि सुंदर सुमभार !
आनंदाचें पहिलें भरतें गेलें तेव्हां लडिवाळें
स्निग्ध दृष्टीनें पाहुनि बाला मंजुळ बोले त्या वेळे.
'भाऊ ! मज तूं येथ आणिलें, दाखविली मज अमर लता
प्रेमसुगंधित काव्यपुष्प दे, नच येतें तें मम हाता'
त्या बालेची असली आज्ञा अमान्य कैशी कोण करी
तो बालक तर अजाण अल्लड, भगिनिप्रेमें धीर धरी
होतें जरि तें उंचावरती प्रयत्न केले बहु त्यानें
वेणीमध्यें हळुंच खोचलें, भगिनी हंसली मोदानें
एकवार मग प्रेमभरानें दृष्टि फेकली त्याजकडे
फेड जाहली सर्व श्रमाची, प्रीति अंतरीं अधिक जडे
प्रीती पाहुनि सात्विक ऐशी लतिका प्रेमें गहिंवरली
अश्रूसंगें सर्व फुलांची पखरण केली भूमितळीं.
अमरफुलांचा सुगंध अजुनी विश्वोद्यानीं दरवळतो
प्रेमें धरुनी कर बालेचा बालक आनंदें गातो
प्रेमभरानें दिव्य पुष्प जें खोप्यामध्यें खोवियलें
नकळे लाधे कशी आर्द्रता ! राहे अजुनी टवटवलें.

# ३ कां चुरगळसी कुसुमाला

मृत शरिराचे तुकडे करुनी सजीव पुष्पांच्या लीला
कळतिल कैशा तुज शास्त्रज्ञा ! कां चुरगळसी कुसुमाला.
सूक्ष्मदर्शकीं काय पाहसी ! आण हवें तें यंत्र तुझें
नव पुष्पाचें हसणें रडणें दिसेल तुजला कसें उगें;
गालावरती लाली चढते रुंजी ऐकुनि भ्रमराची
छटा गुलाबी दिसेल कां तुज या मृतदेहीं लज्जेची ?
नाद सोड हा ! व्यर्थ यत्न तव, ऐहिक वस्तू वदण्याची
भौतिक शास्त्रें स्तब्ध या इथें, यंत्रें कसल्या कामाचीं.
खळबळ करतें, आंदोलन दे कविहृदयाला जें गान
रम्यमुग्ध तें कळेल कैसें जरि टवकारिसि तूं कान !
त्या गानाचें पान करितसे जो सुमहृदया ओळखतो
त्यांच्या संगें हंसतो रमतो उद्यानीं जो बागडतो.
त्या गानाचें मर्म जाणतो एक रसिकही या जगतीं
तुझ्यासारख्या मूढ जनांच्या कधिं न लागतें तें हातीं.
मित्र पाहुनी समहृदयी हा सुमन उमलतें मोदानें
हृदय उकलुनी त्यास दावितें अंतरंग निज प्रीतीनें
प्रेमळ कोमल मुग्ध हृदय तें मिळतें केवळ रसिकाला
मधुकर हो मग मिळेल सगळें ! कां चुरगळसी सुममाला !

---

## १४ सावधान

ठाउक मज ती आहे वनिता
फसविल तुजला पळ न लागतां
हो शत्रू वा दावि मित्रता

सावध ! भ्रुकुटीभंग करी जर्जर मारुनि बाण करी
सावधान रे धीर धरी नीट काळजी घेई तरी !

नेत्र पाहुनि विशाल घारे
नवनीतासम हृदय पाझरे
सुदती पाहुनि चित्त बावरे

पाहुनि तिर्यक नयनांनीं बघते खालीं स्मितवदनीं !

जें जें वदते सत्य नसे तें
तुला भुलविण्या कैशी झटते
सावध होउनि नीट पहा तें

कुंतल गालावर रुळती समकृति अनुसर सुचवीती
कुटिल कुंतलां दावोनी टाकिल पाशीं बांधोनी
सावधान रे धीर धरी नीट काळजी घेई तरी !

मृदुलकरांनीं गुंफुनि माला
घालितसे जरि तव कंठाला
नटवित आहे वर सोंगाला

करपाशीं बांधुनी तुला शिकविल करण्या प्रेमाला
सावधान रे धीर धरी नीट काळजी घेई तरी !

म्हणणें माझें रुचेल कुठलें
तुला भासतें सर्व चांगलें
नाचविते जरि करुनि बाहुलें
मुललासी तूं प्रेमाला सांगतसे तरि पुन्हां तुला
'सावधान रे धीर धरीं, नीट काळजी घेई तरी !'

---

## १५ रस्त्यांतलें फूल

कोमलहृदयी वेगानें होता चालत वाटेनें
रस्त्यामध्यें पडलेलें पंकीं त्याला सुम दिसलें
कुणी युवतिनें तुला फेंकिलें
म्हणुनि कर्दमीं लोळत पडलें
उर्ध्वदृष्टि असुं गाळित बसलें
सापडशी रे पादतळीं व्यर्थ जाशि कां रसातळीं !
मलीन कुसुमा जरि झालेंसी
घेऊं कसा मी तुज हृदयासी
हीन स्थिति परी योग्य न तुजसी
हळु चिमटीनें पकडोनी दिलें बाजुला ठेवोनी

.....................................

त्याच्या मागुनि रसिक बघे पुष्प पाहुनी गहिंवर ये
भूषविलेसी युवतिकुंतला
म्हणुनी प्रियतम होसी मजला

परी पाकळ्या गळतां, विटला

कुसुमा विगलित सुकलेल्या ! योग्य न भेटीला पहिल्या !

* * *

दुरुनि पाहतो कविवेडा त्वेषें कांहीं पुटपुटला

सुमन पाहुनी मन गहिवरलें

अश्रू टप टप गळूं लागले

हृदयमीलनीं गान स्फुरलें

हवे कशाला रसिक तुला मजविण दुसरे सांग फुला ?

अमर होउनी प्रीतीनें गंधित करुं या विश्ववनें

---

## १६ नको जा गडे अशी प्रीती

मम रूपाला भुलुनी भ्रमतां ? हो ना मजभोवतीं ?

नको जा गडे अशी प्रीती !

जो वीर तळपतो तीव्र फेकितो शरा

त्या कसें विसरला तेजोमय भास्करा

ही वेडी भुलली भिरभिर फिरते धरा

रूप हवें तर फिरा जाउनी रविप्रभेभंवती

हवी मग मीच कशाला ती ?

अस्फुटयौवनलोलुप होवुनि करितां भ्रमरकृती

नको ग बई इश्श अशी प्रीती !

मग हवी कशाला क्षणकालिक माधुरी

ज्या मरण न स्वप्नीं, यौवन प्रतिवत्सरीं
जा प्रेम करा त्या काम्य वसंतावरी
प्रतिमासीं जी अभिनव लीला दावी चिरयौवनीं
वसा हं लुब्ध तिथें होउनी !
धनिकसुता-हो, म्हणुनिच हो ! हा प्रेमझरा चित्तीं
समजली बाजारी प्रीती
मग मीच कशाला ? कवळा रत्नाकरा
तळतमांत अर्पिल रत्नावलि सुंदरा
निश्वासें मळवी मंथित रवि-हिमकरा
सवन कशाची——छे बैरागिण ? जा तर सिंधूतळीं
अतां कशि ! येतां कां जवळी !
कानीं गुलगुल-' आण गळया-, तुज-, केवळ सज-! प्रीती
नको मग अशी कशी प्रीती ?
तुज कलंकयुत रवि गमेल मज पाहुन
मन विटेल बघुनी नटवें मधु-यौवन
किति निष्ठुर निर्गुण रत्नाकर निर्धन
मी गरिब सांवळी परी अलौकिक भासवि तुज चित्तीं
नकोशी कशी गडे प्रीती ?

---

श्री—

## १७ गोपिका-तनयेस—

मेघांतूनि तुषारबिंदु पडती निर्जीव भूमीवरी
जाती वाळुनि, व्यर्थ जन्म दिधला ऐसें कधीं वाटतें
त्यांना सेवुनि शांत मंजुलरवें आनंद दे मानसा
ऐशी त्वत्सम चातकी मिळुनिया झाले खरे धन्य ते
बाला क्रीडत प्रांगणीं बघुनिया मच्चित्तीं जो ठाकला
ऐसा तो पहिला तुषारकण मी मातेपुढें ठेविला
प्रेमानें अवरुद्ध गद्गदवचें जेव्हां तिनें वाचिला
तेव्हां मोदभरें मयूर मनिचा टाहो करूं लागला !
पुष्पें सांग किती असंख्य फुलती रानींवनींही किती
मातीला मिळुनी जगास मुकणें ही तीच त्यांची गती
एकाद्यास मिळे कुणी रसिक जी प्रेमें तया हुंगुनी
देई वास सदैव त्यास हृदयीं प्रेमाश्रुंनीं न्हाणुनी !
जातो वर्षित मेघ सुंदर अशा वारीकणांचे सर
थोडे धन्य तयांत चातकिमुखीं सुस्थान ज्यां सांपडे
' झाले हे कण धन्य ' मेघ म्हणुनी मोदें नभीं गर्जतो
उत्साहें मग तो तशाच विपुला धारा उगा सांडतो !
धारायंत्र मदीय चित्त असुनी त्यांतील प्रीतीजल
आनंदें उडतें नभास अवघ्या भेटावया धांवतें
गेलें वाहत दूर जे तुजकडे मंदानिलाच्यासवें
केले धन्य तुवां ' तुषारकण ते ' ढाळोनि काव्यासवें..

## २८ एक समस्या

कोण जनांना पय दे ? आम्रासव स्फूर्ति दे कुणा गाया ?
परकीय अर्थ कण्वा ! कवयित्री कोण ?

गो–पिका–तनया.

---

## २९ उंबरांतला किडा

उंवरपुष्पांतील किडा,  खुशाल म्हण नच क्षिती मला !
फळसम जगता भासतसे,  पुष्प लाजुनी आंत वसे
स्वरूपलोलुप नटव्याला  दिसतें नच तें भृंगाला
रसिक हुडकतो, त्या न दिसे,  एकांतीं तें मुदें बसे
हरित पांघरी वसनाला,  चकवी साऱ्या जगताला
दुर्मिळ झालें सर्वाला  रत्न लाभलें एकाला
एकलकोंडा वरी दिसे  कीटाला त्या कोण पुसे
उंबर दिसतां परि त्याला  कुतुहलप्रेरित तो झाला
फलांतरि परि तो जातां  गुंगुनि जाई कळि बघतां
हसरें आनन कलिकेचें  सार्थक झालें जन्माचें
प्रेमालापीं दंग मन  नुरलें जगताचें भान
मैत्री ऐशी जुळतांना  किंतू कां मग वदतांना
प्रेमें झालों मी वेडा  खरा उंबरांतील किडा.

---

श्री—

## २० पिपाणी

उकिरड्यांतलें उष्टें सडकें केळिचें पान
चाटित होतें पिसाट कुत्तरें मिटक्या मारून !
तुकडे चावुनि तृप्त जहालें बळ आलें पायां
रांगे तान्हें अंगणिं, गेलें त्याला चावाया.
पानाचा त्या तुकडा करुनी काक करी सुरळी
पिपाणि त्याची मुखीं लाविली, तीच त्रने मुरली
वीज पडोनी दुभंग होउनि जें ठिक्कर झालें
झाडावरती बाभळिच्या त्या काक बहू जमले;
एक कावळा उभा राहुनी मुरली वाजवितो,
कर्कश भेसुर कर्णकटू सुर काढित ओरडतो
आनंदानें सर्व कावळे काव काव करिती
डोळे करुनी हळू किलकिले घुबडें ओरडती !

*　　*　　*

आम्रतरूच्या फांदीवरती आम्रासव पीत
मत्त कोकिला होती मंजुळ गायन ही गात
पडली कानीं कावकाव ती गेली तेथून
म्हणे सर्वजण ऐकत बसती ऐकूं तें गान.
दिसला तिजला एक कावळा वाजवितो गान
रंगावरूनी फसे बिचारी कोकिळ वाटून.
जवळ जाऊनी म्हणे तयाला ' दे मज तव मुरली !
श्रवणमनोहर वादन शिकण्या उत्सुक ही झाली

सर्व काक हे, कोकिल तुजसम कोण गुरू दाता
उगा उशिर कां ! बघुं दे मुरली, शिकव मला आतां '
आश्चर्यानें स्तब्धच झाला ऐकुनि पिकगान
पिपाणि मधुनी कर्णकटू स्वर, करती बेभान !
" निसर्गसुंदर मधुर गळा तव, गाणें तूं गावें
मुक्तरवानें नित्य गाऊनी रसिका सुखवावें
हवी कशाला तुज सारंगी, कशास ही मुरली
काय जरूरी तुज वाद्यांची या समयीं पडली.
जाडेंभरडें नरडें माझें लाज गमे फार
म्हणुनी केली मुरली परि ती जात्या बेसूर
गाणें कुठलें पुरुषजातिला कुठल्या त्या ताना
आजवरी कधिं ऐकलेस कां कोकिल गातांना ?
सर्व जगाचें तूंच करावें रंजन चित्ताचें
तुजसम आम्हां वर्ण लाभला भाग्य असे अमुचें
लागतेस कां नादीं बाई ! जा गा तव गाणीं
कलंक लागे काक-कुलाचा ! जा जा वनराणी ! '
बोलुनि ऐसें मुरली घेऊनि फुंकत तो राही
सुरू जहाली काव काव त्या स्तुतिला खळ नाहीं !
लज्जित होउनि मारि भरारी, मधुपाना गेली
रंगावरुनी फसे बिचारी, काकाला, भुलली !

---

श्री—

## २१ मुग्ध बालिकेस—

सुखस्वप्निंचीं अभ्रें नयनीं तरंगती बाले
अर्धोन्मीलित मनोवृत्तिची तन्मयता डोले.
यौवननवलावण्यरसाच्या लहरीवर कुरळे
निर्झरणीतटतृणांकुरासम मृदु कुंतल रुळले.
बाल्यसरलता, यौवनमाधुरि, भावी वत्सलता
अल्लड चेष्टा, सहज रसिकता संमीलित होतां;
अस्फुटवर्णी दिव्य, मनोहर अंधुक सुरचाप
बघतां भुलते मती विसरते तीव्र मनस्ताप.
पावित्र्याची प्रतिमा केंद्रित ठसलेली वदनीं
उल्हसती जनमनोभावना दिव्य दृश्य बघुनी.
कीटक-कंटक—दुःख-पूर्ण जग अजुनी अज्ञात
तोंवर राही मग्न स्वप्नमय गुंगत खेळांत
स्वास्थ्यस्थितिही दुर्मिळ पुनरपि ! कशास ग फुलसी ?
प्रफुल्ल आशाशून्य दिसे जग ! थांबवितों तुजसी.

---

## २२ आनंदी कवी

कवळुनि हृदयीं कुसुमा ठेविन नित्य तुला मी प्रेमानें
सहन करूं मी विरह कसा तव, जवळ बैस तूं मोदानें
‘ प्रिय वस्तूच्या विरहीं, ’—म्हणती ‘ येतें कवितेला भरतें ’
त्या कवितेला काय जाळणें जेव्हां सोडुनि प्रिय जातें !

तसली स्फूर्ती हवी कुणाला ? हवें कुणाला रडगाणें ?
नलगे तसला कवी म्हणविणें, स्वर्गसुखाला कां मुकणें ?
विरहाचें मज गायन कुठलें सुचणारें, मी गवयाचा
हंसण्यासाठीं जन्म घेतला, वास हवा मज पुष्पांचा.
रडके कविवर खुशाल गाणीं म्हणोत ढाळित अश्रुजल
हृदीं ठेवुनी अमर करुनि तुज, हंसेन मी ही चिरकाल.
नाकें मुरडुनि वेडा ठरवो, हांकुनि देवो जगांतुनी
तुच्छ मानुनी हंसेन त्यांना, हृदयाशीं तुज कवळोनी.
उगा उशिर कां ? सोड लाज ही—चल धांवत ये वनकुसुमा !
मी हंसणारा, हंसविणार तूं ! दाखिव मजला निजप्रेमा !

## २३ गाननिवारण

छे छे आतां नको शब्दही एकहि कविता नको नको
माझ्यासाठीं कोमल हृदया कष्टविणें तें उगा नको
झाल्या तुजला उगिच यातना मुरली कां नच मम फुटली
गान ऐकशी वेडें म्हणुनी इतर जनांनीं त्रासविली !
हृदय-जलाशय ओघ तयाचा तुंबविणें हें कठिण किती
प्रयत्न वांया जाउनि फुटतो बांध फोडुनी वायुगती !
एकवार तर वाटे मजला कविता तुजला लिहूं नये
विचार मनिंचे सांगुनि वेडे क्लेश मनाला देऊं नये !
एकवार पण वाटे मजला सतत लिहाव्या तुज कविता

श्री —

त्याचें उत्तर म्हणुनि तुझ्याही येतिल केव्हां तरि हातां !
जगास मिळतिल सुंदर कविता, नसे तयाचा मुळिं तोटा
स्वार्थ साधुनी परमार्थाचा मार्ग आवडे मज मोठा ! !
परंतु असले विचार छे छे ! या वेळीं नच कामाचे
दूर लेखणी फेंकुनि आतां तुकडे करतों काव्याचे
मी तर पडलों फटिंग भटक्या कींव कशाला करिसी बरें
मित्रांची कां मर्जी मोडुनि उगीच कविता लिहिसी बरें !
असें कोणत्या झाडाचा मी पाला म्हणुनी तुज याव्या
हृद्योर्मी या प्रचंड वेगें खडकावरती धडकाव्या ?
स्वाभाविक जरि वृत्ति मनाची लोकास्तव स्थिर वृत्ति करी !

.....................................................

अरे पुन्हां कां चोंच उघडसी ! छे छे गाऊं अतां नको
खीळ मुखाला घाल. व्यर्थ रे सुहृदाला तूं दुखवूं नको
पण छे कुठलें ऐकणार तूं ! जन्मलास रे गाण्याला
स्वभाव सोडुनि वागशील का ? कंठ जरी कोणीं धरला !

## २४ काय हरवलें ?

दऱ्यावनांतुनि बहु भटकलों माझें मजला गवसेना
वृत्ती सारी होत बावरी काय हरवलें समजेना !
सकल वस्तु ह्या जशा तशा परि कांहीं नाहीं मज वाटे
परि हुडकाया जाऊं कोठें ? विश्व जाहलें मज खुरटें
कोणी नेलें कैसें गेलें कसली जादू मज पडली
सांगिल कोणी फोडुनि सगळें ऐशी आशा नच उरली.

निर्विकार मुखमंडळ दिसतें अंतर परि तें नच कळतें
रुचती कोठुनि शब्द बावळे, विटुनी कोमल मन जातें;
कांहिं न कळतें बुद्धि खुंटते सैरावैरा मन पळतें
लेखणि हातुन गळून पडते, दृष्टी आकाशीं वळते.
नभ तें लपवी काय बिचारें—पोकळ डोली भास जनां
मग तें माझें कुठें दडालें ? तें कां मजला समजेना !
सिंधुजलीं तें काय बुडालें येइल कां नच तें हातां
सूक्ष्मदर्शकीं थेंब जलाचा तसाच सागर मम चित्ता !
अन्न रुचेना चित्त रमेना, कांहीं केल्या करमेना
कांहिंतरी मज सोडुनि गेलें, काय परी तें समजेना !

---

## २५ कुसुमास

व्यर्थ लाजसी कुसुमा कां तूं सत्य बोलण्याला,
कीटक आहें खराच मी पण शंका कां तुजला ?
भीती वाटे तुला काय मी क्रोधें बोलेन
छे छे फसलिस अगदीं तूं पण, किति हें अज्ञान !
कीटक म्हणतां प्रौढी वाटे, मग कां लाजावें
दूत असें मी रम्य फुलांचा काम हेंच ठावें
काव्यतरूवर कविता पुष्पें असंख्यात फुलतीं
रम्य कल्पना पराग मजला अर्पण तीं करितीं

चाखचाखुनी बहुत फुलें मीं प्राशन मधु केला
पराग-ओझें गोळा केलें देण्या कलिकेला !

*           *           *

पात्र न कलिका कोणी दिसली परागकणपात्र
ओझें वाहूं किती वेळ मी, अस्थिर मन मात्र !
होती कलिका अस्फुट तिजला अर्थ न मुळिं कळले
प्रफुल्ल दुसरी वर्णचिकित्सा करितां मन विटलें !
अर्धोन्मीलित पराग मागे नटवी ती कोणी
भडक रंग परि दुर्गंधा ती—गेलों मी पळुनी !

*           *           *

चंपककुसुम ! तव गंध दरवळे चित्ता दे स्फूर्ती
'मनोरंजना' करितां तूं, जन 'आनंदीं' डुलती
सुवासलोलुप कीटक म्हणुनी आलों या ठायां
चाखुनि मधु तव, पराग-ओझें आलों उतराया !
पर्णांतरि परि वदन लपविसी लज्जित कां होसी
पराग फुटती वायां जाती मग कां हळहळसी !
पराग फुटतिल, मनास तेव्हां होइल पस्तावा
तुला सांगतों ! खुशाल आतां क्रम तव चालावा
म्हण तूं कांहीं गंध फेंकहि, जोंवरि निजवदन
लपविसि तोंवर असाच राही कीटक हा दीन !

# २६ कांटेधोतरी

कांटेधोतरिचें रोप बसलें होतें गुपचूप
निवडुंगाच्या झुडुपांत होतें रुजलें दुःखांत
चुळबुळ थोडी करतांना घुसती काटे डुलतांना
नांगी विंचू हळुं मारी सर्प विषारी डंख करी
कुठवर सोसे त्रास तिला जीव नकोसा तिज झाला
रसिक जनांना रुचत नसे ढुंकुनि अलि मुळिं बघत नसे !
कोमलहृदयी बाल कुणी साध्या कुसुमाला भुलुनी
गेला जवळीं तोडाया कांटे दिसतां घेइ भया
जन्म चालला पुष्पांचा जीव घाबरे रोपाचा
झुडुपाच्या त्या बाजूनें वाहे वारा जोरानें
धांवत येउनि वर पडला लहान केसांचा गोळा
उलगडला तो भूमिवरी सुरवंटाचें रुप धरी !
कुरतडतांना हळुं पानें रोप विवळतें दुःखानें
दूत यमाचा तिज वाटे केंस बोचतां कंड सुटे
सोडुनि खाणें त्या वेळां कीटक तेव्हां वदे तिला.
'कुरतडतो जरि तव पानें नव नव फुटतीं जोमानें
पर्णरसातें सेवोनी फूलपांखरूं होवोनी
चाखूं मधु तव पुष्पांचा दिवस खरा तो मोदाचा !'
शोषण करतो जीवाचें तुकडे खातो पानांचे
अस्थीपंजर परि उरला प्राण लागला कंठाला
शुष्क होउनी देठ धरी म्लान पुष्प तें शिरावरी

* * *

वायूसंगें पुन्हां उडे बागेमध्यें किडा पडे
फेकुनि सुकल्या चर्माला पतंग पिवळा तो बनला
नटवी विनवी वाणेरी मनाप्रती ये ओंकारी
अलिसम सुंदर रूप नसे गुंजारव तो विदित नसे
गुलाब जवळी तो जातां क्रोध अलीच्या ये चित्ता
मारुनि सोंडेचा भाला दुखवी कोमल पंखाला
अल्प आयु तें व्यर्थ पळे तळमळ चित्तीं, धैर्य गळे
भटकत भटकत दिसे तरी फूल धोतरी कांटेरी
रंग रूपामधिं भेद नसे एक जीव तीं दिसतिं कसे
मृत्यूसमयीं दोघांची भेट जहाली प्रेमाची
गळुनि पाकळ्या फूल तुटे पतंग शोकें उरीं फुटे !

---

## २७ मधुकरीस भेट

कवयित्रींची असशी राणी
अप्रतिरोधित वाहे वाणी
काव्यानंदीं वाटेकरिणी
तुला करावी म्हणुनि आतां धाडुनि देतो या कविता १
मित्रवरानें एका कविनें
निर्मियलीं जीं सुंदर सुमनें
गुंफियलीं जीं स्वप्रतिभेनें
चाख मधू या पुष्पांचा सोड खुली मग निज वाचा ! २

रसिकवरे ! मग तूं गावोनी
टाकावें मन मोहित करुनी
परी असे मम निर्बल वाणी
गुंजारव तव श्रवण्याला धाडितसे ही सुममाला ! ३

## ८ गुलाबाची कहाणी

जें स्मित बघतां सृष्टि हसे कविचित्ताला जडे पिसें
काव्यसागरा ये भरती लहरी नाचति बागडती !
तें स्मित गेलें हारपलें तेज सृष्टिचें मावळलें
कविमन झालें उद्विग्न पडे न कोठें त्या चैन
पूर नदीचा ओसरला उरल्या शिंपा वायु शिला
घाण जलाचीं किति डबकीं मधुनी डोकाविति वरतीं
कुठल्या लहरी त्या सुखदा कुठला मंजुल नाद तदा !

* * *

कलिका खुलतां मोद भरे मिटतां परि ती दुःख उरे
पळवुनि नेली शांति तिनें स्मिताविना जग शून्य बने !
' क्षणभर दावुनि मधुलीला लपवी कां निजवदनाला '
प्रार्थितसे किति जाईला गुलाब अंतरिं बावरला !
' हास्यासाठीं जग वेडें हांस एकदा हांस गडे
सांगत असतां रात्रदिनीं ! कां नच खुलसी तरि अजुनी !
[illegible]धित तव तनु पाहोनी माळी मोहित होवोनी
[illegible]जजवळी तुज आणितसे चंचल मन परि येत नसे !

* * *

श्री—

हांस हांस तूं हांस आतां
वसंत येण्याची सुचना
भाट सृष्टिचा बसे वनीं
पर्णाच्छादनिं गुरफटुनी
लज्जा रुसवा मान पुरे,
आर्जव करुनी बहु दमला

धीर न धरवे बघ जगतां
हास्य तुझें हें गमे मना
चंचुपुटातें उघडोनी.
लपसी लज्जित होवोनी
ठावे पुरते हे नखरे ! "
परी न उघडी वदनाला !

*　　　*　　　*

गुलाब कंटकयुत होता
अनुरागाची नव लाली
'हास्य हास्य' हा मंत्र जपे
झुरणी लागे जीवाला
पतंग अग्नीवर पडला
पतंग होई खाक मढें
कोणी न जवळी बघुनि असें
उमल उमलतां ती कलिका
सुवासलोलुप किति भ्रमर
आनंदानें हंसे खुले
या लीलांस्तव किति झुरला

भीती कलिकेच्या चित्ता
क्रोध वाटुनी बावरली
हास्य परी तें कुठें लपे
गुलाब कोमेजुनि गेला !
तेज चढे परि वन्हीला
ज्योत परी ती उंच चढे !
डोळे वरती करीतसे
गंधें मोहितसे रसिका
विरव्या घालति बहुवार
भगिनीसंगें रमे डुले
गुलाब कोमेजुनि गेला ! ! !

---

# २९ सदाफुली

वसंत येतां कळ्या विकसल्या, मुदें मोगरा मनिं हंसला
गुलाब फुलला चांफा डुलला, मोहर आला आंब्याला
पुष्पभरानें जाई लवल्या, उपवन मोदें करि लीला
दरवळला मग गंध चहुं दिशीं, तुष्टी देई रसिकाला !
तोंड वासुनी गरिब बिचारें सदाफुलीचें फूल बसे
सुगंध नाहीं, वयस्य नाहीं, जीवित कंठी कसेंबसें
वसंत देइल काय तिला, ती जाई मैत्रिण काय करी
उसना आणुनि गंध कुठवरी रसिकजनांना तुष्ट करी
सायंकाळीं तिला विचारी, भोळी जाईची वेली
' प्रतिदिनिं कां नच बहर येइ तुज मजसम, सांगे सदाफुली ! '
तेंच तेंच सुम सदा उमललें, एकहि अस्फुट नवकलिका
नाहीं दिसली अजुनी मातें, वसंत तुजवर कोपे कां ?
एकहि कलिका नवीन नाहीं, शुष्क फुलांचा हा झुपका
दाखविते परि ती जाईला, दयार्द्र होते मृदु लतिका
रसिक जनांनीं तोडुनि नेलीं गंधित जाईचीं सुमनें
तोंड करी वरि सदाफुली परि, फुलें तियेचीं कोणि न ने !

---

श्री—

## ३० राजा

‘ ताई ! माझें चित्र पहा हें किती तरी छान
टाळ्या पिटशिल मला वाटतें हर्षें पाहून
दिवाणखान्यामध्यें ठेविलीं चित्रें टांगून
भिकार सगळीं एक तरी कां सुंदर याहून
बघ हा राजा घोड्यावरती ऐटिंत बसलेला
पगडीमध्यें मोत्याचा बघ तुरा खोवियेला;
लाल निळ्या तूं पेणसिलीचा तुकडा फेकियला
घेउनिया तो पठ्ठ्यानें बघ राजा रंगविला !
अबलक घोडा डौलदार किति हो ! हो ! फुरफुरतो
त्यास दिलेला रंग जांभळा किती अहा खुलतो
आवडलें ना चित्र तुला हें सुंदर खुलणारें
बक्षिस घे हें ! तुला नाहिंतर कोठुन मिळणारें !!
अबोल ताई, चित्र वाटलें मनीं भरे फार
धांवत गेला चेंडू घेउन खेळाया दूर.

× × ×

खेळुन आला सायंकाळीं माधव दमलेला
जेवण होतां बिछान्यावरी जाउनि तो पडला
सर्व दिवसभर केलेल्या त्या गमती आठवुनी
रम्य मुखावर मंदस्मित तें क्षणभर ये खुलुनी
‘ चित्र काढलें ! कुठें बरें ! हो—बक्षिस ताईला
परत आणुं कां ?—दान दिलें—छे ! विचार मनिं जिरला;

डोळे भरुनी बघूं एकदां मग नच बघणार '
असें वाटुनी धावत गेला उत्कंठा फार.
पाय चेंगरे यमी ओरडे, परि थांबे कोण
धांपा टाकित उभा राहिला खोलिंत जाऊन !
मान वळवुनी पुस्तक ठेवुनि ताई त्रासानें
' त्रास देसि कां भलत्या वेळीं ? ' बोले रागानें
' काय पाहिजे सांग लवकरी, वेळ किती गेला
पेपर आहे उद्यां—पहा बघ सांगिन आईला—
ए आई ग ! '—" काय ताई हें, राजा पाहूं दे;
एकदांच ग, देइन फिरुनी ! दे ग, लवकर दे ! "
' राजा ? राजा ? कुठला राजा ?—हंहं तो तुकडा !
केरामध्यें काचिंच फेंकला—रडतो ? हा वेडा !
जाऊं दे तें गेलें तर तव भिकारडें चित्र
चित्रांचें हें पुस्तक देतें; रडूं नको मात्र
हं-हें वे-ऑं ? ? भिरकाविसि कां फाडुनि-माजोर ! !
चल जा येथुनि अभ्यासाला वेळ नसे फार.
' भावावरती प्रीति करावी दुखवूं त्यास नये
भावावरती —जा—जा येथुनि—दुखवूं त्यास नये. '

* * *

केविलवाणी मुद्रा झाली डोळे डबडबले
हळूं परतला देत हुंदके माधव त्या वेळे
सांपडतें कां केरामध्यें शोधुनि पाहूं या
टोपलींत तो हात घालुनी लागे हुडकाया.

'महाद्या तेथें काय पहासी तूं अंधारांत
ये इकडे का—मीं येऊं अं ? दाखविण्या हात.'
कर्कश ऐकुनि स्वर बाबांचा हताश होऊन
गुपचुप गेला गरिब बापुडा निजला जाऊन
अपुल्या कृतिची पारख कोणा जगांत या नाहीं
मनीं पुटपुटे, कोमल मन तें बावरुनी जाई.
निद्रादेवी हळूं उतरली पंखां पसरुन
छाया घन मनिं पडूं लागली, प्रकाश लोपून !
देत हुंदके, रडें दाबुनी तसाच तो पडला
रडतां दमला कुणा न कळलें केव्हां तो निजला !

---

## २१ अभिनव काव्यमाला

फुलें विकसती, हंसती गाती अपुल्या नादांत
अलिगण गुंगत, कलरव खग करी लपुनी पर्णांत.
पर्णाच्छादन-बुरख्यामधुनी वायुलता बघते.
शून्य लावुनी दृष्टि आकाशीं जुई पहा बसते.
हंसे मोगरा, सडा पसरला प्राजक्ताभवतीं
उपवन शोभा वर्णाया नच क्षम मम मर्त्य मती.
अगम्य जागा इतर जनांना तटबंदी केली
वायूलहरी गंधलवा दे तृप्ती नच झाली.
रम्य उपवनीं अशा पातला बागवान कोणी
तोडुनि सुमनें माला बनवी दाखविण्या भुवनीं.

सदाफुलीचा झुपका तोडी गंध न कांति जया
तीव्र विरोधा दाखविण्याला नेलें त्या ठायां.
जाई लपली बहु शोधिली, परि नच सांपडली
गंधावरुनी स्थान न कळलें, वृत्ती बावरली.
सुटे विचारित सकल फुलांना, मृदुल गंध कुठला ?
ओघ दिसे परि उगम कळेना, दावा सरितेला.
सदाफुलीला ठावा होता उद्गम गंधाचा,
भरील रागें असें वाटुनी उमटेना वाचा
सदाफुलीची आशा मोठी जाईनें यावें
मालेमध्यें अमर होऊनी गंधा विखरावें
म्हणुनी पुष्पें थोडीं देईं लवकर माळ्याला
नाहीं तर दे मजजवळी मी देइन गे त्याला
अशी प्रार्थना सदाफुली करि उत्सुक नयनांनीं
वाट पहाते उत्तर केव्हां पडतें तें कानीं !

## ३२ वैदू

निबिड काननीं वैदू आला नाकाडोळ्यांचा
फेंकित चाले तीक्ष्ण नजर तो भासच कोल्ह्याचा.
फुटकी लोंबे खांकेमध्यें झोळी ठिगळाची
घामट वाटे घाण साचली साऱ्या जगताची.
लिंबावरच्या गुळवेलाला पाहुनि तो हंसला
मोद दर्शवी भाषेमध्यें हेंगाड्या अपुल्या !

श्री—

पुरा चघळला स्वस्थ करांतिल भाकरिचा तुकडा
कुऱ्हाड घेउनि सपसप कापी वेलाच्या काड्या.
परावलंबी जीवन त्याचें कंटाळा आला
गुळवेलाला जीव वाटला उपयोगी पडला.
झुडुपांमध्यें लपलेली ती सोमाची वल्ली
अज्ञस्थिति ही गुळवेलाची पाहुनिया हंसली
म्हणे तयाला, ‘ व्यर्थ खुळ्या कां जाशी त्याजवळी
लबाड तो, तुज विकील सांगुनि सोमाची वल्ली
मूढ जनांना असें फसविणें उचित तुला नाहीं
कटु गुळवेला कटु जातीचा उगाच तूं राही.
कटु लिंबाच्या सहवासें तूं शुष्क कटू झाला
रम्य चंद्रिका सेवन माझें, अमृत रस बनला
राजपुरोहित राजवैद्य वा येईल नेण्याला
बटव्यामध्यें तुलाहि घेण्या विनविन मी त्याला. ’
त्या वैदूला दुसरी दिसली सोमासम वल्ली
गुळवेळाला फेंकुनि त्यानें, उपटुनि ती नेली.
मुळापासुनी तुटलेला तो होता गुळवेळ
गेला मरुनी, झालें जीवन मातीहुनि फोल

---

## ३३ बकुलमाला

बकुलकुसुममाला गुंफितसे बाला
तटिनि काननाला शोभवो तनूला !
जलदहृदयिं चंचला इंद्रचाप नभतला
कंठ भुजीं वेढिला !
मधु वसंत पातला आम्रविटपिं कोकिला
गात मंजु बोला !
लवत कुसुमिता लता पवन बघुनि लाजतां
देइ हृदय झेला
कपोतयुगुल प्रांगणीं दंग चंचुमीलनीं
मंजुनाद ऐकिला
अधीर उत्सुका मनीं अश्रुसुमन ढाळुनी
पदर चिंब केला !
सुमन म्लान हाय तरी रुचिर प्रेम गंध विखरि
हृदयचिह्न बाला अर्पिते प्रियाला !

---

## ३४ वदनपिपासा

रम्य वदन तव सतत पहावें आशा मम चित्तीं
उपजे आशा मम चित्तीं
मूर्ति चितारुनि मनीं ठेविली परि न मिळे शांती !
प्रीतिज्वाला उरीं भडकल्या जाळित हृदय किती ! धडधड,

श्री—

स्मृतीजलानें त्यास विझविण्या केले यत्न किती !
हृदय पेटलें, दग्ध जहालें, दिगंतरा जाती, अणू अणू,
चित्र न जळलें सोज्वल झालें, चमके किति कांती !
सायंकालीं शशिशुक्राची पाहुनि रम्य द्युती । गगनीं,
रम्य निटिल तव गगनीं दिसलें बावरलों चित्तीं !
परि तव मजला नयन न दिसले त्यांना कां मिटसी ! अशी तूं,
लबाड तारा, प्रकाश सारा चोरुनिया नेती !
एकवार तर हेवा वाटे मन्मानिं इंदूचा ! सुखी त्या,
तारास्कंधीं कर ठेवोनी मार्ग क्रमी पुढचा !
ओणवुनी तीं जलीं पाहतीं प्रतिबिंबित वदनें, आपलीं,
पल्वलदर्पण भूमी लपवी पल्लववस्त्रानें !
भूमितिमध्यें वर्तुळ कुठलें कुठल्या कंसतती, यापुढें,
वक्रभ्रूकुटी वर्तुळ वदनें अस्थिर करिती मती !

## ३५ चंचल जलधर

' जलधर घनतर पाहुनि गगनीं
भीतीनें ही कंपित धरणी '
कृष्ण वनाला दूर सारुनी
चंचल चपला चमके मधुनी ! १
सौदामिनिचा विरह न सहुनी
आक्रंदन करि मेघ गडाडुनि
मधुनी चमकुनि सृष्टि भयद करि
भीषण भासे कुटिला रजनी ! २
भणभण वणवण वात वाहुनी
धूलि कणा दे वर भिरकावुनि
निष्ठुर वायू पुढती करुनी
जलधर घनतर जाई पळोनी ! ३

यन अंध जरि धूलिकणांनीं
नांबुसाठीं राही बसुनी

चातक चंचू वरती करुनी
जलधर वनतर जाई पळोनी—४

---

## ६ माझा मृत्यू

भूमीवरतीं मरण नको मज मृत्यु येउं दे जलडोहीं
मध्यसागरीं नीच मानवा थारा जेथें मुळिं नाहीं !
भीषण नर्तन लाटांसंगें करिल कलेवर मोदानें
देईल धडक्या तें खडकाला धडाधडा मग हौसेनें !
डोळे फाडुनि बघतिल मासे येइ काय हें आज नवें
धीर धरोनी चढुनि खेंकडा तुकडे तोडिल नवे नवे
जलचर हंसवित मीहि हंसत मग जाऊं अगदीं खोल तळीं
सागरवेली स्वागत अमुचें करतिल घालुनि हार गळीं !
वाट दाविती अनेक जलचर दिवट्या हातीं घेवोनी
वेतन वेती परी अगोदर लचका सुंदर तोडोनी
नाना रत्नें जिथें विखुरलीं मिळे बिछाना निजण्याला
नावेचा तो फुटका नांगर उशी मिळतसे डोक्याला !
अंगावरती वेली दुलई, सृष्टि म्हणतसे अंगाई
निद्रा लागे अनंत रात्रीं झोंपमोडही मुळिं नाहीं
असा मजेचा मृत्यु हवा मज, कोण भितो त्या मरणाला
आनंदानें जाइन तेथें भिऊं कशाला सौख्याला !

*  *  *

नसे नशीबीं मरण सागरीं ? असो येऊं दे वनीं तरी
निबिड तरूंच्या राजीमध्यें निर्झरकाठीं कुठें तरी !
गळून पडलीं पिवळीं पानें, मिळे तयाचें अंथरुण
कोळी जाळें विणील वरती होइल खासें पांघरुण.
सळसळ करूनी नाग येऊनी छत्र फणेचें वरी धरीं
घों घों करुनी भोंवति माशा गोष्टी करतिल परोपरी.
माना घालुनि लता खालतीं, टेकुनि वृक्षांवर गाल
कींव येऊनी अश्रू ढाळित उभ्या राहतिल चिरकाल !
फांद्या कडकड करुनी तरूवर गाति मनोगत या वेळीं
पायाजवळी स्तब्ध वसोनी मूकरुदन करिती वेली !
मंजुरवानें गाणीं गातिल अखेर मजला पक्षिगण,
धरील निर्झर ताल हळू जणुं स्वर्गीं गाई देवगण;
मयूर तांडव करील तेथें, मैना गातिल ही कांहीं,
गातिल वेली, गातिल तरुवर, सुस्वर कोल्हे घुब्रडें ही
गिरिवर देऊनि प्रतिध्वनी मग गाना उत्तेजन देतो
गाइल सगळें रान मला मग अशा मृत्युला कोण भितो !

× × ×

नसेल हेंही सुख दैवीं तर मृत्यु येऊं दे घरीं मला
मांडीवरती शिर मातेच्या ठेवुनि सोडिन प्राणांला.
कुरवाळिल मम केस पुन्हां ती मुख प्रीतीनें चुंबोनी
अंग लागतें कढत तरी कां पाहिल आशा धरुनि मनीं
माया वेडी आशा थोडी, प्रेमपाश करि मन वेडें
डोकें आपटुनि ताडदिशीं ती रडेल फोडिल हंबरडे !

फुटेल पाझर दगडालाही काय कथा मनुजाची
प्राणिमात्रही रडेल किंमत कळुनी प्रीतीची.
पिता बिचारा विषण्ण होउनि राहिल स्तब्धच बैसौनी
कुणा दिसे जो प्रचंड वणवा धडधड पेटे क्षुब्ध मनीं
अंतःकरणा पीळ पडे तो दिसेल कैसा बाहेरी
विरहाग्नी परि आंत धुमसतो, जाळित जातो खोलवरी
हातातोंडा मुलगा येउनि ऐन समयिं तो कसा गळे
गेलीं विलया सुखस्वप्नें तीं, उमेद मनिंची खाक जळे !
छे छे त्याचें वर्णन करणें शक्य तरी कां पंगु मना
वाणी थकते मती गुंगते रक्त गोठतें, क्लेश मना !
टळला शत्रू हा प्रतिस्पर्धी, ' हंसतिल कोणी मोदानें
' गेला आपला मित्र बिचारा ' रडतिल कोणी दुःखानें.
आनंदानें मरेन मी पण विरहदुःख मम लोकाला
करील वेडें असें वाटुनी कांचरतों मी मरणाला !

× × ×

भगिनी तेव्हां गरिब बापड्या बसतिल दोन्हीं बाजूला
अश्रू ढाळित बंधूसंगें पुनीत करतिल कायेला.
प्रेमाश्रूंचें स्नान लाधण्या पुण्य लागतें जन्मींचें
या प्रेमाची फेड कराया प्रेम लागतें स्वर्गींचें.
मम विरहानें बारिक झाला, मिणमिण करितो एक दिवा;
नयाण शांती, सर्व स्तब्धता, भेसुर होईल देखावा
या समयीं मम काव्य-सहचरी म्हणेल कवनें शोकानें.
दुःखभरानें हृदय विदारुनि उडेल प्रीती जोरानें

श्री—

येईल गानीं खरें काव्य तें, नसे तयाला गणमात्रा
हृदय बोलतां होईल कविता, जी पिळवटते जनचित्ता !
परंतु मोहक त्या गानाचें वेड लागलें जीवाला
गान ऐकण्याविना सुचेना दुसरें कांहीं चित्ताला
मरेन-मग मज मिळेल कोठुनि ! मुकेन मी त्या कवितेला
असें वाटुनी अस्थिर होतों ! कांचरतों मी मरणाला ! !

~~~~~~

## २७ जादू

करवंदीच्या जाळींत — घोस लोंवती रसरसले
कांटे चुकवुनि — अलग झेलुनी
मधुर रसा लुटवील अशी — जादू कोठें मिळे कशी ! १
अस्फुट नलिनीकलिकेंत — पराग झोपेंतच हंसले
सुमदल विकसुनि — सुगंध विखरुनि
परागकण वर उधळि अशी — जादू कोठें मिळे कशी ! २
खोल मनाच्या तिजोरिंत — रत्न प्रीतिचें दडवीलें
कुलुप तोडुनी — प्रभा फांकुनी
रमणमानसा रिझवि अशी — जादू कोठें मिळे कशी ! ३
ओष्टपुटांच्या खिंडींत — शब्द बावरे अडखळले
कपोल फुलवुनि — लाज पळवुनी
नादें अवनी भरिल अशी — जादू कोठें मिळे कशी ! ४

~~~~~~

## ८ जादूला सूर

जादूची तव पुंगी ऐकुनि हृदयीं उठल्या ऊर्मि खळाळुनि
नसे स्पष्टता, कुठुनि मूर्तता
अमर लेख हृदिं ठसवि अशी पुन्हां जादु ही मिळे कशी ! १
विकार खबदाडींत झोंपला स्वर ऐकुनि हा मनिं खडबडला
चित्तभुजंगा, आणुनि रंगा
नागसुरावर घुमवि अशी—पुन्हां जादु ही० २
कुठुनि आणिली जादू भ्रमरा कोण्या कळिच्या लुटलें बहरा
वाटे येउनि, रसा चुंफुनी
फुंकावी नळी कशीबशी ३
जादूनें तव जादूगारा सुखमय केलें या संसारा
पुंगी स्वर्गिय, गगनाविहारा
पक्ष नवे मज देइ अशी—पुन्हां० ४
जादु नव्हे संजीवनवल्ली क्षणांत अवनी बघ पालटली
पूर नदाना, बहर लतांना
जोम तरूंना देई अशी—पुन्हां जादु० ५
धुरीण केवळ कां ? जग सारे चैतन्याचें संचरलें वारें
रूढि शृंखला, बघ ह्या गळल्या
समाजबाहू स्फुरवि अशी—पुन्हां जादु० ६
निराशांध मी भीषणतिमिरीं चांचपतों वन—जग कांटेरी
तिमिरध्वंसका, किरणशलाका
चमकुनि मार्गा दावि अशी—पुन्हां जादु० ७

श्री—

अजवर बेसुर कानीं पडलें　　वाटे जग हें भेसुर सगळें
मधुर मंजुध्वनि, पटल झुगारुनि
रम्य जगाला दावि अशी—पुन्हां जादु० ८
लहरी पुंगींतुनि गुणगुणल्या　　खोल प्रतिध्वनी मनीं उमटला
तव जादूला, सूर हा दिला
मूढात्म्याला उठवि अशी　　पुन्हां जादु तव मिळे कशी ९

## ३९ मी कसला कवि !

मम हृदयनभीं जी चमके तारा कविता
प्रतिबिंब नाचतें पुलकित वारीं होतां
जलिं दिव्य लहरिच्या भग्न शलाका दिसती
मग कशी कल्पना गोल चकाके वरती
कल्पना मनीं काव्याची चमकली
बहु कष्टें बिंबित केली पल्वलीं
माधुरी न भाषेमाजी उतरली
अज्ञानपवन परि करी तरंगित जल तें
मग उमटे कैसें हृदया जें पटलें तें ! १
जी रम्य सृष्टि मम दिव्यदृष्टिला दिसली
कुणि मनःपटावर नकळे चित्रित केली
तें वर्णन करण्या शक्त न जगतीं वाणी
तें चित्र हवें कां ? हृदय पहा उकलोनी

तें दिव्य चित्र सृष्टीचें वर्णितां
संपतो कोश भाषांचा बोलतां
परि रसिका पटतें चित्तीं पाहतां
जें काव्य दृष्टिला दिसलें सृष्टीमधुनी
तें चित्र मनींचें उमटे कैसें कवनीं ! २
गिरि येतां मार्गी सरिता वळणें घेते
खिंडींत तनुलता जर्जर कृशही होते
मृदुसिकतेमधुनी नाचत गाणीं म्हणते
परि कडा भयंकर बघुनि भयें ओरडते
हा अरसिक गिरि ये मार्गी पलटली
ही टीका–खिंडीमाजी वाळली
ही स्वार्थी जगता बघुनी कांपली
ही उत्सुक जाण्या अनंत तेजोभवनीं
ती कोठुनि गवसे नीरस माझ्या कवनीं ३
जें मनीं खळबळे तसें न शब्दीं वठतें
मग कवि मी कसला ! काव्य कसें मग होतें ?
मनिं जनन कल्पना घेते सुंदरी
परि फुटे मूस भाषेची अंतरीं
पाझरे दिव्य रस तेव्हां जगभरी
ती येत मुखांतुनि अष्टावक्रा गमते
मनिं तिलोत्तमा परि कुब्जा जगता गमते. ४
मम हृदयीं स्फुरली अवचित प्रेमें वीणा
झंकार तृषित परि प्रतिरव मुळिं गवसेना

कां समानशीला स्फुरे न दुसरी तारा
आक्रोश वृथा तव झाला वीणे सारा !
जो हृदयीं रडुनी श्रमला नाद तो
मम कवनीं नाहीं भरला अजुनि तो
सोवती कळेना केंव्हां लाभतो
ती स्मृति नादाची पुलकित मन करि अजुनी
परि कसें उमटवूं हृदयगान तें कवनीं
जरि प्रचंड लाटा सिंधुजला क्षोभविती
परि तळींच रत्नें, फेस मात्र ये वरती
ते प्रचंड जलचर खोल जलोदरिं भ्रमती
परि क्षुद्र खेकडे शंख किनाऱ्यावरती.
किती विकार हृदयीं उठले क्षोभले
काव्य ना परी वृत्ताला गवसलें
कटुदोषगरळ त्यामाजीं ओतलें
तें कसें जनांना कळे वसे जें हृदयीं
मी काय करूं तें वठतें नच मम काव्यीं !
प्राजक्त बहरला रम्य उषा जइ हसली
तरु पवन डोलवी फुलें धरेवर पडलीं;
परि तृप्त न दृष्टी, मनुजहस्त सुम उचली
मृदुकांति लोपली, पुष्पें सुकलीं मेलीं !
कल्पना मानसीं फुलतां हांसते
ती कवनीं खचुनी स्फूर्ती फेकिते
कांतिनें अखिल जगताला भुलविते

ती मनांत सुंदर, परि जन स्पर्शें मेली
मग दिसेल कैशी जनां मला जी रुचली ! ७
हा ईशस्वरुपी तळपे भास्कर गगनीं
हा पवनगती घन ( माया ) धांवे वरुनी
मम मनोभूवरी पळे कल्पना—छाया
ही प्रतिभाबाला रांगे तिज पकडाया;
सर परी तिला मायेची कां आली
नच चंचल घनछाया ती गवसली
पळपुटी हूल दावोनी लोपली
जें ह्रदया कळतें, तें नच उमटे कवनीं
मी कसला कवि हो कीर्ति कशाला भुवनीं ! ! ८

---

## ४० चिता-तारका

गातात तारे डुलतात वारे, चिता एकली नाचते फुरफुरे
वनें लुप्त तारा, श्रमें स्तब्ध वारा, परी शवकपालीं कढे रक्तधारा !

* * *

चढे तार चित्तीं, स्फुरे प्रेमतंत्री, तारारवाला सुर लावियेला
तृप्ती परी ना, नभीं दूर राहे, चिरसंगमाला कवि हा भुकेला
इंदु-कर-रज्जुला धरी, सज्ज झाला, चिता ओढते या मना भूतलाला
तुटे तार चित्तीं, बने मूक तंत्री, जगाला त्रिटे तारका प्रेमला !

* * *

तारकानर्तना, प्रेमसंमेलना, मुग्धसुखसेवना निपजली वासना
विफल परि कामना, ठरुनि वच जल्पना, चिता बांधिते वन्हिपाशीं मना !
कल्पनासृष्टिची मूर्त प्रतिमा दिसे जीव परि हा फसे, दूर नेली
मूर्तता नष्टली, स्मृति हृदीं राहिली, अश्रुसुम प्रसवली, अमर जनिं जाहली.

* * *

जीं हृदीं कवळली कल्पनेची कळी, रूढि घेई बळी, मातली स्वैरिणी
धूम्र-चक्रावरी जीव स्वारी करी, झांप टाकी चिता क्रूर ती वाघिणी.
प्रेमवस्तूविना जन्म झाला सुना, आग भडके मनीं, बाह्य वाटे फिकी.
दुःखि जीवामुळें विश्व शोकीं बुडे, मुर्दे नाचते राक्षसी नर्तकी.
स्फुंदतो किंचळे गिरिदऱ्या भटकतो, प्रियवियोगें पिसा वायु झाला
पुसुनि दंव आंसवें तारकाक्रंदनीं, पदर नव धरणिचा चिंब झाला !

* * *

गावोत तारे मंद वा क्षुब्ध वारे
विझो तारका वा मृत विश्व सारें
क्षिती कोठुनी निष्ठुरा नाचरी ही
चिता आपली सारखी फुरफुरे !

## ४१ वालुका-चित्र

नदीसैकतीं वसुनि सखीची वाट बघे बाला
अस्थिर झालें मन, मग चाले हातांचा चाळा.
परागतंतू करीं घेउनी रेघोट्या ओढी
मना रिझविण्या वाळूवरती चित्रें ती काढी.

सुरेंद्रकार्मुक सुबक रेखुनी भरी रंग साचे.
शेवाळाचे, नील नभाचे परागकमलाचे.
सखीमनाला चकित कराया निर्मियली माला
मोहित झाली स्वतांच परि ती पाहुनि चित्राला.
खेद वाटला परी मनाला हळहळली भारी
चित्र काढिलें उगीच वाटे नश्वर वाळुवरी.
सोसाट्याच्या झंझावातें पुसुनी जाईल,
पूर नदीचा अपुल्या संगें धुवुनी नेईल;
ओष्ठ स्फुरले, हृदय कांपलें नेत्र जलें भरले
अश्रु लोंबले, हळहळ वाटे चित्र व्यर्थ गेलें.
अंधाराची लाट येऊनी रवीबिंब पुसलें
सरितेमधल्या मीनांसम नभिं तारे लुकलुकले
उशीर झाला, सखी न आली, कला व्यर्थ गेली
निराश होवुनि विषण्णचित्तें बाला गृहिं गेली !

*　　　*　　　*

सुसर हळू वर डोकें काढी रेतीवर पडली
चित्र पाहुनी मोहित झाली तिथेंच ती बसली.
हरिण-शशकही तृषित होउनी जलपाना आले
तृषा विसरले चित्र बघोनी चित्तीं भय नुरलें.
वास येऊनी भक्ष्याचा मग हिंस्र पशू आले
हरिणां विसरुनि चित्र पाहुनी मोदें गुरगुरले.
पशुपक्षादिक सकल जीवगण देहाला भुलले
चित्रामाजीं चित्त गुंतलें, एकरूप झालें !

श्री—

ओंगळ कीटक खुरडत खुरडत कष्टानें आला
चित्रकमल तें खरें वाटुनी त्यावरती बसला !

*　　　*　　　*

इकडे बाला शयनीं निजली सुखस्वप्नीं चूर
व्हावीं कमलें सजीव गंधित इच्छा मनिं फार !
अकस्मात तों वीज चमकली होई भूकंप
कडकड कडकड घनरव झाला शांतीचा लोप;
पशुपक्षी ते भिउनी गेले सिकता सोडून
परि तो कीटक तिथेंच राही कमलीं बैसून !
कमळामध्यें निवास वाटे प्राणाहुनि जास्त
कमल टाकुनी पळुनी जाणें येइ न चित्तांत.
भूमी गिळली भूकंपानें उंचवटे आले
नष्ट रम्यता, स्वरूप भीषण सृष्टीचें झालें.
होइ भयाकुल बाला चित्तीं, दुःखपूर आला
मूर्खपणानें मी चित्रांचा जन्म व्यर्थ केला !
रात्र सरोनी उषा वाटतें केव्हां येईल
गति चित्रांची काय जहाली चित्ता समजेल.
प्रभात होतां लगबग करुनी गेली त्या ठायीं
विस्मय वाटे दिसे न सरिता सिकता कोठेंही !
बुजलीं गेलीं सिकता-चित्रें स्मृतीशेष झालीं
दुःख साहिना ! धरणीवरती मूर्च्छित ती पडली.

*　　　*　　　*

सहस्र शतकें लोटुनि गेलीं या उत्पाताला.
चित्र बुडालें ! बाला नुरली ! ठावि न कोणाला.
भूगर्भाचा शोध कराया शास्त्रज्ञहि कोणी
भूमी खणतां पात्र नदीचें काढी शोधोनी
घट्ट शिलामय सिकता झाली, नश्वरता गेली
बालेनें जीं चित्रें लिहिलीं तशींच तीं दिसलीं.
किडा शिलामय कमलिं शिलेच्या बसलेला दिसला
कौतुक वाटुनि नेउनि देई पुराण-शालेला.
कमलाखालीं नश्वर सिकतेवरचें नांव पहा
अमर जहालें भाविकालीं योगायोग महा !
जिवंत असतां यश न मिळालें, कीर्ति नच झाली,
कमल कोरतां किडा लाभतां मेल्यावर उरली !
कर्त्री गेली, कीर्ति उरली, भंगुर कां असतीं ?
वाळूवरचीं नांवें किंवा कविता रचितों तीं !

---

## कारण काय ?

भगिनी-मुखावर स्मित खुलतें,
पाणीं दंवासम तें ठसतें;
हास्य पाहतां मन भुलतें;
लोपुनि कां तव सुस्मित गेलें सुकसी कां कलिके ?

श्री—

तव प्राप्तीस्तव किति झुरतो !
चन्द्रकान्त-मणि पाझरतो,
खळ न अश्रुंना तरि पडतो,
स्व-कर-लालनीं झुलविसि तूं परि भेट न कां देसी ?

असा कोणता वन आला ?
लोपुनि टाकी किरणाला,
चकोर चित्तीं गडबडला,
मृदुलकरांनीं रम्य चंद्रिके ! सुखवीं चित्ताला !

पिंपळफळ कां रुचे गडे ?
खाशी निवडुनि घाण किडे
रसिक सारिके ! खंत जडे,
डाळिंबांचें हृदय उले, हे ओघळती दाणे !

सृष्टी सुंदर बघ नयनीं,
रेखाटुनि ती रंगांनीं,
अजरामर करि कीर्ति जनीं !
चित्र गिरविसी उगा चितार्‍या ! दुसर्‍याचें जगतीं ?

शिला पाहते वाट किती !
मूर्तिकार ये कविं जगतीं ?
घडविल सुंदर मम मूर्ती !
चित्रकार करि गणपति उंदिर घेउनियां माती !

गुलाब प्रीतीनें नटला,
पराग अर्पी भ्रमराला,

कीं तो देइल कलिकेला,
धूलि-सेवनीं कालिका गुंगे, पराग-कण सुकती !
रसिक-जनांची रुचि विटली !
निष्ठुर जनता कां बनली ?
काव्य-प्रतिभा कां लपली ?
याचें कारण कांहिं न कळतां, होई गुंग मती !

---

# ३ माधुकरी

गरिब बिचारा माधुकरी, दुःख तयाला जन्मभरीं
कडक उन्हानें जीव घाबरे, कपोल सुकले घर्में भिजले
पायीं चटके तापे डोकें, धांपा टाकित पळे जरी १
बुरबुर लागे पाउसधारा, चिखल माखला अंगीं सारा
चट्ट तपेली, झोळी धरिली, धांवत जातो घरोघरीं ? २
भणभण झोंबे वारा अंगा, बधीर गात्रें पायीं भेगा
हात कांपती, दांत वाजती, कुडकुडतो हा घडी घडी ! ३
विटक्या अपुऱ्या मुकट्यावांचुनि, वस्त्र दुपारीं अंगीं कोठुनि
ही धार्मिकता लोकांकरितां, नित्य सोशितो कष्ट जरी ! ४
सण आनंदी घरोघरीं जरि, नित्य कपाळीं सुटे न वारी
शिळी बुरसली, खवट आंबली, भोक्ता वस्तुस मिळे परी ! ५
उशीर कोठें कुठें संपलें ! मिळे कालवण भाग्य उदेलें
नांवा धरिली करीं तपेली, अश्रू तोंडीं, घांस गिळी ! ६

श्री—

झोळी थोडिहि अजुनि न भरली, शाळेची तर घंटा झाली
मुख हिरमुसलें, घास कोंबलं; दप्तर घेउनि पळे जरी ! ७
शिळें त्यातळें रात्रींकरितां, निजे उपाशीं अपुरें पडतां
कुणा कळवळा येई बोला, दु:ख तयाचें अणूपरी ! ८
नंबर गेला एक खालतीं, जाइल नादारी ही भीति
सांज सकाळीं अभ्यासच करि, फुरसत खेळा कुठें तरी ! ९
गोसावी, भट, धन्य भिकारी, तेलंग्याचें भाग्य कितीतरि
पैसा दूरच, पुस्तक धोतर, जुनें द्यावया नसे घरीं ! १०
निजे कुणाच्या ओटीवरतीं, अर्धें धोतर खालीं वरतीं
एकच सदरा तोच उशाला; दया न येते जगा परी ! ११
यजमानाला पलंग गिरदी, आंत उकडतें खुपते गादी
पोटीं धरुनी पाय जुळवुनी, कुडकुडतो हा रात्रभरी ! १२
पुण्यांत आला अभ्यासाला, पदोपदीं जग अडवी त्याला
विद्या करितो, हाल सोशितो, शूर नव्हे कां खरोखरी !
गरिब बिचारा माधुकरी ? १३

## ४४ एक वर्ष

मधुमासानें भेट धाडिली
अखेरची नव कलिका अपुली
जीवनतरणी स्थिरतर झाली
कलिका प्रेमानें खुलली
जीवितध्येय मना गमली

असूयाग्निचें वारें सुटलें
**ग्रीष्म** भानुनें विश्व जाळलें
हरितसृष्टिच मुख कुसकरलें

आग भडकली हृदयांत
ध्येय जळालें वन्हींत !

वळीव कोसळले अश्रूंचे
मनःपथावरि कर्दम सांचे
दुथडी **वर्षा**-कविता नाचे

धुंद जहाल्या दहा दिशा
नुरली ध्येयाची आशा !

**शरच्चंद्र**करलोला रजनी
स्मित मृदु चमके तारावदनीं
ज्योत्स्नागानें निजली अवनी
ध्येय जल न देई कोणी !
आनंदाचीं जळलीं रानें
सुखस्वप्नांचीं गळलीं पानें
पोंखरला तरुजीव किड्यानें

जीवनरस तो ध्येयाचा
सुकला बिंदु न मिळण्याचा !

निराश थंडी पडे भयंकर
जननिंदेचा तळपे रविकर
असह्य झाला जीवनभार

श्री—

विटलें मानस जगताला
हरहर मुकलें ध्येयाला !
आनंदाला किसलय फुटले
पराग कलिकेनिकट नाचले
शिरीषसुम रोमांचित झालें
वसंत बहरे सौख्याचा
शोध लागला ध्येयाचा !
ध्येय हरपलें भ्रांति मनाला
धरिलें त्यानें दृढ हृदयाला
वर्ष हिंडलों शोधित त्याला
सुटलें प्रेमाचें वारें
हृदयीं—ध्येयीं भेद नुरे !

## ८५ बालमृगी

बालमृगी तव सुरम्य कांति, पाहुनि लोलुप झालें चित्तीं !
चपल पवनसम कंदर-शिखरीं
द्रुतगति धांवसि, दिसासि न क्षणभरी
सहवासास्तव आतुर हो अति ! १
विशाल लोचन सतेज काळे
अश्रूपूरित दृष्टी बाळे !
वळते मागे कां वन-प्रांतीं ! २

प्रतानरज्जू ताणुनि धरिसी
मजसंगें वद कां नच येसी
कोणास्तव तव बावरि वृत्ती ! ३

नको वदूं तव कळवी दृष्टी
मजसम तव मनिं प्रीतीवृष्टी
बंधमुक्त, जा, विहर यथामाति ! ४

कां नच जासी, तनू घांससी
मैत्रिण मी कां गमते तुजसी
हितगुज करिते सखिसम प्रीती ! ५

मीही राहिन वनिं मोदानें
सखि नच दुसरी, कुरंगनयने !
दाखव मज तव—कोण्या प्रांतीं ? ६

चमकुनि हरणी वनीं पळाली
नकळे स्मृति तिज कसली झाली
स्वजनीं केंद्रित होते प्रीती
हेंच तत्त्व मज दिसतें जगतीं—बालमृगी ! ७

## ४६ मधुर निशा

मधु मधुमासीं मधुर निशा, तिमिरीं अंधुक भयद दिशा
तारा मिणमिण प्रकाशुनी, भासवि भेसुरतर रजनी !
नवतृणलहरींवर डुलले, अस्फुट सुम, न कुणां दिसलें
पण तें फुललें हें कळलें, परागकण जइं दरवळले !

श्री—

निष्कोषित मधु—ताऱ्हेलें, फूलपाखरूं बावरलें
इंद्रधनू दंवबिंदुवर, खुललें केवळ निमिषभर !
पवन सुगंधें उन्मत्त भणभण हिंडतसे गात
स्नेहशून्य गगनीं तारा विझला फडफड करणारा !
फूलपाखरूं मृत भूला, कुसुम न दिसलें नयनांला
पण तें खुडलें हें कळलें, दंव तृणनयनीं ओघळलें !
रंजित पूर्वा, हंसे उषा, परी हरपली मधुर निशा !

.........................

## ४७ सागरगोटा ( पुढें चालू )

पाठी मागुनि दुसरें कोणी, पहात होतें लपुनी छपुनी
दबकत येउनि वरी उचलली नूतन कुसुमित गुलाब वेली
कोण येई तें तिर्यक नयनीं बघतां गेलें भान हरपुनी
घर्म कपोलीं कंपन हृदयीं निसटुनि जाया वाटच नाहीं
परत हवी कां छबडी आतां ऐकशील कां, वा पण ताठा
" कशी उडाली घाबरगुंडी, चल खेळाला करतें हंडी
नांव कुणाचें घेशिल मग ग ? कशी फजीती बने पहा ग !
थांब वने हो ! आले, ताई ! डाव तुझ्यावर आला बाई !
छबडी गेली डोळे मिटले, गुलाब गालीं, फुलले हसले
' जसें करावें तसें भरावें'— रम्य किती म्हण नव्हतें ठावें

## ८ सहारा

कुरळकेश गजनयना नीलकमलसे
चिंतातुर म्लान वदन, बालिका दिसे
चंडरश्मि भानुवरी
सिकतोदधि तप्त तळीं
भ्रमत शून्य दृष्टि-तरी
हुडकिसी तूं काय ? बाल ? हरपलें कसें ! १
चोंहिकडे सिकता ही
मृगजलविण सलिल नाहीं
सुजत तृषित जिव्हा ही
घर्म-बिंदु-पान परी देहिं नुरतसे ! २
रवितापें तनु जळली
ग्लानीनें हनु गळली
वक्षावरि दृष्टि वळली
धडपसी व्यर्थ बाल, दुग्ध मुळिं नसे ! ३
देउं तुजासि सांग काय
झाडिसि कां हातपाय
फिरविसि का नयन हाय !
बाळ अहो देत पहा आंचके कसे ! ४
नृत्य करी वाळुलहरी
भानुकिरण धरुनि करीं
पवन सुंसुं ताल धरी
सिकतेचा स्तंभ फिरत घुमत येतसे ! ५

श्री—

नयन धूलिधुंद होति
चक्र फिरे मज सभोंति
नेउनि मज उंच वरति
फेकुनि मज दूर कुठें लोपलें पिसें !
लोचन मी उघडितसे
जवळीं नच बाल दिसे
नृत्यश्रमित सृष्टी वसे
पूर्वीसम दृश्य दिसे शांत सिंधुसे !
तळपत वर रवि तसाच
मृगसलिलीं लहरिनाच
परी मनास बालव्यास
भास सदा शोधुं कुठें, करुं तरी कसें !
बोलत मी तुजजवळीं
उभी इथेंच पादतळीं
असेल बाळ सुप्त जवळिं
रक्ताधरचुंबनास लालसा असे !
पसरुनि पद दोहीं करीं
खणत भूमितल नखरीं
चांचपते सिकता तरी
बाष्पाकुल दृष्टि वरी मधुनि वळतसे ! १
चुंबितसे दगड बघुनि
हंसत सुटे रडत मधुनी
शुष्क होय बुद्धि तटिनी
बघुनि युवति, मम मनास जडतसे पिसें ! १

# किसलय, जल, मृदुपंख, पर !

विकसित मधुसम मधुकाळीं
किसलय, जल, मृदुपंख, पर
यांहुनि रम्याधिक कसली
वस्तू वसली जगावर !
हिरवा बुरखा दूर सारुनी
किसलय निरखी रंजित गगनीं
जणुं ही घेते कानोसा
वसंतपदरव भास कसा ?
भूकंपाचे घेउनि झोले
गिरीकंदरीं केली गाई
शब्द बोबडे निर्झर बोले
दुडदुड रांगत मोदें जाई !
निष्कोषित मधुपान-भुकेलीं
फूलपांखरें फुलां बिलगलीं
इंद्रधनूंच्या अंधुक ओळी
पक्षकंपनें पवनीं ठसल्या

.... .... ....

याहुनि रम्याधिक कसली
वस्तू वसली जगावर !

---

## ५० भारतभूचा पंचप्राण !

मिसरदेशाची रक्तवाहिनी धमनी वाहे नीलनदी
निर्जनपुरसंरक्षक नमिती गर्वभरानें झार-पदीं
इतर देशची शांति मिरविते मुठभर सैन्यामागून
' शेतकरी हा एकच भारतभूचा पंचप्राण ! '
मुठभर सैनिक बंड उभारुनि चढविति शांति उभी सुळीं
रक्षक निजतां स्फोटक द्रव्यें जुलुमां नेतीं पाताळीं
अतिपूरानें रक्त नासतां मिसर-वैभवा नच त्राण
' शेतकरी हा आत्मा भारतभूचा पंचप्राण ! '
परकीं राष्ट्रें भांडो तंडो, मत्सर-वडवाग्नी भडको
गर्वित बेडर पाणबुडीच्या जलमत्स्यावरती धडको
सविता सृष्टीदूत प्रकाशें धान्य देतसे बलमान्
' शेतकरी हा कलिजा भारतभूचा पंचप्राण ! '

---

## ५१ युगसंक्रमण

सगळी खोटी जगीं रहाटी, अर्थहीन ही संक्रांत
मुखांत एकी, कृतींत बेकी, सर्व नाशलें वैरांत.
षण्मासाच्या ध्रुवरजनीचें पटल ध्वंसलें सवित्यानें
दौर्बल्याचे शिशिरपाश नच अजुनि निखळले ज्ञानानें.
कटुतर गोष्टी येत अनुभवा, रुचतें कां तिळगुळ खाणें
पूर्वज रडती, लोक हांसती लाजिरवाणें कसें जिणें.

ली किंमत जगांत, काळीं वदनें दर्पणिं बघतां ना ?
हुर लागे जिवा न अजुनी, उच्च भावना मेल्या ना !
ान्नपोषित तनु शृंगारा, वेसण भूषण जगिं मिरवा
रा साजरा सण पोळ्याचा ! तोच तुम्हाला सण बरवा !

*　　　*　　　*

ी फिरवा जरा भोंवतीं, चाले जगभर संक्रमण
ातिक नैतिक उत्क्रांतीपथ राष्ट्रें करिती आक्रमण.
तजेत्यांची, हीनोच्च्यांची, उलटापालट विश्वाची
रणहोमीं दुर्गुण नष्टुनि होइ स्थापना शांतीची.
वर प्रकाशें राष्ट्रें दिपती, दृष्टी येई अंधाला
द्रदीपही विझति, यशोरवि गगनीं ध्वंसति तिमिराला.
याखालिल पर्वत खचती, मिळे अकल्पित आधार,
ावृत्त स्फुल्लिंग पेटला, हिंदी चमके रणवीर !
र्धन ! साधा सुवर्णसंधी—धनराशीचें संक्रमण
ीव अडवुनि वळवा मागें, राखा बंधूंचे प्राण.
ळ्या तनुचें वीरामध्यें, धीरामध्यें भ्याडांचें;
ळी मोडुनि ऐक्यामध्यें करा संक्रमण राष्ट्राचें !

*　　　*　　　*

णीचे हिमबंध वितळवा, सुखकर रविकर तळपूं द्या
शिर लोपुनी निसर्गवपुवर वसंतवैभव झळकूं द्या
ोन—संस्था रंजितकिसलय प्रति तरु शिखरीं उकलूं द्या
जोन्नति-गिरि-शिखरावरती भारतझेंडा फडकूं द्या !

‘ भारतशक्ती भारतबुद्धी भारत-ध्येयें जगमान्य
करण्यासाठीं तनमन अर्पुन झटुंया सारे रात्रदिन. ’
बोचाति कंटक रसनेला परि विचार तिळगुळ हा सेवा
सुवर्ण-भू-गतवैभव मिळवुनि पुनरपि विश्वाला दिपवा.
किंकरजन किंक्रांत नसे, ही विक्रांतांची संक्रांत
ऐक्यचिन्ह हें युग—संक्रमणीं ‘ श्रीधर ’ अर्पी कवनांत !’

## ५२ सुधारणा

पूर्व दिशेला ध्वजा फडकली दिसली तेजोमय मूर्ती
शांति-गायनें गात चालली वरवर चक्राकार गती.
संजीवनी घे एका हातीं, नांगर चाती दुज्या करीं
ध्वनिलेखक हें कुंडल कर्णीं, ‘ पत्र ’ विभूषित तनू करी
चित्रभूषिता कपोलपाली, विद्युत् चमके हास्यांत
सूक्ष्म-दूरचें दाखविणारीं यंत्रें दिसती नेत्रांत
वैर लोपलें उद्यम चाले, शांति स्थिरावे भूवरती
प्रेमघोषणा विश्व करितसे, चाले आनंदें पुढतीं.
कला कल्पना सुफला झाल्या, नुरे कामना स्वर्गाची
गिरिवर बसुनी मूर्ति चाळवी सूत्रें सगळ्या विश्वाचीं.
अंधुक छाया इतिहासाची
दिसे घनावृत भावि मरीची
दृष्टी फिरवी उत्साहाची

पूज्य भावना दाटुनि हृदयीं गद्गद वदलों, ‘ तूं कोण ? ’
‘ शांतरूप मी सुधारणेचें ’ देवी बोले हांसून !

*　　　*　　　*

जिकडे तिकडे शांति परिषदा, राजा अंकित लोकांचा
करभाराचा खुराक पोशी तांडा बेडर मल्लांचा,
त्रिभुवनिं पसरे वैभवशाली घटोत्कचाचा बाजार
स्फोट होउनी रम्य पळालें, सृष्टी झाली भेसूर !
यशोध्वजाचा उडे मुलामा, नाचे यादवि बेताल
या कलहाची सूत्रधारिका दिसे आकृती विकराळ.
सत्यक्षमेला भूतदयेला तिनें तुडविलें पादतळीं,
भेदक निष्ठुर विद्युत्दृष्टी असंख्य घेते क्षणीं बळी,
करुणरवाला कर्ण बधिरले शिरीं धडाडे ज्वलत्गिरी
प्रलयघनासम श्रवुनि गर्जना, थरथर कांपे भू सारी.
चाळण साऱ्या तनुची झाली, सैनिक-रुधिरें लिडबिडली
नरभक्षक निजपूर्वज छाया अंधुक पडली पाताळीं
　　करी शतघ्नी नरयज्ञा याला
　　‘ शापादपि ’ हें ध्येय मिळाया
　　पंख मृत्युचे उंच उडाया
लावित होती, कंपित हृदयें हळुं पुटपुटलों, ‘ तूं कोण ? ’
‘ रौद्ररुप मी सुधारणेचें ’ वदे आकृती गर्जून !



श्री—

## ५३ लेजीम

दिवस सुगीचे सुरू जाहले
ओला चारा, बैल माजले
शेतकरी—मन प्रफुल्ल झालें
छन झुन, खळ झण—झण खळ, झुन झिन, लेजिम चाले जोरांत !

चौघांनीं वर पाय उचलले
सिंहासनिं त्या उभे राहिले
शाहिर दोघे ते डफवाले
टप ढुम, ढुम ढुम, डफ तो बोले लेजिम चाले जोरांत !

दिवटी फुरफुर करूं लागली
पटक्यांचीं वर टोकें डुलली
रांग खेळण्या सज्ज जहाली
छन खळ, ढुम ढुम, छन छन, पट ढुम, लेजिम चाले जोरांत !

भरभर डफ तो बोले घुमुनी
लेजिम चाले मंडल धरुनी
बाजुस, मागें, पुढें वांकुनी
खळ खळ, छन छन, झण छन, खळ झन, लेजिम चाले जोरांत !

डफ तो बोले, लेजिम चाले
वेळाचें त्या भान न उरलें
नादभरानें गुंग नाचले
छननन, ढुम ढुम, खळ छन, ढुम ढुम, लेजिम गुंगे नादांत !

सिंहासन तें डुलूं लागलें
शाहिर वरतीं नाचुं लागले
गरगर फिरले लेजिमवाले
छन, खळ खळ, झणणण, छन छन, लेजिम गुंगे नादांत !
दिनभर शेतीं श्रमुनी खपले
रात्रीं साधी लेजिम चाले
गवई नलगे सतारवाले
छन, खळ खळ, झणणण, छन झन, रात्र संपली नादांत !
पहाट झाली, तारा थकल्या
डफवाला तो चंद्र उतरला
परी न थकला लेजिममेळा
झन, खळ खळ, लेजिम खालीं:—" चला जाऊं या शेतांत."

---

## वेडा

संत महात्मे शूर साहसी क्षणैक लहरिंत वेडाच्या
कर्तृत्वाचे उंच मनोरे चढविति शैलीं कीर्तीच्या,
परि वेडाचा लगाम ठेवी विचारबुद्धि आधीन
उज्वल प्रतिभा सृष्टीगूढें झरझर टाकी उकलून !

*　　　　*　　　　*

गुंगे वेडा सदा तरंगीं, अवसर कुठला कर्तृत्वा ?
अंतर्दृष्टी बाह्य बघेना, विन्मुख मायेच्या तत्त्वां,

श्री—

प्रतिभा कूलंकषा धांवते होउनि अति उद्दाम मन
शीतल निर्मल सलिल कराया कुठली फुरसत संथपण ?
रम्य कल्पना तीव्रजवानें पळती एकामागून
लेख न केवळ मनही नाहीं समर्थ करण्या आकलन,
लवभर विद्युत्-लाभ न देतां निर्झरवेडा पुढें पळे
अरसिक प्रस्तरलत्ता खातां संतापानें मनीं जळे.
सर्व जगाचे कवी आळशी सोंग घेऊनी वेडाचें
शेखी मिरवुनि बाडें रचती हपापलेले कीर्तीचे
वेडा परि हा कवी स्वतांचा, परवा नाहीं कीर्तीची
प्रचंड मानसकाव्यें रचितो परि नच उरते स्मृति त्यांची.

---

## ५५ गुरुवर्य कर्वे

वेष हीन परि विविध गुणांनीं अंतरंग नटलें
सरल रहाणी, उदात्त ध्येयावरी चित्त जडलें.
गांभीर्याचें पावित्र्याचें तेज दिसे नयनीं
वात्सल्यानें अनुकंपेनें थबथबली वाणी.
दुर्घट कार्ये अधिकाधिक मन निःस्वार्थी बनलें
जर्जर तनु परि अतुल भीमबल देहीं संचरलें !
कर सरसावे नित्य दीनजनक्लेश निवाराया
नित्य पुढें पद उन्नति-गिरिपथ जनां दर्शवाया;
दृढतर निश्चय, विश्वासानें संकटतति विसरली
कठोररूढीनिगडित हृदयें अंतरिं पाझरली !

परावलंबी अजाण कोमल विधवा अल्पवयी
पाहुनि द्रवली अनुकंपा, हा कार्योद्गम होई.
विद्येसम सत्सखी जोडली कष्टी जीवांना
स्वावलंबनाधार अर्पिला अनाथ अबलांना
भविष्यवैभव पूर्वसंस्कृती चित्तीं बिंबविल्या
भावी माता राष्ट्रोद्धरणा कार्यक्षम केल्या !
शिक्षणसिंचन होतां आली जागृति आत्म्याला
भारतमहिला झटूं लागल्या निज कर्तव्याला !
कार्य सिद्धिनें परिस्थितीचें परिवर्तन केलें,
सात्विक बौद्धिक आर्यस्त्रीबल निदर्शना आलें !

* * *

भारत महिलारत्न जगावर अविरत तळपेल
भविष्यकालीं भारतयश दशदिशीं न मावेल
परि शक्तीचा उगम तूंच ! ती तुझी तपश्चर्या
कर्मवीर तूं ! आद्य ऋषे ! तुज प्रणाम गुरुवर्या !

## प्रस्तरमूर्ति

मानवजाती भिन्न कृत्रिमा, अंतर्याम परी
एक ठशाचें, चहूं दिशांना, भाव न भेद धरी
ध्रुव-विषुवावर, सागरद्वीपीं, हिमतुंगावरती
सृष्टी विहरे, भाव गंहिवरे, समरूपा वृत्ती.
शिशु मातेचा, बंधुभगिनिचा, प्रेमळ दंपतिचा,
विश्वामध्यें संगम जुळला विचार-वाणीचा.

शब्द निराळे, वेष वेगळा, भिन्न वर्णनूर
त्यजुनी, सृजुनी मूर्ति, खेचसी स्वर्गच भूमिवर.
श्रीरामासम करिसि शिलेची मूर्ती अभिराम
प्रमाणबद्धा, शिरिषकोमला निपजवि चित्तभ्रम.
जादूस्पर्शें झाली उर्वशी तिलोत्तमा बाला
हृदयंगम मनमोहन दर्शन साक्षात् जीवकला.
अशी सारखी निश्चल बघतां तुला ठरे नजर
दुर्दिन मुलले, मोद कोंदला वाटे विश्वभर !
ज्योत्स्नास्नाता धरणी हंसली जरी अमावास्या
ग्रीष्मे वठलें तरु तरि वाटे वसंत करि लास्या !
ऊन कोवळें, निर्झर, हिरवळ, कमल, भृंग, मैना
भंवति मनोरम जमले वाटे चिर तुज बघतांना.
भान नुरे तुज वसन-तनूचें निरखित शिशुलीला
निसर्ग-रमणी भरल्या जगतीं एकांतच तुजला !
नाक मुरडुनी अरसिक ठरविल निर्लज्जा तुजला
पशूच केवळ ! अभद्र न शिवो विचार सारल्या.

*   *   *

तन्मय वृत्ती, खिळली दृष्टी पतिवदनावरती
लाजुन धरते पुढें, झळकतें स्मित अधराभंवती !
हात पसरले पाय नाचले, डोळे लुकलुकले
ओष्ठ स्फुरले, झांप टाकतां अस्फुट स्वन वदलें.
" पुरें न लिहिणें, ध्याच जरासा, बघा किती घाई
अरे लबाडा ! आपलें माणुस ओळखलें बाई !

जाशी तिकडे, तुझी नाहिं कां मी अगदी कोण ?
फू गडी जा ! पुन्हां न येईन जवळी कध्धीपण.
अईई रुसली–रडली छबुली, उगि तूं–वा हंसलें !
मेलें लिहिणें पुरें, लबाडा ! माणुस ओळखलें !"

*　　　　*　　　　*

ग्रीष्म पुनरपी, विरही वारे, उजाड वन सारें
कृष्णघनावृत गगनीं तिमिरीं लुप्त सौख्यतारे.
दीप मिणमिणा क्षणांत सरतां संचय स्नेहाचा
भावी अंधुक आशा दावी खेळ कल्पनेचा !
प्रस्तरमूर्ती–विभ्रम अपुरे गमती चित्ताला
लहरि कशाच्या, मनीं भडकल्या वडवाग्नीज्वाला
दीप निमाला प्रस्तरमूर्ती शिरली स्वप्नांत
उत्सुकता जें चित्र चितारी उमटे कवनांत !

---

—स

लक्षावधि घनघोर झुंजले तव तीरीं झुंजार रणीं
विजय कीर्ति ती वीरकृती ती अर्धी बुजली विस्मरणीं
हत्याराशी रुधिरविभूषित सैनिक-सिंहासनिं बसली
मृण्मय झाले सैनिक, हत्या हत्या नामाची झाली !
पुण्यसलिल करि प्रसन्न धरणी, रुधिर रंगलें कुसुमांत
सलिलदर्पणावरी झळकलें मधुर उषेचें मंद स्मित.

छिन्न दग्ध उद्विग्न स्मृतीच्या कुसकरल्या स्वप्नांवरुनी
व्यर्थ धांवती लहरी, स्मृति परि अजुनि न जाते लोपोनी

## ५८ प्रवाहांतील फांदी

पूर नदीचा प्रबळ वाहतो क्षिती नसे त्याला
मुळापासुनी उपटुनि टाकी प्रचंड वृक्षाला !
लहान निर्बल शाखा अवचित पडते पात्रांत
क्षुद्र तरी ती जरा बदलिते सरितेचें पात्र !

## ५९ वंदे सुधामातरम्

वंदे काव्यगिरा, गिरीसहचरी, वेणुध्वनीमोहिता
प्रेमें हृत्व्यथसेविका पति वरी त्यागोनि मातापिता
रोषाग्नी तनुदंड दिव्य करुनी कंठोनि संवत्सर
आनंदें विरहाकुला मधुदिनीं आलिंगिते सत्वर !
चिंताव्याप्त कठीण पांच वरुषें आधार झाली जीवा
भासे केंद्रित सौख्यकाल विहरे कांताकटाक्षीं क्षणीं
स्वर्गाची चिरसाक्ष मंजुलस्वनीं जी मूर्त प्रीती गमे
सौख्याचें नवनीत अर्पिसि सुधा, वंदे सुधामातरम् !

# चंद्रग्रहण

होतें नाक सुरेख नीट जणुं कां ही मुग्ध चाफेकळी
होती मंजुळभाषिणी सुललिता बाला उभी त्या स्थलीं
पाहोनी परि कां मना द्रव सुटे ? कां चित्त ये दाटुनी
जातां दृष्टि विशाल पांडु निटिलीं, सारें कळे मन्मनीं. १

पूर्णेंदूसम शांत रम्य मुख तें निस्तेज भासे मना
वाटे इंदु सिताभ्र-घोर-पटलीं झाकोनि गेला असे.
जाती अभ्र पळोनि शीतकर ही आनंद देतो जना
नाहीं शक्य इथें म्हणोनि जडतें माझ्या मनाला पिसें. २

आहे तेज मुखावरी पण दिसे तें मृत्युचें नर्तन
भासे पुष्प दवांबु-सिक्त हसरें कोमेजलेलें जसें !
होई प्राप्त कुठोनि त्या टवटवी ? कोठोनि उन्मीलन
अश्रू गाळित नित्य नित्य झुरणें हा लेख भाळीं ठसे ! ३

झंझावात सुटे, तुटोनि कलिका मुग्धा पडे भूतलीं
आशातंतु तुटोनि ती मुकतसे सौख्यास विश्वांतल्या
शोकें ढाळित आंसवें बसतसे मोजीत वर्षावली
देती त्रास परंतु कीटक किती टोचोनि तेथें तिला ४

मृत्यूनें तरु तोडितां विगलिता वेली पडे खालतीं
तैशी होइ स्थिति; कशी दुखवली, कोमेजली बालिका.
झाली दीन अनाथ, आश्रय नसे, चेष्टा करी दुर्जन
पाहोनी परि तें हळू वदन ती घेते करीं झांकुन ! ५

पाहोनी मजला क्षणैक झळके मंद स्मित प्रेक्षणीं
वाटे कीं चमके घनाभ्रपटलीं येवोनि सौदामिनी
आलें दाटुनि दुःख ही क्षणिं दुज्या कल्लोळ होई मनीं
अश्रूंच्या गळती सरीवर सरी, काळोख भासे जनीं !
बाला यत्न करी, प्रचंड मनिंचा आवेग दाबी बळें
होई निष्फळ तो, मनोरथ—चिता रात्रंदिनीं जी जळे !
देतां दुःसह ताप, सर्व तुटले हृद्बंध एका क्षणीं
वातोन्मूलित कर्दलीसम पडे भूमीवरी मूर्च्छित !
कैसी ती न कळे, परी चमकली माझ्या मनीं कल्पना
गात्रां कंप सुटोनिया चरकलें काळीज भीतीमुळें
गेलों धांवत, हस्त घेउनि करीं—हा हाय ! भीती खरी
लागे थंड हिमासमान कर तो निर्जीव धोंड्यापरी !
जा जा ! शांतमनें खुशाल भगिनी ! अक्षय्य घे झोंप जा !
जा भेटे तुज खास तो पति तुझा निद्रेंतल्या स्वप्निं या !
वाणी शक्त न भाव व्यक्त करण्या वाहोनि अश्रूफुलें
गेलों टाकित पावलें हळुहळू भारावलें जीवित !

---

## ६१ भ्रमरकवी

ठावठिकाणा विदित न कोणा, भ्रमरकवी आला
अरविंदाचे पराग सुंदर चोरुनियां गेला.
कृष्ण-भृंग-तनु-पार्श्वभूमिवर चित्र भरे नयनीं
विद्युत्तेजासम झगझगले पराग उद्यानीं

रसिका कळलें हृदयस्पर्शी कमलगंधरूप
करी उल्हसित उज्वल पल्वल, जीवन निष्पाप !

* * *

विनयशीलता कळे तयाची तुझ्या धृष्टतेनें
भारवाहका ! ध्वनिपडसादा ! हेंच तुझें लेणें.
पराग नाना कुसुमांमधले आणुनि पोळ्यांत
विकृत रूपांतर कौशल्यें करिसी मेणांत !
संग्रह मधुचा, लोभ सुटोनी, आनंदें लुटला
जळफळाट कां गांधिलमाशीसम मग तव झाला ?
चंचल ! लंपट ! पंकजचौर्यीं पंक चरणलग्न
धवलयशावर उडवुनि सेविसि धूलि पदलग्न.
माधुकरी ही कशी कोठली, कोण करी दान
लोकां कळवी, नको कपाळीं व्याजस्तुतिपान.
चोरी फुटली, कमल विराजे रसिकहृदयकोशीं
शाप देत मज करीं छिद्रमय शुष्ककाष्ठराशी !

---

## ६२ भ्रमरा !

खुले झेनिया लाल गुलाबी पिवळ्या रंगांत
भ्रमरा ! दिससी उदासवाणा फुलऱ्या विश्वांत !
फूलपांखरें क्षणांत झुकतीं यांवर त्यावरुनी
प्रणयव्याकुला कुणी धांवती एकामागोनी !

दोन प्रहरचा सूर्य हांसतो, सृष्टि एकतान
तूंच एकला कुरकुरसी कां विषण्ण होऊन !
गुलाब, चाफा, कमळें पळवी कवि; कविता भरली.
सूर्यफुलाची कळी उमलली, मधुदाना सजली !
फुलें सुरंगी, पतंग रंगी, जोडीचा हेवा
सोडुनि भृंगा ! स्वीकारी हा प्रेमाचा ठेवा !
विद्रुप वामनमूर्ती पाहुनि प्रतिलि भीती.
शंका कसली, भुले झेनिया-कलिका तुजवरती !
जोंवर जगणें तोंवर गाउनि ‘ दोन सूर, ताल ’
भरी नभधरा, चालव भ्रमरा बाणा चिरकाल !

## ६२ पाणिग्रहण !

असतिस कलिका मनोहर
असतों मीही जर भ्रमर
गुंगत गीती तुजभवतीं
फिरलों असतों दिनरातीं
दलपुट-स्थित-मधुदानानें
तोषवि कलिका पानानें

.....................

परि तूं अससी भोळी ती
कलिका नच, मुग्धा युवती !
भ्रमर कशाला ? डांसच व्हावें

कपोलदंशा गुंगत यावें
काय कपोलीं नाचे सुषुमा !
अहा दंशनें चढे रक्तिमा
करतलस्पर्शें मोक्ष शरीरा
तनुसंलग्ना प्रियतम दारा !
भाग्य खरें तव पाणिग्रहणीं
डांसच होइन जन्मोजन्मीं ! !

---

## ओढणी

कविकातळावर चाखतों, कोण्या कवीची माधुरी
हंसतों विनोदीं भाषणीं हुरहूर दाटत कां उरीं !
मिटलीं दलें, फुललीं फुलें गवतांत झोंपति सारिका
ढग सांजचे विटुनी नभीं जमती हळूहळु तारका !
वळतां मुली ध्वज-पल्लवीं सुरचाप चंचल भाविती !
बगळ्यापरी हे पुंजके नादी युवांचे लोभती !
अलगूज-गुंजन दूरचें नवफुल्लपुष्पसुगंधही
पवनांतुनी सुचवी-'खुळ्या शिणसी वृथा ! बघ जा गृहीं ' !
—दिन थांबले, तप लोटलें, प्रियसंगती रमलों भवीं
गतकालची प्रणयांतली रमणीयता स्मृति जागवी !
विरहांतले दिन आमुचे, सुखकालचें मधुमीलन
स्मरुनी; वियोगीं जोडपीं आशेस देतीं इंधन !

संध्येंतली रमणीयता, तारांतली चिरशांतता,
उन्माद सौगंधांतला, गानांतली मधु खिन्नता;
जमवून हीं दुहितामिषें निज शैशवांतिल माधुरी
सुचवीत, आकर्षी मला प्रेमोत्सुका गृहिणी घरीं !—
पळते पुढें मम सांवली, प्रीतींत मुक्ती लाधली
क्षितिजावरी न उषा तुझी अजुनी कवे ! तुज भेटली.
म्हणुनीच सुंदर पाहुनी निमिषांत होशी निश्चल
तंतू जिवींचे कांपती वाऱ्यावरी तव गज्जल !
पडसाद त्यातें द्यावया समकंपना ना पोकळी
विश्वीं जरी खचले दुवे, प्रेमी जुळेना सांखळी !
तूं कातळावर एकटा, ध्यानीं कवे ! तव साजणी
स्थिति गुंतवी जरि ही मला लागे घराची ओढणी !

---

## ६५ संजीवन

फुटे पालवी प्रीतीला मोद मानसीं कोंदटला
पुलकित जल खगगण गाई रंग नवे आशा लेई
ऊन कोवळें दंवबिंदू पेंगत चाले वर इंदू ! १
कशामुळें तें नच कळलें विषण्णतेनें नभ भरलें
इंदू कोसळला खालीं, पिसाट वारा किंचाळी
मान गळे लाजाळूची दिसे अवकळा आशेची ! २

मोद मनींचा हारपला झुरणी लागे प्रीतीला
निर्झर मेले कृश सरिता दाहज्वरपीडित सविता
टपटप गळलीं शोकानें गुलमोहर-पिंपळपानें ! ३
पांडुरता गालीं भालीं दिव्याची मूर्ती गमली
स्मित भीषण, मृदु वच अधरीं भासे यांत्रिक देह परी
विरहदेवता अवतरली वसुंधरा कुतुकें हंसली ४

.............. ...............

धरणी हंसतां पालटलें सर्व जुनें जन विस्मरलें
हिरवळ कुरवाळित जाई लपत छपत निर्झर भाई
वीचिनखाग्रें वाळुवर सुचवित सरिता प्रेमभर ! ५
गुलमोहर भारें लवला परागमय वायू झाला
रवितेजाचे कण लपले पुष्पमिषें हांसत आले
धन्वंतरि मृतसृष्टीचा वसंत नृपती सकलांचा ! ६
आला रे आला श्रवतां भुरळ पडे प्रीतीचित्तां
पटल हरपलें विरहाचें अनुसरलें वच सृष्टीचें
यौवनभारें लवलवली मधु-नृपति-स्पर्शें फुलली ! ७
फुलें बहरलीं प्रीतीला घोस डंवरले द्राक्षीला
निसर्गनियमच असा असे कुणा न हें विपरीत दिसे
मोद एकदां हारपला तो न पुन्हां अजुनी दिसला ! ८

---

श्री—

## ६६ दिवंगत जीवास

प्रचंड अश्रुप्रवाह वेगें तुजस्तव खळखळले मागें
कोमल हृदयें विदीर्ण झालीं उसवुनि संगतिचे धागे !
अमूल्य वस्तू तव सहवासें मना भासल्या बिनमोल
एकांतस्थालिं अजुनि वाटतें श्रवणीं येतिल मधुबोल !
हीं हृत्शकलें, शुष्क आंसवें, दीर्घ उसासे असमर्थ
पुन्हां आणण्या दृगोचर वपु, भासे अपुरी स्मृति व्यर्थ !
चिरनिद्रेंतुनि जाग अशक्य न, महाभुतें धावुनि यावीं
पुन्हां जुळावें रूप मनोहर, आशा जीवाला जगवी !
चित्रप्रतिमा अश्रुमलीना अंधुक अश्रूपटलांत
भास निशिदिनीं, मधुर हांसरी जिवंत प्रतिमा स्वप्नांत !
काल थबकला चित्रीं, स्वप्नीं, ओघ न वळतो परत जगीं
प्रवाहपतिता वृक्षा ! शांती केवळ सागरतलभागीं !
परिचित तनुचा ध्यास धरोनी, हळहळुनी, जी उपेक्षिली
निरावगुंठित विदेहतेनें अंतर—ओळख विसरविली !
हा भवभूते ! जडली असती दृढतर ग्रंथी जीवांची
कुठुनि जाळतां विरह तनूचा नुरतां स्मृति जड देहाची !

## ६७ पावसाचें गाणें

उघड पावसा ऊन पडूं दे.
उडूं बागडूं हंसूं खेळुं दे !
कळी उमलुं दे फुला फुलूं दे,
पानें वाऱ्यामध्यें डुलूं दे
टपटप खालीं थेंब पडूं दे
तालावर त्या मला नाचुं दे १
पाय उठवूं दे वाळूवरतीं
समुद्र झाला ! आली भरती,
आभाळ पडे खोल खालती
डोकावुनि ढग आंत पाहुं दे ! २
उंच चालल्या घारी वरतीं
बगळे रांगा धरुनी उडतीं;
ढगांत भरभर रंग बदलती
पाठशिवणिचा खेळ बघूं दे ! ३
चिमणी ओले पंख सुकविते
घरट्यामधुनी पिलूं पहातें
मुंगी रांगेमधें धांवते
साखर–खाऊ तिला घालुं दे ! ४
जाळीं कोळ्यांचीं बघ भिजतीं
हिऱ्यासारखें थेंब चमकती;
रंग त्यांवरी सुंदर खुलती

थांब पावसा हार करूं दे ! ५

बसे फुलावर फूलपांखरूं;

मला सांगतें मौज चल करूं

थांब पावसा ऊन पडूं दे

गातां गातां मला खेळूं दे ! ६

---

## ६८ दोन वसंत

कोकिला खुलवुनी गळा खुणविते तुला याच ग मासीं

गत वर्षीं फुललिस कशी !

[ १ ]

वेढुनी प्रेमकरजालीं मोहवी शशी धरणिला

क्षण पर्ण हलुनि सुचवीतें सुखमग्न विहगप्रीतिला

सुमगुच्छ कुंदलतिकेला तशि लाज वांकवी तुला

बदलत्या छटा मेघाच्या तव कपोलजलिं बिंबल्या

विसरल्या कळ्या फुलण्याचें

हरपलें भान रजनीचें

विसरलें युग्म गाण्याचें

आनंद लपवुनी ओठीं मग लटकी रुसलिस कशी !

[ २ ]

चाटते धेनु वत्साला परि वळुन पाहते तुला

भरविते घास तान्ह्याला जणुं चिमणी शिकवी तुला

वांकतां घोस भारानें कां हंससि द्राक्षवेलिला
सांवळा मेघ वळवाचा जलभारें ओथंबला
सौवर्ण आम्र रसरसले
मोहोळ मधानें भरलें
शिशुगीत कुणीं गुणगुणलें
'सुखचित्र रेखुनी भावी तूं मनांत हंसलिस कशी ! !

---

## दोघांची इच्छा

सुखगिरिशिखरीं बसुनी पाहूं
भावी जीवितस्तोत्रें गाऊं.
भिन्न दिशांनीं वहात येती
नद्या संगमीं मीलित होती
साम्य बघुनि निज प्रत्यय घेऊं !
दोन नयन परि एकच दिसतें
भिन्न गतायू—भावी जुळतें
मंद्र सूर मी—तार तान तूं ! !
जुळलीं काष्ठें वहात सागरीं
सहज प्रीति स्फुल्लिंगापरि
जीवित उजळत प्रभुपदिं जाऊं ! !

---

## ७० अलकपाश

कचकलाप पदविलम्बि
शशिभूषित शान्त निशा !
नैसर्गिक रुचिर वसन
पार्श्वभूमि खुलवि वदन
अलकपाशबद्ध रमण
मोहवि ही प्रेमवशा !
पदचिन्हें जीवितपथिं
खिन्नमना विफल गमति;
रुळत केश स्मृति बुझती
मार्ग सुगम, नव्य दिशा !
चरणीं नत क्लान्त पान्थ
सिंच सजल दृष्टि शान्त
सुखनिद्रा वाञ्छि कान्त
घाल वरि अलकशाल !

---

## ७१ अजिंठ सुंदरी !

गतकालांतिल प्रस्तर—मंदिरीं
भारतराज्ञी अजिंठ सुंदरी !
कृष्णधवल, आरक्त नाचली
रंगाकृति तूं **संध्या** भूतलीं

बिंब उमटलें स्थिर भिंतीवरी
भुलविसि मोहिनी ! वंग चितारी ! १
वक्रभ्रूलता कांपत नाचती
नयन–तारका हास्यें स्फुरती
नासामूळीं एक थबकली
कुंतलपाशीं दुजी गुंतली ! २
कबरी–मधुघट मानेवरती
प्रेमसिक्तध्वनि अधरीं ठिपकती
कर्णफुलें स्कंधावर रुळलीं
गुलाब सुकले खंडित गालीं ! ३
हार गळ्यांतिल प्रत्यंचेपरि
सरळ लोंबतो पदांगुलावरि
सिंहकटी गजगामिनि भूवरि
सुरधनु शोभसि अजिंठ सुंदरि ! ४
क्षितिज-गगन हें अभिन्न नयना
वसन-तनूंतिल भेद दिसेना
हार मेखला कंकण नूपुर
मणिमय केवळ वसनें तनुवर ! ५
‘ निरर्थ मंडन मधुर युवतिला ’
बघुनि तुला तो कुलगुरु वदला !
गतकालांतिल प्रस्तर मंदिरिं
भारतराज्ञी अजिंठ सुंदरि ! ६

श्री—

# काळाच्या दाढेंतून

## ( खंडकाव्य )

### अर्पणपत्रिका.

**परमपूज्य मातोश्री ती. सौ. ताई रानडे**

**यांचे पदारविंदीं प्रेमपुरस्सर अर्पण.**

मानससिंधू शांत आज त्या कारण परि तूंच
शिशिर संपवी, शिरिष बहरवी, वसंत तो तूंच !
दुर्लभ प्राप्ती प्रिय जीवाची करुनी तूं देशी
सकल संकटें दृष्टिनिपातें झुगारुनी देशी !
करि जें तव स्तव, काव्य तुझ्यास्तव जीवन तुजकरितां
'ही मम कविता' गर्व कशाला उगीच मग चित्ता !
काव्यरुची तव स्फूर्ती देते रचण्या नव कविता
मी तव बालक, कवितेवर नच काडीची सत्ता !
उचलुनी पाहीं नात तुझी ही कविता निरखून,
रूप तुझ्यासम प्रेम वदवितें स्तुती मुखांतून !
शब्द बोबडे सुंदर करिसी चुंबन वेऊन
'रम्य जगाला !' कळे खुबी पण आंतिल कोठून !
मम कविता, मी पूरक आत्मा अर्पण तव पदरीं
सर्व दिलें पण तूंच, शेवटीं प्रणाम स्वीकारीं !!

श्रीधर.

# प्रस्तावना.

रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे यांचें हें काव्य महाराष्ट्रवाचकांपुढें भीतभीत येत आहे. तें छापून प्रसिद्ध करण्याचा रा. रानडे यांचा विचार ठरला, तेव्हां मला संतोष झाला; परंतु त्याला प्रस्तावना जोडणें मजकडे आलें, तेव्हां मात्र मला संतोषच झाला असें म्हणतां येत नाहीं. तथापि मीं तें काम करण्याचें कबूल केलें. एक तर रा. रानडे यांना मी आज बरेच दिवस ओळखतों; आणि दुसरें ते माझे विद्यार्थी असल्यामुळें त्यांचें काव्य रसिकांपुढें सादर करण्याचा सुयोग यावा, याचें मला साभिमान कौतुक वाटतें.

रा. रानडे हे कवि या नात्यानें महाराष्ट्राला अगदींच अपरिचित आहेत असें वाटत नाहीं. 'श्रीधर' या सहीनें त्यांचीं कांहीं स्फुट काव्यें कांहीं मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालीं आहेत. फर्ग्युसन कॉलेजांतील विद्यार्थ्यांना तर ते 'कवि' म्हणून आज बरेच दिवस माहीत आहेत. त्यांची प्रसिद्ध झालेली कविता तुरळक आणि स्फुट स्वरूपाची होती, त्यामुळें महाराष्ट्रवाचकांच्या ती डोळयांत भरणें संभवनीय नव्हतें. अर्वाचीन मराठी कवितेच्या एकान्तिक भक्तांच्या दृष्टींतून ती सुटणें शक्य नसलें तरी सामान्य वाचकांना तिची ओळख राहिली असेलच, असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून प्रस्तुत काव्याला लहानशी प्रस्तावना जोडणें त्यांना जरूर वाटलें, आणि मीं तें काम करण्याचें कौतुकानें कबूल केलें.

अर्वाचीन मराठी कविता—अलीकडील महाराष्ट्रकन्यकांप्रमाणें—मराठमोळ्याची कैद भीतभीत झुगारून किंचित् मोकळेपणानें वावरूं लागत आहे. तिचें परावलंबन कमी होत असून ती अल्पांशानें तरी स्वतःच्या पायांवर उभी राहण्याचा प्रयत्न करीत आहे, ही गोष्ट मला महत्त्वाची वाटते. गेलीं पांचसहा शतकें महाराष्ट्रकविता परतंत्र होती—परोपजीवी होती. 'घालतील तें खावें, देतील तें ल्यावें, सांगतील तें ऐकावें, आणि नेतील तिकडे जावें,' ही जशी महाराष्ट्रांतील बालसुनांची स्थिति आजवर होती व अजूनहि बऱ्याच ठिकाणीं आहे, तशीच मराठी कवितेची कमीअधिक प्रमाणानें होती व अजून आहे. हल्लींच्या मनूंत समाधानाची गोष्ट इतकीच आहे, कीं, आजची मराठी कविता क्वचित् आपला सूनपणा विसरत आहे, आणि महाराष्ट्राची रसिकवृत्तिहि उदारपणें—मोठ्या मनानें तिच्या मुग्ध अल्लडपणाला दाबून टाकण्याचा प्रयत्न करण्याचें

सोडीत आहे. कांहींकांहीं कुटुंबांत जसा सासूबाईचा करडा अंमल मऊ पडत आहे आणि सासराला माहेराचें गोड रूप येत चाललें आहे, त्याप्रमाणें कांहीं कांहीं मासिकांत आणि कित्येक वाचकवृंदांत रसिक दृष्टीचा कठोरपणा शिथिल होत आहे, आणि तिला नव्या अल्लड–किंचित् धीट परंतु निर्मल व मुग्ध कवितांचें कौतुक वाटत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. नवी कविताहि बरेच ठिकाणीं परतंत्र किंवा परभृतच आहे, हें विसरतां नये. संस्कृताच्या ठिकाणीं इंग्रजींच्या ओंजळीची स्थापना झाली असली, तरी दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची तिची संवय अजून गेलेली नाहीं, हें कबूल केलें पाहिजे. तथापि ती सुटण्याची आशा दिसत आहे. पिंजऱ्याच्या दाराशीं तिची धडपड चाललेली क्वचित दिसूं लागली आहे, याचेंच महत्त्व आहे.

रानडे यांचें प्रस्तुत काव्य म्हणजे वरील धडपडीचा मासला आहे. किंबहुना त्यांची कविता–त्यांच्या आयुष्यांतील कित्येक गोष्टींप्रमाणें विशेष अल्लड–विशेष धीट होऊन, पिंजऱ्यांतून बाहेर पडण्याचें धाडस तिनें केलें आहे, असेंहि म्हणतां येईल. ‘ बाळबोध ’ वळणाच्या व शिष्ट चालीरीतींच्या निस्सीम भक्तांना तिचें वावरणें किंचित् अमर्यादेचेंहि वाटेल; परंतु तसें व्हावयाचेंच. शाळेंत जाणाऱ्या–इंग्रजी शिकणाऱ्या मुलींच्या रोजच्या वागण्यांत जो मोकळेपणा आढळतो त्याला ‘ दांडपणा ’ म्हणणारे जरी पुष्कळ असले, तरी तो दांडपणा कौतुकानें किंवा निरुपाय म्हणून चालूं देणारे बाप व भाऊ आज शहरांत तरी पुष्कळ आहेत. तीच स्थिति मराठी कवितेच्या संबंधांत आहे. आमच्या मुलींचा पेहराव कांहींसा इंग्रजी तऱ्हेवर आणि चालणेंखेळणें कांहींसें गौरयुवतींच्या चळणावर जात असलें, तरी त्यांचीं हृदयें मराठीच आहेत; तसेंच मराठी कवितेचें आहे. छंदाच्या बाबतींत, यमकाच्या बाबतींत मराठी कविता जरा किंचित् उच्छृंखल होत असली, तरी तिचा अंतरात्मा मराठीच आहे. असें आहे तोंपर्यंत तिचें कौतुक कोणीहि करील, अशी आशा धरण्याला हरकत नाहीं. वास्तविक पहातां मराठी, इंग्रजी, पार्शी हे भेद कवितेच्या राज्यांत रहातच नाहींत. कां कीं, अस्सल कवितेचा संबंध मानवी हृदयाच्या अस्सल वृत्तींशीं आणि भावनांशीं व त्यांनीं प्रवृत्त मानवी कृतींशीं; आणि या मूलतः सर्वत्र एकच असणार. अर्थात् त्यांचे व्यक्त उद्गार जी कविता तीहि मूलतः एकच.

विविध विषयांनीं भरलेल्या विश्वाचें वास्तविक अद्वैत जर कोठें प्रतीत होत असेल, तर तें कवितेच्या राज्यांत. येथें सर्व बंध तुटतात, सर्व पाश सुटतात, सर्व संकोच नाहींसे होतात, सर्व मर्यादा बुजून जातात आणि सच्चिदानंदाचे स्वच्छंद विलास मात्र येथें उरतात. या दृष्टीनें प्रतिभेच्या कोणत्याहि स्वतंत्र विलासाचें, स्वतंत्र स्फूर्तीच्या कोणत्याहि नव्या काव्याचें मला स्वतःला कौतुकच वाटतें. नवीन कविता केवळच नवा पेहराव चढवून नवीन बनली नसली, कीं मला तिचें कौतुकच वाटतें. मग तिला कोणी उद्दाम म्हणोत, कोणी अमर्याद म्हणोत, कोणी दांड म्हणोत, मला त्या दांडपणांत, उद्दामपणांतच भावी ओजस्वितेचें पूर्व बिंब किंवा प्रसादचिन्ह दिसतें, व मी तिचें कौतुक करतों.

रा. रानडे यांची प्रस्तुत कविता नवीन आहे. विषय नवीन—वृत्त नवीन—तऱ्हा नवीन—सारेंच बहिरंग नवीन आहे. तिची माऊली स्फूर्तिहि नवीन आहे. संस्कारानें, अनुभवानें व संसारांत लागणाऱ्या शिस्तीनें प्राप्त होणारी टाकठिकी तिजमध्यें कमी आहे. अंगावरील जबाबदारीचें यथार्थ ज्ञान झाल्यावर येणारा गोड मर्यादशीलपणा तिच्या अंगीं अजून आलेला नाहीं. चारचौघांत वागून प्राप्त होणारा पोक्तपणा तिला ठाऊक नाहीं. नुकतेच पंख फुटले आहेत अशा पांखराप्रमाणें ती वागत आहे. पण आपल्याला पंख आहेत, आणि आपल्याला उडतां येतें, हें तिला समजूं लागलें आहे आणि त्या भरांत भराऱ्या मारीत आहे. त्यांत तिचे झोकांडे जात आहेत. अनेक वेळां तिची घाबरगुंडी उडत आहे. तरीपण चारी खुरांवर उडणाऱ्या वांसरांप्रमाणें तिच्या अल्लड धाडसांत एक नवीनच मोहकपणा आहे. तो महाराष्ट्रवाचकांनीं मोठ्या मनानें पाहून तिच्या इतर गुणदोषांकडे कानाडोळा केल्यास त्यांना तिच्या संगतींत आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. तिच्या दोनतीन भराऱ्या फार बहारीच्या आहेत. त्या कोणत्या तें मीं येथें सांगणें म्हणजे वाचकांचें अरसिकत्व गृहीत करण्यासारखें धाडसाचें होईल, हें एक, आणि भिन्न वाचकांची रुची भिन्न असणार हें दुसरें.

हें काव्य वाचतांना वाचकांनीं एवढें लक्ष्यांत ठेवावें, कीं, तें एकादें कथानक नाहीं, किंवा एकादें एकाच विषयावर लिहिलेलें सुसंगत कवन नाहीं. महामारीच्या तडाक्यांत शरीर क्षीण, थंडगार झालेलें असतां मन मात्र विशेष जागृत—अधिकच जोरानें वावरत राहिल्यामुळें, त्याच्या पुढून गेलेल्या नानाविध

श्री—

विषयांचें-विचारांचें-विकारांचें हें पुसट प्रतिबिंब आहे. एका मनापुढून जाणें एवढाच त्यांचा धागा, आणि एकाच आयुष्यांतील आठवणी हीच त्यांची संगति. यापेक्षां अधिक सुसंबद्धपणाची अपेक्षा येथें अस्थानीं होईल. स्वप्नांतील दृगनुभवांप्रमाणें हें सारें छायामय आहे, आणि येथें सर्वत्र सारखा स्पष्टपणा, सारखा अर्थबोध पाहूं जाणें रास्त नाहीं. यांतील कांहीं भाग पुसट, कांहीं ठळक, कांहीं ऐहिक, कांहीं स्वर्गीय, कांहीं अंतराळीं असे असणारच—आहे-तच. तोच त्याचा नवीनपणा, विशेष आहे. या काव्यांतील रसास्वादानें कांहीं त्याचें कौतुक करतीलच; परंतु निदान त्याच्या अपूर्वपणामुळें तरी तें महाराष्ट्र वाचकांना आदरणीय होवो, व रा. रानड्यांना काव्यवाङ्मयांत अधिकाधिक भर घालण्याला उत्तेजन मिळो, येवढीच इच्छा !

भरतपूर,
१-१२-१४.

**वासुदेव बळवंत पटवर्धन.**
( प्रो. फर्ग्युसन कॉलेज, पुणें. )

# प्रवेशतोरण.

ता. १७ जुलै १९१४ रोजीं मी कॉलऱ्यानें आजारी पडलों. आयुष्याची दोरी बळकट किंवा प्रेमाची शक्ति चिवट म्हणून म्हणा, कोणत्या तरी कारणानें मी मोठ्या शिकस्तीनें काळाच्या दाढेंतून सुटलों.

त्या वेळचें मन:स्थितीचें चित्र-अर्धवट जागृतावस्थेंत, सिनेमांतील चित्रां-प्रमाणें जें प्रदर्शन झालें, तें फिरून तसेंच वाचकांच्या डोळ्यांसमोरील काग-दाच्या पडद्यावर दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. जागृतावस्थेंतील विचार व निरीक्षण आणि स्वप्नचित्रें निरनिराळ्या टाईपांत छापलीं आहेत.

बाळंतिणीची खोली, आजोबा निजले, तात्या पंतोजी, लहानपणचा प्रवास, अनुजनिधन, हृदयकंडन, वरात–धिंड, वनविहार, हीं गतआयुष्यांतील चित्रें होत.

'भावीसुखस्वप्न' हें अर्थात् भावी जीवित, ध्येय; पण तें वस्तुस्थितीच्या दुःखाच्या दडपणाच्या भेसूर चित्रांत मिसळून वेदांत उत्पन्न होतो. भावी ध्येय पुसट होऊन मरणाच्या कल्पनेनें दुःखातिरेक होतो, आणि त्याचें रूपांतर सुखांत होतें. आजुबाजूच्या जगालाहि मरण सुखकारक आहे असें निरीक्षण करून जीव मरणाला तयार होऊं पाहतो. पण देहाचे बंध सुटूं लागले, जीव भराऱ्या मारूं लागला, मग विचार कसला? जिकडेतिकडे सुखच सुख दिसूं लागतें. आतां पळां दोनपळांत मरणार इतक्यांत अखेरचा-निराशेचाच-केलेला इन्जेक्शनचा उपाय लागू पडतो, आणि पुनः कष्टमय जीवन चालू होतें.

ऐनसुखाच्या भरांत, अवघ्या सात तासांत, शांतपणानें मरण्याला तयार होतांना मनाची कशी अवस्था होते, जें मरण केवळ दैवी चमत्कारासारखें टळलें इतकें दृढनिश्चयानें आ वासून आलें होतें, त्यानें मनाची व शरीराची कशी दैना केली होती, हें अनुभवून पाहिल्याखेरीज नीट पटणार नाहीं; पण असा अनुभव वाचकांपैकीं कोणावरहि न येवो!

अंतकालीन मनाचें विवरण या दृष्टीनें शास्त्रज्ञांना, पृथ्वीचे पाश तोडूं पहाणाऱ्या जीवाची धडपड या नात्यानें वेदांत्यांना, व सैरावैरा कल्पनासृष्टींत भटकणाऱ्या, मनोवृत्ति अतितीक्ष्ण झालेल्या काव्यात्म्याचें काव्य या दृष्टीनें रसिकांना, हें छोटें काव्य यत्किंचित् उपयोगीं पडलें, तर माझें कालाच्या दाढें-तून सुटणें सत्कार्यीं लागलें, असें मी समजेन...............

श्री—

# काळाच्या दाढेंतून ! !

( मानस चित्रपट )

" आई ! आई ग ! ! " कुठें तरी मी कण्हलों वळुनी बाजूला
मूर्च्छेमधुनी जागा होतां नवल भासलें चित्ताला !
आज काय ही सर्व मंडळी उशाभोंवतीं जमलेली
पाय शेकती, सुंठ चोळती, टकमक बघती भंवताली !
अश्रुमलीना खिन्नमुखी कां कांता पायगतीं बसली ?
काय जहालें मज समजेना, वृत्ती-बुद्धी बावरली !
क्षीण मनाला विचार इतका असह्य होऊनि ये ग्लानी
दूर कुणीतरी हळुच पुटपुटे 'कॉलराच हा !' ये श्रवणीं !
दोनच होते शब्द, परंतू सुरुंग उडला हृदयांत,
भडका झाला, ठिकऱ्या गेल्या विचारासवें गगनांत !
एकामागुनि एक धांवले विचार, हो कल्लोळ मनीं
एका दुसऱ्या मेळ न उरला, तेल ओततो भ्रम मधुनी !
मूर्च्छा भासे जनास पाहुनि चर्मचक्षु ते मिटलेले
अंतःचक्षूपुढुनी झरझर भूतकालचे पट गेले !
ज्योत दिव्याची विझतां विझतां वाढे दाहि दिशीं दीप्ती
सकल चेतना मरतां मरतां क्षणांत झाल्या तीक्ष्ण किती !
बालपणाचे शिशुलीलेचे प्रसंग मुद्रित झालेले
चमकत, झरझर उकलत, विरुनी पटामागुनी पट गेले !
विकल गात्र परि खळबळ चित्तीं चित्रित होईल कां कवनीं
शब्द बिचारे दुबळे सगळे, किती सांगतिल गावोनी !

* * *

कोंदट उबल्या अंधाराच्या लहान खोलींत
दार लोटुनी सुईण नेते धरुनी मम हात

भीति वाटते आइस कोणी बागुलबोवानें
आंत कोंडलें, नेती मज, मी कांपें भीतीनें.
अंधारांतच लहान तेजो–वर्तुळ समईचें
अंधुक दावी बाजेवरती शरीर कोणाचें !
"हळूंच ये हं !" कुणी म्हणालें, वा ! ही तर आई !!
धांवत सुटलों अधीर बवण्या ओढे परि दाई !
"हं हं ! येथें शिऊं नको ! मी जम्मत दाखवितें
पहा दुरूनच ! तुला चिमुकला भाऊ मी देतें ! "
भाऊ म्हणजे काय ? बाहुली मोठीशी केली
चिंध्यांची कां मातीची कां गोरी कां काळी !
"देते कां ग ? नको नाहिंतर, फुटेल हातून
कोण आणुनी देइल दुसरी बाजारांतून !
कां हा रडतो ? द्यावी अपुली फणसाची पोळी
हात चिमुकले पुढें करोनी जातों मी जवळीं ! "
"शिवशिल मेल्या ! " आजी ओरडे हिसकुनि झवल्याला
वडील भगिनी उचलुनि चुंबी दोन्ही **गालांना** !

* * *

**देत हुंदका नेत्र उघडले, चोळित होतें कुणीतरी**
**निळसर शीतल गाल सारखे, डोळे मिटले पुन्हां तरी !**

* * *

आई म्हणाली " हा घे भाऊ
जातें मी वर, खा हा खाऊ
आजोबांना झाला बाऊ
गडबड करशिल–नकोच येऊं ! "

आई गेली—भाऊ निजला ! !
आजोबावीण चैन न मजला
जिन्यावरूनी दबकत गेलों
खुर्चीमागें उभा राहिलों !
भव्य पलंगीं मच्छरदाणी
दुभागलेली बाजुस दोन्ही !
शुभ्र मऊशा बिछान्यावरी
गौर तनू ती खुले गोजिरी !
शुभ्र उशीच्या मृदुलहरींत
गौर वदन तें खुललें शांत !
छताकडे वर लावुनि डोळे
स्वस्थ आजोबा होते निजले !
रेषा नयनाखालीं घाऱ्या
तांबुस निळसर दिसति टपोऱ्या
पाय न वाजवितां वर जाऊं
मिशा ओढुनी हळूच हलवूं !
चेष्टा करुंया या हेतूनें
गेलों भरभर आनंदानें !
कुणी फोडिली परि किंकाळी
हृदयद्रावक माझ्याजवळी !——
" हाय हाय ! कां सोडुनि गेला
निष्ठुर होऊनि मुली आपल्या ! "

## काळाच्या दाढेंतून !!

चकित मनीं मी मधें थबकलों
आईजवळीं धांवत गेलों !
आई धरुनी मज पोटाशीं
स्फुंदत स्फुंदत वदली मजशीं !
" उंच अभाळीं नेलें बाळा
देवानें वर आजोबाला ! "
शब्दानें या हंसूं लोटलें ! !
समोर दिसले ते निजलेले !
इतक्यामध्यें बोवा काळा,
कोट घालुनी आला काळा !
काळी दाढी, टोपी काळी,
विजार काळी, पिशवी काळी !
नळी लावुनी छातीवरतीं
मान हलविली बघुनि भोंवतीं
पिशवी घेऊनि लगबग जाई
त्यास पकडण्या माझी घाई !
पिशवींत घालुनि आजोबाला
वाटे बोवा घरीं चालला !
अंधारांतुनि धांवत सुटलों
जिन्यावरुनी दडदड गेलों !
दार लोटलें मागुनि कोणीं
शब्द आदळले अस्फुट कानीं !

श्री—

" तार केली ना....बाबांना
....येतिल सांगा....नाना ! "

*　　*　　*

**डोळे उघडुनि बघतां दिसला मित्र, सांगतो सकलाला**
**श्वास निथळुनि, " आतांच आलो तार करोनी आईला ! "**
**" कुठली आई अतां भेटणें ? उगीच आशा जीवाला**
**कसलें औषध ? नको !—बरें द्या ! !" झांपड आली डोळ्यांला !**

*　　*　　*

विजार लांडी, जोडा पायीं, टोपी जरिची शिरीं
दौत पुस्ती हातीं होती, पिशवी खांद्यावरी.
गमत चाललों असा—वाजली पाठीवर थाप
कोण ? वामन्या ? दम धर बेट्या ! देतों तुज चोप !
तो अर्थपूर्ण वच वदला वेडावुनी—हांसला
" बघुं बरें कुणाला चोप आतां मिळतसे—श्रीधरा !
कसा निघेल वचपा कादंबरि गोष्टींचा—कविवरा ! !
शाळेमध्यें येऊनि बाबा चोप "—, दचकलों कसा
दौत सांडुनी पुस्ती भरली, भानावर ये तसा !
किति उशीर ! धांपा देत पळालों मी वाऱ्यासरसा
व्यर्थ यत्न परि शिक्षा मिळते सव्वाशें उठबश्या !
पायीं गोळे, जीव गळाला, धास्ती मनिं चोप,
पाढे चुकतां गरम जहाले पंतोजी खूप !
कर बधिर कांचले, घोडीवर टांगतां—आरडलों
किति अश्रु ढाळिले खुर्चीसम वांकतां—त्रासलों
अई ! मान मोडली दगड अचल ठेवतां—ऊठलों

खुनशी तात्या पंतोजिस ये झटका रागाचा
भडकावुनि दे मुखिं झणझणल्या शिरा कपाळाच्या !
नव कवितांचें, कादंबरिचें वाचनसौख्याचें
मोल दिलें हें पडुनि भूमिवर ( धूळ किती सांचे ! )
पंतोजीच्या हातीं स्फुरली छडी किती वेळ
मोजा पाठीवर, दंडावर, पाहुनि वळ खोल ! !
मीं डोळे पुसले स्फुंदत काळ्या हातीं—शाईच्या
मग घसा खरडुनी मुलें म्हणति सारखी—पर्वचा
तों वाजे जोडा !....रुमाल गुंडाळतां डोकिचा
कान धरोनी तोंड वळवुनी पंतोजी वदले
" **ओळखलें कां ?** चोप द्यावया गधड्या ! **कोण आले ?**

* * *

**हलवुनि मजला कुणी विचारी "ओळखलें ना ? कोण आलें ?"**
**" ओळखलें मी ! आत्याबाई ! " बोजड हळुंहळूं शब्द आले.**
**डोळे मिटतां शाळा दिसली, देखावा पण भिन्न दिसे,**
**वरती बसतां बसकुर उडलें विचित्र गाडी मनिं भासे !**

* * *

आगगाडी ती शीघ्र गतीनें
चाले पळती डोंगर रानें !
रूळ सरकले आले जवळीं
पळती भरभर तरुंच्या ओळी !
उंच खालींवर तार हालली
वळणोवळणीं गाडी डुलली !

क्षणांत पुढतीं डोंगर फाटे
डबे भराभर गिळतो वाटे !
सोडित सुस्कारे धडपडते
काळोखाला कापित जाते !
विजयी होतां लुकलुक दृष्टी
बघते खालीं नटली सृष्टी !
पर्वत-मर्यादित मैदान
झाडिंत निजलीं खेडीं सान !
डुललीं कुरणें, शेतें पिवळीं
मळ्यांत कणसें भरुनि वांकलीं !
नांगरफणिनें विंचरलेलीं
दिसती कांहीं शेतें काळीं
पर्वत-शिखरीं लोंढे भीषण
उड्या मारिती कडयांवरून
तेच परी त्या मैदानांत
वक्र गतीनें झुळुळु वहात
नेत्रपटावर चित्र मनोहर
उमटत नच तों गेलें दूर !
सुरवंटासम मंद चालली
दीपप्रकाशित माला गेली !
दिसली भूमि सपाट केवळ
निळसर डोंगर दूर न जवळ !

नद्या कोरड्या, जळकीं रानें
गेलीं भरभर शीघ्र गतीनें !
कातकऱ्यांच्या किती झोंपड्या
दिसल्या परि त्या क्षणांत गेल्या !
खोंपट, जातीं, बाळें वरतीं
घेऊनि गाढव चाले पुढतीं
रचलिं ह्यशीवर मडकींभांडीं
त्यावर फडफड करी कोंबडी !
मूल पाठिवर, विणीत चटई
कातकरिण ती पेंगत जाई
झिंगत चिलमी फुंकत सगळे
विचित्र बोलत पुरुष चालले !
भवयात्रेचें साधें चित्र
दिसलें नयनां परि क्षणमात्र !
उभीं राहुनी तारेवरती
पोरें नाचुनि टाळ्या पिटती !
चरतां गाई दूर पळाल्या
शेळ्या मेंढ्या उभ्या राहिल्या
भुंकत कुतरीं आनंदानें
बागडलें तें करडूं तान्हें !
तारेवरती पक्षी चिमणे
फडफड करिती गोजिरवाणे !

रात्र उमलली, जगत झोंपलें
गाडी भरभर पुढती चाले !
रस्त्यांच्या वड पिंपळ ओळी
नवल बघाया येती जवळी
तांबुस कंदिल—तारा दिसली
अपशकुनानें गाडी बुजली
अंधारांतुनि व्यक्त जहालें
मोठें होऊनि स्टेशन आलें !
उष्मा होई, मेला वारा
तहान लागुनि जीव घाबरा !
उतरुनि वदलों शब्द वोगरा
'**पाणी पाणी** कुणी द्या जरा !'

**'पाणी ! पाणी !' हळु पुटपुटलों कोरड पडली तोंडाला**
**दों थेंबानें ये ओलावा; शांति मिळाली चित्ताला !**
**डोळे मिटले 'चंदु न आला–असेल तो पण शाळेंत**
**त्याहुनि मोठा बाळ–चालले विचारमाला गुंफीत !**

मान घालुनि खालीं, टाकित हळू पावलें चाले
खिन्नपणानें मळल्या वाटें, विचार मन्मनिं आले !
शेतामधल्या खोपींमध्यें तापानें फणफणला
प्लेगानें तो बंधु आजारी **बाळ** धाकटा अपुला !
डब्यांतील ही कांजी पाजुनि जवळीं स्वस्थ बसावें
गोष्टी सांगत धीर देऊनी त्याचें मन रिझवावें !

आई, बाबा दूर राहिलीं, वृत्त न त्यांना ठावें
उगिच कळवुनी कोमलहृदयां कशास तरि दुखवावें !
चार वाजले ! !—बसुनि तेथें खचित आजोबा थकले
झरझर पळुनि शेतीं जातां विचित्र नयनां दिसलें !
पेंढ्या विखरुनि खोप पाडली, उभी खुरावर बाज
हृदय चरकलें, घसा दाटला, उमटेना आवाज !
मटकन बसलों खालीं, गेली गुढग्यामध्यें मान
तैलबुद्धि ती स्मरतां विह्वल पोटीं ये भडभडुन !
क्षणभर वाटे स्वप्न सकल हें, आहे सुखरूप बाळ
धीर पुरेना, द्विगुणित झाला शोकाचा कल्लोळ !
खळबळ परि ही हृदयामध्यें, नयनीं एक न टिपुस
तसाच बसलों, जीव सारखा होई कासावीस !
आज सकाळीं जवळुनि उठतां कैसें मी पुटपुटलों
' अर्थ न कांहीं आशा नाहीं ' नकळे अवचित वदलों !

**डोळे उघडुनि बघतां दिसले डाक्टर नाडी चांचपत**
**' अर्थ न कांहीं आशा नाहीं,' असें कांहिंसें पुटपुटत !**
**परी मनाला भीति न वाटे, तसेच डोळे टकटकले**
**' अर्थ न कांहीं ' उचलुनि धागा बहकत माझें मन सुटलें !**
**बाह्य जगाचा क्षणभर पडला विसर मनाला मार्गस्थ**
**' अर्थ न कांहीं ' मूर्तिमंत वच नाचत सुटले गुणगुणत.**

[ शूळ कपाळीं, कंडन हृदयीं, कंप शरीरीं भरलासे
सलिल लोचनीं शीण अवयवीं उदासीनता मनीं वसे ! ]

—केशवसुत.

‘ अर्थ न कांहीं सकल निराशा !’ शब्द मुखांतून
गेले पूर्वी, हृदय कांपतें प्रसंग तो स्मरुन !
कारंजाच्या शुभ्र शिळेवर बसलों खिन्नपणें
जीवन झालें उदास नीरस गमे नको जगणें !

स्वच्छ चहुंकडे पडे चांदणें, चांफा दरवळला
निराश चित्ता रुचे न कांहीं, वीट मना आला !
सुखशैलावर चढूं पाहतां पडलों गर्तेत
प्रेमभानुकरजाल लोपलें, विरलें विरहांत.

काव्यात्म्यांची ग्रंथी जुळली, रूढिस बववेना
मित्रत्वाच्या बुरख्याखालिल कांहीं जीवांना !
गरुड उडे वर पक्ष पसरुनी व्याध बाण सोडी
मोदें कुक्कुट कौलारावर घेई उंच उडी !

सुखसमयीं तव मित्रप्रीती प्रचंड वे भरती
क्षुद्र समुद्रासम व्हावी कां प्राण्या सांग गती !
तत्वज्ञान्या ! चंचल वृत्ती जगतीं तुज दिसते
ग्रंथनिरीक्षण करतां रुचलें तत्त्व तुझ्यासम तें !

नको स्मृती तव, तुजसम नसती सगळे जन जगतीं
नाहींतर हें विश्व खुरटतें, होईना प्रगती !
विरवन्हि तूं घेऊनि कोलित नाच भुता ! जगतीं
विश्व जळूं दे, पुनरपि उठविल संजीवनि प्रीति !

फेंक जराशी दृष्टि आकाशीं, ग्रहमाला भ्रमते
अगणित विश्वें हंसतीं डुलतीं प्रीती झुलवीते !

तुजसम जळका काळा तारा विश्व तारकांत
गुजगोष्टी ज्या करण्या बघती प्रीतीनें जुळत !
भडका होउनि आग पेटते होई आकांत
पारि न नाश त्या, प्रीतिकवच अणु ठेवि सुरक्षीत !

तेजोमेघीं भ्रमिष्ट फिरले अणुअणु शोकानें !
रम्य मनोहर जगत निर्मिती कांहीं कालानें !
कृष्णहृदय तूं कराल रूढी ! हृदय भिन्न करिसी
संपे शक्ति घे विश्रांती, उगीच कां श्रमसी !

प्रहार जो तूं मम हृदयावर करिसी रे मित्रा !
व्यथित करी पारि उकलुनि दावी प्रीतीच्या चित्रां !
काका ! करुनी घात चंचुचा पिकलें डाळिंब
फेंकिसी, झाली धरणी ही बघ रक्तरसें चिंब !

पहा ! हृदय हें रक्त-प्रीतिच्या दाण्यांनीं खचलें
क्षुधित सारिका विव्हल झाली वायां कीं गेलें !
तुला नच मिळे, शुकी तळमळे, जन्म व्यर्थ गेला
काय मिळे तुज स्वर्ग मिळे कां साधुनि वैराला !

मम हृदयाचें रुधिर सांकळे, करसी नच बाधा
जुळेल आमुच्या प्रिय हृदयांना बेमालुम सांधा !
वेड्यासम मी असा वडबडें, चंद्र वरीं हांसे
पूर्वा रंजित, परी मनाला अंधारच भासे !

पुलावरुनी किती वेळ मी मध्यरात्रि गेलों
कृष्ण शांत जल खोल पाहुनी मोहित किति झालों

उडी टाकुनी शांत करावें—सलिलीं परि मूर्ती
उज्ज्वल चमके—सांगे होइल तव आशापूर्ती !
कृष्णवस्त्र वारिं, निराश अंतरिं, अश्रुपूर्ण नयन
ज्यां वस्तूवर वळले ती ती बघे न्याहाळून !
त्या त्या स्थानीं बिंब उमटलें वाटे आशेचें
जीव तगविला अन्न करुनि या अशा कल्पनांचें
प्रिय जीवाची वसती जेथें त्या स्थानावरुन
दर्शन आशा दुर्लभ परि मी गेलों फिरफिरुन !
असाच वेड्यासम मी भ्रमलों जीवित हो शून्य
गायन वादन वाचन गमलें निरर्थ रसहीन !
प्रणयकल्पना-विहार-चित्रित कादंबरि गोष्टी
हातीं घेतां वळते वरतीं निराशयुत दृष्टि !
किती वेळ मी तसाच पडलों होऊनि अतिकष्टी
टपटप गळलीं ग्रंथावर त्या अश्रूंची वृष्टि !
बाग बहरली, फुलें उमललीं, मन हें होत रितें
झेलें परी हीं कुणास देऊं? कोणि न शोभवितें !
धन्य मधुकरा ! लूट, मजा कर, भोक्ती दूर असे
झालें !—नको मज दर्शन नुसतें वन्हीसम भासे !
वरतीं लहरी, नक्र अंतरीं अफाट सिंधूंत
शांत वरतीं, ज्वाला धुमसे धरणी-हृदयांत !
वरुनी हंसणें, आंतुनि झुरणें, पृथ्वीचा खेळ
तसा खेळलों परि एकांतीं उसळे कल्लोळ !

स्वतां खरडलीं प्रेमळ पत्रें वाचुनि तीं मींच
प्रेमळ उत्तर लिहिलें कागद पाठोपाठ पांच !
खेळत सुटलों एका हातीं लटुपटिचा खेळ
दु:ख शमन कां ? हृदय जाळतो ज्वालेचा लोळ !
एके दिनिं परि तारा हंसली, पत्रकरें उचली
भूगर्भांतुनि, गळल्या जीवां नवजीवन घाली !
आशांकुर तो फुटत शिळेवर, धैर्या ये जोम
थेंबींथेंबीं तळें सांचलें, शक्ति प्रतिरोम !
मनीं मनोमय मीलन आम्हां अभेद्य तें ठरवीं
प्रीतिदेवता विजय पावली रम्य जगत बनवी !
प्रेमळ नाजुक हृदयावरची दुरभिमान-धूळ
प्रीति झटकते, दूर पळालें दु:खांचें मूळ !
आत्मैक्याच्या इंदुदर्शनें द्रवले चंद्रमणी
आशीर्वचनें रूढी-पृथ्वी देती दोघीजणी !
रूप चितेचें हळु पालटलें विवाहहोमांत
आत्म्यांचें तें ऐक्य जाहलें वाद्यगर्जनांत !

**बघे सभोंतीं ध्वनि हा कसला गडगडाट वर मेघ करी**
**लवली चपला, जिव्हा वाटे गिळण्यासाठीं मज आली**
**टपटप पिरपिर, पर्जन्याचे थेंब वाजती घरावरी**
**वाटे फेंकी कोण अक्षता विवाह म्हणुनी शिरावरी !**

मूठ भरुनी अक्षता ! उगीच उधळतां !
जीवग्रंथी लग्न तें
प्रीति कधींच बांधते

काव्य मंत्र बोलतें
स्फूर्ति पावतां !
हृदय खोल शोधलें
प्रीतिच्या भरे जळें
चरुनी वस्त्र कां मध्यें
दूर ठेवितां !
प्रीतिनें प्रकाशलें
काव्य गात चाललें
जीवभान विसरलें
विश्व निरखितां !
मशाल तेज ओकते
सनई रडे गीत तें
वरात धिंड काढते
उगिच हुरळतां !
मूठ भरुनि अक्षता ! उगिच उधळतां !

प्रखर प्रकाशें डोळे दिपले, अंधुक दिसला देखावा
ताटीवरच्या प्रेतामागें चाले म्हातारा बोवा !
झिंगत दाटी करी गर्जना ' जय बोलो भई राम ! ' अशी
मनीं कसेंसें, वळें कुशीवर, दोन उसासे कानाशीं
" डॉक्टर गेले फिरावयाला —" फिरणें शब्दाभंवतालीं
स्वप्नें गरगर फिरुनि दाविती गत सौख्याच्या पटावली !

स्वैर हिंडु ये सृष्टींत !
अलभ्यप्रियजनलाभें नटला

ग्रंथीं जुळतां शांति मनाला
उंच भरारी कांक्षा त्याला
उगिच बांधितां, सोडा परता ! स्वैर हिंडु ये सृष्टींत !

जाल, रेशमी तंतु तोडले
स्वतंत्र कीटकयुग्म जुळालें
प्रत्यंतर हें मनास पटलें
त्यांच्यांमागें जीव बागडे, स्वैर हिंडु ये सृष्टींत !

कांटे धोतरि–पुष्प–चिंतनीं
सुरवंटाचें रूप बदलुनि
प्रेमल लीला, करी निर्मला, स्वैर हिंडु ये सृष्टींत !

तरुवरस्कंधीं लतिका–मृदुकर
किरणशलाका नृत्य मनोहर
कटाक्ष फेंके सृष्टी सुंदर
जीवनप्राणा ! कर अनुकरणा स्वैर हिंडुं ये सृष्टींत !

**प्रेमपुष्प** मृदु निळसर तंतू
मधुप बसे वर सोडुनि किंतु
प्रेम नष्टलें विलीन हेतू
सृष्टि अपूर्णा , करुंया पूर्णा, स्वैर हिंडु ये सृष्टींत !

नरें नियंत्रित पशुशालेंतुनि
सिंहशशकखग खिन्न बंधनीं
मानवनिर्मित कृत्रिम विपिनीं
खुरटे सृष्टी, विटली दृष्टी, स्वैर हिंडुं ये सृष्टींत !

श्री —

पर्वत अंधुक निळसर दिसला
अंतिम साध्यासम तो गमला
शैलीं जाया जीव हुरळला
चल तर झरझर, घट्ट धरी कर, स्वैर हिंडुं ये सृष्टींत !

पानें खालीं, उंच परी शिर
डुललें गवती फूल मनोहर
स्थान गडे दे ! मृदुल कचावर
दोघे जाऊं, मौज दाखवूं, स्वैर हिंडुं ये सृष्टींत !

जवळीं जातां धुकें न कोठें
कडे भयंकर तुटले वाटे
मार्गीं रुतले कंटक मोठे
ठेचा खातों, धडपडतों परि स्वैर हिंडतों सृष्टींत !

चढतां चढतां जीव गळला
प्रियमुखदर्शन दे हुरुपाला
शिखर गांठतां शांति मनाला
स्कंधांवर कर खुले मनोहर, स्वैर हिंडलों सृष्टींत !

खालीं जाणें ये जीवावर
रुचलें बसणें हिरव्या भूवर
दृष्टि स्थिरावे प्रियवदनावर
काळ थांबला, सूर्य पळाला, स्वैर हिंडलों सृष्टींत !

प्रेम पाहुनी तारा हंसल्या
डोकावुनि वर इंदु बोलला

‘ तुह्मां सुखविण्या जन्म अह्मांला
धुकें, घनावली, राहे खालीं, मोदें विहरा सृष्टींत ! ’
**रवींद्र** कविची मृदु **गीतांजलि**
शिरीं धरोनी हळुंच हुंगिली
परस्परांना फुलें वर्णिलीं
सुगंधसेवन, नुरवी भान, स्वैर हिंडलों सृष्टींत !
पृथ्वी शोधे पाश टाकुनि
सुटतिल कारिंचे पक्षी दोन्ही
सृष्टिरूप शिशु-स्मृती ओढुनी
आणी खालीं पुन्हां भूतलीं, हिंडुनि आलों सृष्टींत !
परि मज वाटे पुनरपि जावें
सर्वांना वर उचलुनि न्यावें
नीरस जगतीं कधीं न यावें
मग्न भवांतच, सकल; सखीविण कोण हिंडतो सृष्टींत !
जगत बोले “ हानी होते
मानवकृतिचा वीट आणितें
निराशप्रेमा बळकट करतें
काव्य बोलतें, चित्त गुंगतें, नको हिंडणें रानांत ! ”
सृष्टिंत हंसला जो बागडला
कृत्रिम वाटे पाश मनाला
असा सोबती मिळे जिवाला
फुलें हुंगितां, काव्यें रचतां—( तन्मय होऊं विश्वांत )

* * *

काव्य कशाचें–लिहिलें एकच, तेंहि अपुरें राही
अर्पण केलें प्रियजीवाला–अजुनि ओली शाई !
**चिरसंमेलन** नांव तयाचें वेडावी दैवाला
कविता अपुरी, मीलन अपुरें, बघुं तव कर्तृत्वाला !
हळहळ वाटे काय करावें स्फूर्ती उज्ज्वल झाली
कर उचलेना वच उमटेना कविता वायां गेली !
नाहींतर मीं खचलें असतें करुणरसानें पूर्ण
काव्य या क्षणीं–जाइल नंतर सर्व तयाचा जोम !
मेल्यावर–परि मरेन कैसा ! खरेंच ! मी बडबडलों
तापामध्यें ' मरतों, मरतों,' पूर्वी कैसें वदलों !
जिलीब–जासुद मृत्यूचा कां निरोप हळु गुणगुणला
अमर करिल मज लेख परी जो नखावरी लिहिलेला
खोप्यांतुनि ही सुई काढिते कोण नखावर लिहिते
नाम **मनोरम** कंपित हस्तें, गालीं स्मित खुदखुदतें ?
कोण म्हणालें ' अमर तुम्हाला नाम करी जगतांत
प्रीतीचा हा परवाना घ्या विहरा निर्धास्त ! '

**जागा झालों बघती कोणी रक्त नखांतिल दाबोनी**
**रडतां हंसती लेख पाहुनी खजील झालों अती मनीं !**
**भ्रांतिपटल मन नयनावरचें लोपुनि सगळें रुक्ष दिसे**
**भूतकालचें दृश्य विरालें, क्षीण मनाला शून्य दिसे !**
**भविष्य केलें ' भविष्यकाल न रम्य दिसे या नेत्रांना**
**भूत रम्य परि, वर्तमान हा अलंघ्य वाटे पंगु मना ! '**
**' नको घाबरूं, ' बळेंच हांसुनि कष्टें वदलों कांतेला**
**उज्वल भरभर मनीं कल्पना भावि सुखाच्या त्या आल्या !**

हृत्पटलीं । भावीजीवितपटावली
सौख्यरवी । उज्वल रंगें ती खुलवी
मोदध्वनी । हृदयीं वाटे घुमे जनीं
दृक्पातें । स्वप्नचित्र पुढचें दिसतें !
हळहळतो ! सुरम्य सौख्याला मुकतों
नयन मिटे । अंधारांतच तें उमटे
दूर करी । उज्वलतम परि अंधारीं !
चलित चित्रपट खेळ पाहतों वाटे चित्ताला
दिसती पुढती भावीजीवितस्वप्नांच्या माला.
गेलीं झरझर क्षणामध्यें तीं सौख्याचीं स्वप्नें
अधिकच विव्हल मन मग झालें, फुटलें शोकानें !

* * *

सरितातीरीं शुभ्र शिलेवर **गंगोत्री**जवळीं
धवल **हिमाचल गंगा** निरखित कोण बरें बसलीं ?
**कनखल** क्षेत्रीं पात्रीं वेंची कोण शुभ्र गोटे ?
यक्षजोडपें रत्न वेंचितें असें मना वाटे !

* * *

चंद्रप्रकाशीं रजतरसानें न्हातसे कोण ?
**ताजमहाला**कडे निरखिती हीं दोघें कोण ?
दृष्टि महालीं, हृदयें भ्रमलीं, अननुभूत कंप
विचार पटला, हात दाबला, तान अपोआप !
चंद्रदीप्तिला, सृष्टिकृतीला लाजवितें दृश्य
वेडे जन हे भुलले, झाले दगडालाच वश !

अमरप्रीतिला नयनमनोहर मूर्तरूप करिते
काला फसवुनि समाध ज्यांची जगता भूषविते !
तेंच जोडपें निद्रा त्यजुनी बाहेरीं आलें
दृश्यसुखानें वेडावुनि का मंत्रमुग्ध झालें !

* * *

खोलीमध्यें दीपप्रकाशीं गेलें हें गढुन
लेखनवाचनमग्न जोडपें राहेना भान !
भिंतीला ह्या सुबक तजाविरी हा **दांते! शेले!**
**ब्राउनिंग** दंपती !! **कीट्स्** हे **केशवसुत** डुलले !
आंग्लहिंदचें महाकवीद्वय सिंहासनिं बसले
सर्व तयांचें लेखन होतें कपाटांत खचलें !
दोघांनींही कविता लिहिल्या स्वदेशवीरांच्या
स्वाभिमान मनिं जागृत करितीं भारतबंधूंच्या !
सात्विक प्रीती, उदात्त वृत्ती, धीर निराशेला
उन्मत्तांना अंजन, वंदन सच्चारित्र्याला,
प्रगतीवादी, स्फुरण देतसे गळल्या जीवांना
कविता लिहिल्या प्रिय त्या झाल्या सगळ्या लोकांना !

* * *

गल्लोगल्लीं कोण हिंडतो महारमांगांत
अनीतिपासुनि परावृत्त त्या कोण करूं बघत !
शिक्षण देई, नीति शिकवी बोध तया करुनी
मानवदेहीं उज्ज्वल आत्मा जागृत तो करुनी !

* * *

महिलाविद्यापीठ तेथली मुख्य शिक्षकीण
घरीं यावया निघतां भेटे म्हातारी कोण ?
' सून अजारी, जरा पहा या,' केंविलवाणि वदे
कोण जातसे तसेंच लगबग विसरुनि घरधंदे !
मुख्याध्यापक कांत तिचाही, रात्रीची शाळा
शिकवुनि आला दारीं दिसतो बालक बसलेला !
वदे ' जमविलीं झाडें पानें, पतंग रंगीत
खार लंगडी सांपडली ही, ठेविन बागेंत,
आज सकाळीं टेकडीवरी मौज पहायाला
गेलों होतों दशमी घेउनि उंच फिरायाला !
पाषाणाच्या टांक्यावरती फराळ मी करुनी
वेताळावर डुलकी घेउनि आलों मी दमुनी,'
परस्परांच्या हृदयावरतीं आनंदाश्रूंनीं
काव्यें लिहितीं कोण बरें हीं जगता विसरोनी !
प्रीतीचा हा दीप पाजळे गरीब संसारीं
दुःखाचा काळोख पळाला, भुतें नष्ट सारीं !
काळोख न तो पळे एकटा, काजळ किल्मीष
प्रीति फेंकते निज हृदयांतुनि ठेवि न तें निमिष !
दारिद्र्याची कांच भोंवतीं, मदांधता वात
अभिमानाचा पतंग शिरला नाहीं दीपांत !
देह भिन्न परि आत्मा एकच, मोक्षास्तव झटतो
काळ पातला, भीति न वाटे दुसरें जग वरतो !

* * *

बांधिले मनीं जे किल्ले, वाळूचे ते ढासळले;
भावी-दिन-आशेचें तें भूत मना भेसूर दिसलें;
चित्र तें मृत्युच्या पुढलें, भीषण कीं चित्तीं उठलें;
कुणि कृष्ण आकृति दावी,
लोकांची दुःस्थिति भावी,
स्मृति-पटलीं चित्रित व्हावी,
अंधुक तें पहिलें दिसलें, त्यावरी दुजें हें ठसलें;
मिश्रण हें चित्रविचित्र, पाहुनि मम मन गोंधळलें !

* * *

मेलों, परि मी जिवंत आहें
दुःख असे पण सुखही राहे
देह सोडुनी अलग राहतो
परि न प्रियांचा वियोग होतो !
दूर, परि मी सर्वांजवळीं
मृत्यूची नच भीति शिवली
निर्विकार मन जगता विटलें
स्थितींत तें परी क्षणिक राहिलें !
सुखमय भावी आशा पहिल्या
चित्रपटावर अंधुक दिसल्या !
निराश भीषण ठळक जहालें
चित्र दुजें तें भेसुर दिसलें !
कृष्णमूर्ति ती विकट हांसली
चित्रामागुनि चित्रें गेलीं !

* * *

हृदय थांबलें, अंग निवालें
काळवंडलें, नयन झांकले !
धपकन् तिकडे कोण आपटलें ?
गेलों, दिसली, मूर्च्छित पडली कांता विठ्ठल-शोकानें !
उत्सुक तिजला सावध करण्या
कर देहाला, नच मम प्राणा !
हृदयावर मग करुनि प्रेरणा
हळू उठविलें, मग ती बोले 'नाथा आलें, थांब जरा !'
देह जाळला खडकावरती
रडती सारे आप्त भोंवतीं
खेळे परि मी ज्वालेवरती
आत्म्याला या शीत न उष्ण न कसली बाधा व्हायाची !
वरुनि खिन्न हा कोण दिसे तो
गालीं खुदखुद कसा हांसतो
काय गड्या ! तुज हर्ष वाटतो ?
मी मेल्यानें ? कोण मरे परि, देह मृत्तिका केवळ ती !
काळोखाच्या भेसुर रात्रीं
उभी कोण ही पारावरती
ओंचे खोंवुनि ? अश्रू गळती—
हां हां ! ! वेडे ! फिर तूं मागें, जीव कुणास्तव गमावसी ?
देहावर मम प्रेम तुझें गे
नव्हतें ना ? मग फिर तर मागें ?
कार्य संपवी माझ्यामागें !
एका देहीं दो जीवांचा दुप्पट धर तूं उत्साह !

श्री—

आई ! बाबा ! शोक कशाला ?
करा आपुल्या कर्तव्याला
कर्तव्यांतच मुलगा गेला
शोक सोडुनी मित्र गडे हो ! कर्तव्यांतच तुम्ही मरा !

भार कशाला भूला जगुनी
केली जर नच कांहीं करणी
केली केवळ अक्षरजुळणी
कसली कविता, थुंके जनता, काल दवडला मूर्खानें !

*   *   *

अतिदु:खाचें सौख्य जाहलें बंधन वाटे तुटलें
स्वतंत्र प्राणी ! वाऱ्यावरती स्वार व्हावया सजले !
देह भिन्न हे म्हणुनि वाटलें **केशवसुत** कुणि अन्य असे
**केशवसुत** मी कळलें, होतें खचित लागलें जना पिसें !
'**शेक्सपिअरची** सर ये कोणा ?' हा वेड्या ! कां डौल तुझा
तोच **बाण** तो, **कालिदास** तो, तोच जन्मलों मीहि असा !
देह भिन्न परि एक 'कल्पनादेवीचा हा प्राण' असे
उज्ज्वल कोठें शीतल कोठें, मम देहीं नच कुणा दिसे !

प्रथम सासरीं कन्या जाते, नयनांची त्रेधा
एक स्वगृहीं, दुजी सासरीं, होते दृष्टि द्विधा !
माहेराच्या नयनापुढुनी लटुपटु खेळाचीं
चित्रें जाती गत गोष्टींचीं, प्रेमळ आप्तांचीं !

पुसट स्मृतीचें रूप मनोहर दिसतें नयनांला
विसरुनि मन परि उत्सुक भावी सौख्यचिंतनाला !
दुसऱ्या नयनापुढें चमकतें अश्रुधुक्यांतून
भावीजीवितइंद्रचाप तें, आशेचें ऊन !
नूतनपरिचय उत्सुक हृदयां प्रीती दे मोद !
कर्तव्याचा, मातृपदाचा अस्फुट आनंद !
परस्परांनां रंग खुलविती, चमके इंद्रधनू
तीच स्थिती तुज आली **जीवा** ! भाग्य किती वानूं !
माहेराहुनि–या पृथ्वीहुनि श्रेष्ठ सुखें पुढचीं
इंद्रचाप तुज हवें ? सोड मग भीती मृत्यूची !

* * *

आगगाडीच्या खिडकीमधुनी
बघतां मागें हळहळ मन्मानिं
चिरपरिचित या स्थानापासुनि
दूर कुणीतरि नेतें ओढुनि !
भिंत वायुची फोडित जाते
सामर्थ्यानें इंजन जेथें
तिकडे बघतां स्फूर्ती मिळते
पुढें जावया शक्ती येते !
विश्रांतीस्थल दिसेल नयनां
प्रवास कष्टें संपवितांना
मृत्युरथावर चढ तर जीवा !
नको बघूं त्या मागिल गांवा !

श्री—

मृत्यूनंतर विश्रांतीची
आशा पळविल भीति मनाची
पार न **जीवा** तव भाग्याला !
लवकर आला मृत्यू तुजला !

* * *

दु:खपंजरीं तळमळणाऱ्या गायक-चंडोला !
मुक्त करोनी प्रेम अर्पिते रमणी ही तुजला !
नुकतें कोठें सौख्य लाभलें तुज आयुष्यांत
इतक्यांतच कां सोडुनि जाशी जग हें घाईंत !
सुखदु:खाला विटला कां ? तर जा वर आकाशीं
पंख पसरुनी चोंच वांसुनी उपडा कां पडसी ?
युवतीनें तुज प्रेम अर्पिलें तसेंच दुसऱ्याला
जीवित अर्पण करण्या कां तव प्राण उडुनि गेला ?
नूतनसुखसुम वसंत फुलवी यौवन जगताला
सोडुनि जाशी, अर्पिसि जीवा जीवित कोणाला ?

* * *

मृत्यू सन्मुख वदन पसरुनी
कर्तव्यास्तव कंबर कसुनी
समरीं जाती वीर धरोनि
असंख्य मरती वीर जनीं मग मरणां कां भीसी ?
लाकुडफोडे वध करणारे
जमले; कळलें भविष्य सारें
सागवान नच मनीं घाबरे
पानें डुलवी, करी सांवली, मरणां कां भीसी ?

फुलें तोडण्या कष्ट कशाला
शिशु-युवतीच्या मृदु चरणाला
सुमवृष्टीनें फुलवि धरेला
पारिजात तूं नित्य पाहसी मरणा कां भीसी ?

मृत्युद्वारांतुनि नव भुवनीं
दिव्य सुखें तव दूरच अजुनी
भित्र्या ! पळसी मरणा भिउनी
अश्रु पुसोनी हांस जरासा. मरणा कां भीसी ?

क्षितिज संकुचित योग्य न प्रेमीं
मिळेल तृप्ती विश्वप्रेमीं
अनुभव आला रमणीप्रेमीं
चिरसुखसेवन जें देई त्या मरणा कां भीसी ?

*　　*　　*

डरांवगान मंडुका । गासि कां फुका ?
काव्य ना रुचे कुणा
सूर त्रासवी जनां
रसिकचित्तमोहना
पात्र कोठला !
गान श्रवुनि हांसली
वेडकीहि मोहिली
कर्दमांत नाचली
प्रेमनायिका !

श्री—

दगड बालकें जळीं
फेंकण्यास धांवलीं
मरशि, खोल जा तळीं
क्षुद्र गायका !

करील विश्व बावरी
स्फूर्ति लपिव अंतरीं
गान रमवितें जरी
रात्रकीटका !

तडाग पूर्ण वाहले
कार्यक्षेत्र संपलें
कृष्णमेघ लोपले
उगिच कां हांका ?

पीत वस्त्र पांघरी
गाढ नीज कंदरीं
काव्य घुमव अंतरीं
सृष्टिगायका !

.... ....

तार तोडुनी जरी पाहिली तारायंत्राची
दिसे वीज कां ? गती कुंठते मानवबुद्धीची !
निरोप नेई सुखदु:खाचें सांत्वन जी करिते
दु:ख विझवितें, रम्य कथा जी युद्धाच्या वदते !
प्रवाह कळतो तृषित रसिक त्या लोहचुंबकाला
तो नसतांना झोला वाटे चिमण्या पक्ष्यांला !

तूं मेल्यावर काव्य तुझें तें टीकाकाराला
क्षुद्र चोपडें वाटे पण जें अमूल्य एकीला !
जिवंत शब्दीं काव्यीं वाहे प्रवाह प्रेमाचा
एका पटलें, परी निराळा अनुभव लोकांचा !
तुकडे करुनी शब्द तोडिती ' काव्य नसे कोठें '
• गत सगळ्याची, खेद कशाला ! जा मृत्यूवाटें !

*        *        *

पिंपळफळ जरि काक भक्षिती, प्रीतीचें बीं नच पचतें
टीकेनें जरि काव्य नष्टतें प्रीती हृदयावर घुमते !
योग्य भूमिवर बीज रुजोनी फोंफावे तो वृक्ष पुन्हां
असें समजतें, पटतें कां नच, जीवा ! भीसी कां मरणा ?

*        *        *

उघडें मृत्यूचें द्वार
काव्य, तंहि, पण टिकणार !
खेळत खडकाशीं हाडें
सरितेमधुनी सिंधुकडे
जातिल जेथें खोल तळीं
खचल्या मोत्यांच्या ओळी !!
तप्त चितेच्या ज्वालेंत
शरिराचे अणु अणु बनत
विरल वायुच्या लहरिवरी
पोहत जातिल दिगंतरीं !
वायुकणांच्या पोकळिंत
स्वप्नांतच निजतिल डुलत !

श्री—

स्फुट गायन तव हृदयाला
रमविल जागृत प्रेमाला !
तसेंच अस्फुट काव्य तुझें
भाग्य खरोखर शब्दांचें !
महाकाव्यमय आत्म्याच्या
अविनाशी प्रभु प्रेमाच्या
तन्मय होइल काव्यांत
स्फुट जें रमणीमौनांत !
प्रतिध्वनी प्रत्येक मनीं
अमर काव्य तव होय जनीं
विचार पटला ना चित्तीं
सोड मृत्युची ही भीती !

* * *

काव्य राहिलें अपुरें मागें हळहळ कां उगिच ?
तुझी योग्यता तितकी प्राण्या ! प्रतिभा तितकीच !
ठेव हातोडी पाथरवट ! तूं किति रे श्रमलासी
चिर विश्रांती घ्याया प्राण्या ! कष्टी कां होसी !
केला भावी महाकवीचा मार्ग सुगम पुढचा
रान तोडुनी चिपा बसविल्या काव्यकल्पनेच्या !
दगड कमी जर पसर तनू तव मार्गीं निःशंक
महाकवीच्या उदयापूर्वीं तुडविल तुज रसिक !
महाकवी तो चरणरजानें पुनीत तुज करिल
वाट पहा तो केव्हां येतो भाग्याचा काल !

मृत्यू नच हा, तान संपली पहिली गाण्याची
कार्य संपलें, घे विश्रांती जीवा ! हक्काची !

* * *

दाट उंच हें गवत माजलें सगळ्या कुरणांत
तुडुंब भरुनी सरिता वाहे प्रशांत मोदांत !
पांवा वाजे ! कान उभारुनि स्वस्थ हे करिती
तुझ्यासारखे काळे ढवळे गोऱ्हे बागडती !
खाणें सोडुनि गोजिरवाण्या ! कां तूं हंबरसी
पुच्छ उभारुनि गोठ्यामध्यें धांवत कां सुटसी !
चाटील माय तुज मायेनें हुंगुनी—तान्हुल्या
मग पिशील पान्हा तृप्ती ना होउनी—बापुड्या
यासाठींच केवळ बावरसी कां मनीं—संवगड्या !
धडपड करसी, आत टाकिसी मरणाऱ्या जीवा !
द्योतक चिन्हें दर्शविती कां प्रेमाचा हेवा !

* * *

सुखंटाच्या कोशामधुनी बाहेर येशी
सहन वेदना करी **पतंगा** ! धीर न कां धरसी !
कोश टाकतां उडशिल घेऊन पोटाशीं पाय
विसरशील तूं प्रसंग तेव्हां हा मरणप्राय !
नूतनविकासित कुसुमप्रेमीं गुंगत रमशील
दुःख न ठावें मधुप्राशनीं हांसत मरशील !
**पतंग** तूं ही कां कांचरसी, मरणाऱ्या जीवा
पाहुनी भावी सौख्य तुझें मग करील जग हेवा !

श्री—

स्वतंत्र जीवा ! स्थिती मनोहर
कसला सांगे करसि विचार !
सोड भूमि ही चंचल अस्थिर
रवीजवळ जा धरुनि दिव्य कर
प्रखर किरण नच बाधा करती
अमर खरा तूं हूं ! चढ वरतीं
करती तेजोलहरी नृत्य !
भ्रमति पहा बुध, मंगळ भृत्य !
रवि नच मोठा, कलंकतारा,
प्रचंड तूं, तुज देइ न थारा !
धूमकेतुच्या पुच्छावरतीं
बसुनी भ्रम जा अनंत प्रांतीं
स्वैर तारकागणांत खेळ
दुसऱ्या पृथ्वीवरतीं लोळ !
असातिल तेथें शिशू गोजिरे
शैशव त्यांचें कधीं नच सरे !
सर्व रसिकजन दिसतिल नयनां
जीवा ! तुजसम वागडतांना
पुलकित सृष्टी गाई गाणीं,
पाठ करी तीं घोळघालुनी !
ओत पृथ्विवर कविच्या कर्णीं
स्फूर्ती देई तें गुणगुणुनी !
नाहीं तर रे प्रेमळ जीवा !
रवितारांचा कशास हेवा

खुशाल त्यांना नाचूं दे
इथेंच राहीं तूं मोदें !
रसिक न थोडे जगावर
त्यांच्यावर कर उपकार
पाथरवट जो शिळी भाकरी
खातो कष्टार्जित दगडावरी
थकला त्याला स्वप्न मनोहर
पाडुनी मानस आनंदित कर !
नामस्मरणीं, अश्रूस्मरणी
अविरत फिरवी भार्या तरुणी
दे तिज आशा धीर जगाया
अपुल्या कार्या पूर्ण कराया !
वृद्धा माता वियोगविव्हल
होइल रे तव स्मरणीं विकल
तेव्हां कानीं गुणगुण गावें
मातासान्त्वनयत्न करावें
किंवा मांजररूप धरोनि
घोळामध्यें गुरगुर करुनी
त्वां सुखवावें तिज लीलेनें
विसर क्षणभरीं या नादानें !

*  *  *  *

गड्या जिवा ! तव भाग्य
कटकट नाहीं तुज जगतीं !

रानीं निर्मल निर्झर वाहे
सान भोंवरे निरखित जावें !

फुलावरुनि ह्या दुज्या फुलावर
त्वांच झुकावें, स्थिती रम्यतर

वातावरणीं स्वैर डुलावें
नीरस जग हें सोडुनि द्यावें !

सुखदकल्पनातरंगमग्न
कोणि न आणी मध्यें विघ्न

जीव तुझा मग तुला मिळे
पृथ्वीवरती कोण वळे !

आत्म्याचा जडभोग सरे
सौख्याला नच पार उरे !

दृढतर बांधुनि प्रेमळ पाशीं !
जगत उचलूं ये अपणापाशीं !

अहहा ! हूं ! हाः ! गंध दरवळे
सुंदर पुष्पें, गुच्छ उमललें !

किती तेज हें दिव्य अलौकिक
तेजस्वी हें सुंदर बालक ! !

उचल गडे ग हळूंच वरती
हळूंच उचला ठेवा वरती ! ! !

**क्षीण किलिकली दृष्टि उचलली, उचलुनि सर्वजण**
**गार तनूला बाजेवरतीं ठेविति बहु जपुन !**

आंग जहालें गार किती तें त्यावेळीं कळलें
कढत वाटली ओली गादी-इतकें गारठलें !
हलुक झाली तनू भासली स्वतांलाच हलकी
भिन्न तनूहुनि मीच वाटलें, उचलितसें वरती !
डॉक्टर घाई करूं लागले, पळाचीहि खोटी
सहन न त्यांना; नवल मन्मना गडबड कां इतकी !
' पाणी तापिव-पुरे-उठा ! हें धरा उंच भांडें, '
निर्विकार मी पहात पडलों निरखित चोंहिंकडे.
दो नयनांचे केंद्र न जुळले दोन वस्तु दिसती
नेत्र हलेना, परी मनानें हिंडतसे भंवतीं !
श्वास, उसासे, उशागती मम पायाच्या जवळी
उत्सुक आतुर भयाकुल गमे दृष्टी त्या काळीं !
बघतां बघतां प्रिय नयनाच्या काळ्या बुबुळानें
वाढत जातां मला वेढिलें श्यामल पटलानें !

* * * *

सुई टोंचतां पुरा शुद्धिवर आलों मग दिसलें
क्षारसिंधुची बालप्रतिमा शिरेंतुनी चाले !
रक्त गोठलें परि हळुं द्रवलें प्रियजनशोकानें
रुधिराभिसरण सुरू पूर्ववत कांहीं कालानें !

* * * *

बर्फाहुनि ह्या थंड दरींतुनि उचले वर कोण ?
सुखद उष्णतर वायुथरावर ठेवी निजवून.
प्रतिक्षणीं तें अधिकाधिक मज उंच किती नेतें
कानांशीं मधु मंजुल गाणीं कोण तरी गातें ?
डोळे वळवुनि बघतां मजला दाराशीं दिसले
अंधारांतच दोन चमकले डोळे डबडबले !
पर्जन्याचे दिन न उलगले, त्यांतच उन पडलें
अश्रुधुक्यांतुनि हास्यकरांचें दर्शन शुभ गमलें !

* * * *

श्री—

मना वाटलें पुन्हां उतरलों भूवर स्वजनांत
प्रवास इतका केला केवळ सातच तासांत !
मृत्युद्वाराजवळी जाउनि ठोठावित सुटलों
युद्धसिद्धतानिमग्न मृत्यू; परतुनि मी आलों !

*  *  *  *

" शर्थ खरोखर डॉक्टर तुमची; हातुनि सुटलेला
' काळमुखांतुनि ' ओढुनि केला जिवंत मेलेला !"
विचार झाले सुरू सारखे ' ओढुनि आणी कोण ? '
' काळमुखांतुनि ' किंवा ' सुखमय जीवनस्वप्नांतून !'
' तरंग सुखमय बुद्‌बुद सुंदर ' कां "हा खडतर मार्ग"
जीवद्वय हे पंथ क्रमिती. कांटे जागोजाग !
मी ' काळाच्या दाढेंतुनि ' हा निसटुनि आलों जगतीं
इतर जनासम वदतों परि नच पटतें तें मम चित्तीं !

# अभिप्राय

## रा. राम गणेश गडकरी उर्फ ' गोविंदाग्रज. '

आपलें ' काळाच्या दाढेंतून ' हें नवीन चिमुकलें काव्य आपण म्हणून दाखविलेलें आनंदानें ऐकिलें. ' ईश्वर जें जें करितो तें तें सारें बऱ्याकरितां ' हें तत्त्व खरें असलें, तरी तें बहुधा दुःखिताच्या समाधानाकरितां दुःखकाळींच उपयोगांत येत असल्यामुळें त्याची निर्दय शुष्कता अनुभवाला कडवटपणा आणीत असल्याचेंच नेहमीं पहाण्यांत येतें. होणाऱ्या बऱ्यापेक्षां चालू दुःखाकडेच अशा वेळीं मनोवृत्ति वळलेल्या असतात. बरें झाल्याच्या समाधानप्रसंगीं तें दुःखपूर्ण ' जें जें ' आनंदी आठवणींत बागडतांना पाहण्याचे भाग्यशाली प्रसंग आपल्या क्वचितच अनुभवाला येतात. आपल्या आयुष्यांतील आपणावर नुकतेंच येऊन गेलेलें प्राणसंकट अशा परिणामरमणीय प्रसंगांपैकींच एक ठरल्यामुळें आपणाला आयुष्यप्रद, आपल्या सहधर्मचारिणीला सौभाग्यप्रद व आपल्या मित्रवर्गाला आनंदप्रद झालें आहे. त्या दिवशीं पटकीच्या पकडींत निर्जीवकल्प झालेल्या आपल्या शरीराकडे पाहते वेळीं मीं जर काल आपण आम्हांला आपलें काव्य वाचून दाखवीत असल्याचा नुसता तरल तर्क केला असता, तर त्या वेळीं तो कल्पनेच्या उत्कट उत्कर्षाला ओलांडून अतिशयोक्तीच्याहि मर्यादेबाहेर जाऊन पडला असता. आपलें काव्य अनुभवाचें असल्यामुळें फारच बहारीचें झालें आहे. लहानपणीं सिंदबादच्या सात सफरी वाचतांनासुद्धां मी इतका तल्लीन झालों नव्हतों. आपली प्रतिभा उच्च प्रतीची व सध्यांचा अनुभव अलौकिक असल्यामुळें या काव्यांत सत्य व कल्पना हीं वाचकांच्या सामान्य बुद्धीशीं सारखे लपंडाव खेळत रहातात. अंतर्बाह्य मनोव्यापाराचे दुवे मिळवितांना आपण कौशल्याचा उपयोग केला आहे, किंवा अनुभवाचें सहाय्य घेतलें आहे, हें मोठें रमणीय गूढ आहे. आपली कविता अक्षरशः स्वर्गापर्यंत भराऱ्या मारीत आहे, असें म्हणणारावर सांप्रदायिक शब्दयोजना केल्याचा आरोप सदरहू प्रसंगीं मुळींच येण्यासारखा नाहीं.

श्री—

विषयाशीं तन्मय होऊन वाचणाऱ्या सहृदयाला आपलें काव्य अपूर्व वाटल्यावांचून रहाणार नाहीं. उत्तरोत्तर आपल्या हातून अशींच अर्थात् असल्या गुणांचीं सरस काव्यें निर्माण होतील, अशी साधार अपेक्षा प्रदर्शित करून, बेशुद्ध असतांना कल्पनारूपानें आपल्याला दिसलेल्या मनोहर आशासृष्टीचा आपल्याला वस्तुस्थितींत अनुभवानें लाभ होवो, असा आपणाला केवळ वयाच्या वडिलपणानें मी आशीर्वाद देतों.

आपला नम्र बंधु,

१-१०-१४ **गोविंदाग्रज.**

**श्रीयुत त्र्यंबक बापूजी ठोमरे 'बालकवी.'**

आपलें 'काळाच्या दाढेंतून' हें काव्य मला अत्यंत आवडलें. या विषयावर असल्या तऱ्हेचें मराठी भाषेंत हें पहिलेंच काव्य आहे, असें मला वाटतें. पद्धति नवीन असून अंतर्बहि:सृष्टीचें सूक्ष्म निरीक्षण जागोजाग आढळून येतें. आपल्या म्हणण्याप्रमाणें केवळ 'एकीला'च नव्हे, पण एकमतानें सर्वांना हें आवडण्यासारखें आहे.

पुणें, १५।११।१४. **त्र्यं. बा. ठोमरे.**

# अनुक्रमणिका

श्री—

( श्रीधराची कविता )

श्री—

# टीप

स्वतःच्या ज्या कविता प्रसिद्ध होऊं नयेत असें सौ. मनोरमाबाईंना वाटत होतें त्या कविता या संग्रहांत प्रसिद्ध केल्या नाहींत. त्यांतील कांहीं कविता प्रासंगिक होत्या. कांहीं सहज खरडून गमतीनें वहींत उतरल्या होत्या. एकदोन नियतकालिकांत व दैनिकांत प्रसिद्धहि झाल्या होत्या. या कवितांचीं शीर्षकें व लेखनदिन हीं पुढें दिलीं आहेत.

| | | ता. सन |
|---|---|---|
| १ | चांदणें | १९१२ |
| २ | इंद्रधनुष्य | १९१२ |
| ३ | प्रभातगीत | १९१२ |
| ४ | कवितादर्शन | १०–६–१९१२ |
| ५ | कवि-कविता | २९–६–१९१२ |
| ६ | काव्यतरू | १–७–१९१२ |
| ७ | बंधुविरह | ६–७–१९१२ |
| ८ | भगिनी-सांत्वन | १९१२ |
| ९ | रामतिलाप | १९१२ |
| १० | वीरपुत्राचे दोन शब्द | १९१२ |
| ११ | माझें गाणें | |
| १२ | जगाची झकपक | |
| १३ | चंपी कुत्री | |
| १४ | 'शिकलेल्या सुनेस' | २८–७–१२ |
| १५ | मागील आठवण | |
| १६ | कीर्तीवरील डाग | १७–८–१२ |
| १७ | उपदेशबिंदू | २०–८–१९१२ |
| १८ | कलिकावियोग | लोकमित्र वर्ष २२ |
| १९ | उपायनकुसुमें | ३०–८–१९१२ |
| २० | रजनी | ३०–८–१९१२ |
| २१ | कोडें | ३१–८–१९१२ |
| २२ | मूककलिका | ६–९–१९१२ |
| २३ | सदसद्विवेकबुद्धि | १७–९–१२ |
| २४ | विधीस | २४–९–१९१२ |
| २५ | वन्य कुसुमास | २६–९–१९१२ |
| २६ | काव्योगम | १–१०–१९१२ |
| २७ | माशाचा विचार | १५–१०–१२ |
| २८ | माझें घर | १६–१०–१२ |
| २९ | मनःस्वास्थ्य | १७–१०–१९१२ |
| ३० | एक भ्रमर | २१–१०–१९१२ |
| ३१ | रांगोळ्या | १७–११–१९१२ |
| ३२ | हलवा | १५–१–१९१३ |
| ३३ | मी मूढ | १७–१–१९१३ |
| ३४ | सण | २१–१–१९१३ |

| | ता. | सन |
|---|---|---|
| ३५ कल्पकता | २३–१–१९१३ | |
| ३६ निराशा | २६–१–१९१३ | |
| ३७ वाळूवरील नांव | २६–१–१९१३ | |
| ३८ आजारी मुलीस | ४–३–१९१३ | |
| ३९ सौ. सुमतीबाईस | १०-३-१९१३ | |
| ४० प्रसाद | | |
| ४१ शिशुकुसुमें | | |
| ४२ प्रश्नोत्तरें | | |
| ४३ एक एप्रिल | १–४–१९१३ | |
| ४४ प्रीतीमय विश्व | २–४–१९१३ | |
| ४५ नूतनवर्षारंभ | | |
| ४६ झोपीं चाललेल्या मुलास | | |
| ४७ दुसरें विश्व | | |
| ४८ मी हंसेन | २७–५–१९१३ | |
| ४९ जाई जुई | जून १९१३ | |
| ५० अंतिम साध्य | १–६–१९१३ | |
| ५१ सरोवरावरील समयीं | ७–६–१९१३ | |
| ५२ रानवेल | २७–६–१९१३ | |
| ५३ उद्यान हरवलें | २९–८–१९१३ | |
| ५४ गाणें | ३–९–१९१३ | |
| ५५ अभिनंदन | २१–१२–१९१३ | |
| ५६ जननी !— | २१–१२–१९१३ | |

| | ता. | सन |
|---|---|---|
| ५७ लेडीज सोशल कॉन्फरन्ससाठीं प्रभो नमितों चरणयुगुला | मे | १९१४ |
| ५८ लेडीज सोशल कॉन्फरन्ससाठीं— बहुमुदें करूं आतां सुमृदुगीतानें | मे | १९१४ |
| ५९ लेडीज सोशल कॉन्फरन्ससाठीं होवो सुखकर सकलां ही कृति | मे | १९१४ |
| ६० स्वागत—पद्य. ( डॉ. हूटन ) | | |
| ६१ भारत—रक्षक स्वयंसैनिक | | |
| ६२ फिजी बेटांतील स्त्रियांचा धांवा | | |
| ६३ हिंदबालेस— प्रेमें सिंचुनि तोय स्वर्ण नदिचे रम्या लता जाहली | | |
| ६४ कोहिनूर अमुचा गेला ( ना. गोपाळ कृष्ण गोखले ) | २२–५– | १९१५ |
| ६५ बोलेना हरि कांहीं— | | |
| ६६ कां | | |
| ६७ चंद्रास | | |
| ६८ शोकगीत—या अशुभ बोलती बोला ( लो. टिळक ) | १०–८– | १९२० |

# प्रथम चरणांची सूचि

## प्रथम चरणांची सूचि

---

श्री—

# प्रथम चरणांची सूचि

श्री—

# रविकिरणमण्डळाचीं पुस्तकें

१ किरण ( गद्यपद्य, मण्डळ )
२ काव्यविचार ( काव्यविषयक निबन्ध, मण्डळ )
३ उषा ( पद्य, मण्डळ )
४ मधुमाधव ( पद्य, घाटे-माधव जूलियन् )
५ शलाका ( गद्यपद्य, मण्डळ )
६ विरहतरङ्ग ( खण्ड काव्य, माधव जूलियन् )
७ कला ( खण्डकाव्य, गिरीश )
८ नाट्यरूप महाराष्ट्र ( ऐतिहासिक प्रवेश, विठ्ठलराव घाटे )
९ छन्दोरचना ( मराठी वृत्तशास्त्रः डॉ. प्रा. मा. त्रि. पटवर्धन )
१० प्रभा ( गद्यपद्य, मण्डळ )
११ सुधारक ( खण्डकाव्य, माधव जूलियन् )
१२ आम्बराई ( खण्डकाव्य, गिरीश )
१३ यशोधन ( पद्य, यशवंत )
१४ उमर खय्यामच्या रुबाया ( पद्य, डॉ. प्रा. मा. त्रि. पटवर्धन )
१५ भावमन्थन ( पद्य, यशवन्त )
१६ काञ्चनगंगा ( पद्य, गिरीश )
१७ द्राक्षकन्या ( पद्य, माधव जूलियन् )
१८ बन्दीशाळा ( खंडकाव्यः यशवन्त )
१९ गज्जलांजलि ( पद्यः माधव जूलियन )
२० जयमंगला ( खण्डकाव्यः यशवंत )
२१ फलभार ( पद्यः गिरीश )
२२ अभागी कमल ( खण्डकाव्यः गिरीश )
२३ स्वप्नरंजन ( पद्यः माधव जूलियन् )
२४ यशोगंध ( पद्यः यशवंत )
२५ काव्यकला ( लेखसंग्रहः प्रा. शं. के. कानेटकर )

२६ **मराठी नाट्यछटा** ( प्रबंधः प्रो. शं. के. कानेटकर )
२७ **तुटलेले दुवे** ( सुनीतसंग्रहः माधव जूलियन् )
२८ **भाषाशुद्धिविवेक** ( लेखसंग्रहः डॉ. प्रा. मा. त्रि. पटवर्धन )
२९ **कांहीं म्हातारे व एक म्हातारी** ( शब्दचित्रेंः विठ्ठलराव घाटे )
३० **श्री–मनोरमा** ( कवितासंग्रहः सौ. मनोरमा रानडे व श्रीधर रानडे )

किं. २॥ रु.

## संकलित.

**माधवजूलियन**—नकुलालंकार; मधुलहरी.
**गिरीश**—नवीन कवितांचा संग्रह.
**यशवंत**— ,, ,, ,,
**मंडळ**—**अंतरंग** ( पत्रसंग्रह )
**श्रीधर रानडे**—तिंबूनानाचा रेडियो ( बालवाङ्मय )

## रविकिरणमण्डळाच्या सभासदांचीं इतर पुस्तकें

**यशवंत**—यशवन्ती, मित्रप्रेमरहस्य. सम्पादन–महाराष्ट्र कविपरंपरा
**पटवर्धन**—फार्सी मराठीकोश, पद्यप्रकाश ,संपादन–तांबे यांची कविता
**दिवाकर**—नाट्यछटा, कारकून, स्वप्नदृश्यें.
**घाटे**—नाना देशांतील नाना लोक, मराठ्यांच्या गोष्टी.
**गिरीश**—संपादन–अरुणवाचन, टिळकांचें ख्रिस्तायन.
**माडखोलकर**—मुक्तात्मा, भंगलेलें देऊळ, शाप, कांता.
**श्रीधर रानडे**—संपादन–साहित्यपरिचय, गद्यवैभव, महाराष्ट्र-रसवंती, दिवाळीची डाली.

